# जीवन संगीत

विल्यम सारोयानच्या
**'Human Comedy'**
या कादंबरीचा मराठी अनुवाद



ना. सी. फडके

रामकृष्ण बुक डेपो : मुंबई ४

मुद्रक—
एम्. ई. करीम, डी लक्स
प्रिंटर्स, व्हिक्टोरिया गार्डन
रोड, भायखळा, मुंबई २७

प्रकाशक—
विष्णु रघुनाथ बाम,
रामकृष्ण बुक डेपो,
गिरगांव; मुंबई ४.

या कादंबरीची पहिली आवृत्ति
झंकारमध्यें क्रमशः प्रसिद्ध झाली.

द्वितीयावृत्ति: १९४५



मराठी अनुवादास परवानगी दिल्याबद्दल
विल्यम सारोयान, त्यांचे प्रकाशक व एजंट
या सर्वांचे आम्ही आभारी आहोत.

प्रकरण २१ मध्यें 'खजुराचे वाफोळे' असा शब्द पडला आहे,
त्याऐवजी 'खारकेचे वाफोळे' असें वाचावें.

# विल्यम सारोयान यांची थोडी ओळख.

अमेरिकन साहित्याच्या आघाडीवर तळपणाऱ्या लेखकांत विल्यम सारोयान यांचं नांव प्रमुख आहे. ललित साहित्याचे सारे प्रकार त्यांनी हाताळले आहेत. साऱ्या परंपरा अन् सारे संकेत यशस्वी रीतीनें मोडले आहेत! लघुकथेचीं रेखीव व्याख्या सांगतां येणार नाहीं हें सिद्ध करायचं असेल तर सारोयानच्या गोष्टींचं उदाहरण फार उपयोगी पडेल. इंग्रजी गोष्ट अन् अमेरिकन गोष्ट यांतला एक फरक चटकन लक्षांत येतो तो हा कीं ठराविकाची चौकट मोडण्यासाठीं अमेरिकन कथालेखकांची सतत धडपड चाललेली असते. तंत्राचे नियम धुडकावून लावणाऱ्या अमेरिकन लेखकांत सारोयान यांचा नंबर पहिला लागेल. त्यांच्या कथांपैकीं कित्येक नुसतीं शब्दचित्रं वाटतात, कित्येक निव्वळ बडबड ठरतील, पण त्या साऱ्या वाचकाचं चित्त वेधतातच वेधतात! अमेरिकन वाङ्मयाच्या क्षेत्रांत सारोयान ही एक विचित्र शक्ति समजली जाते. सारोयानच्या गोष्टींना गोष्टी म्हणतां येत नाहीं, नाटकांना नाटक म्हणतां येत नाहीं, अशी टीका अर्थातच वारंवार होते. त्या टीकेला सारोयाननं एकदां उत्तर दिलं कीं, तुम्ही माझ्या लिहिण्याला कोणतं नांव देतां त्याच्याशीं मला काय करायचं आहे? त्यांत जिवंतपणा आहे कीं नाहीं बोला."

सारोयानच्या वाङ्मयाची प्रकृति अशी भिन्न व स्वतंत्र आहे याचं कारण मला वाटतं हें असावं कीं त्याच्या जीवनाचा प्रवाह ठराविक वळणानं गेलेला नाहीं. सारोयानचं कुटुंब मूळचं आर्मोनियन, पण ती मंडळी मायदेश सोडून अमेरिकेंत आली व कॅलिफोर्निआ या अतिपश्चिमेकडच्या संस्थानांत घर करून राहिली. या कुटुंबांत विल्यमचा जन्म १९०८ सालीं झाला. त्याच्या बापानं 'फ्रेन्सो' नजीकच्या सुपीक दरींत द्राक्षांचे मळे केले होते. विल्यम दोन वर्षांचा असतांनाच त्याचे वडील वारले. त्याच्या आईला पांच वर्षं आपलीं मुलं अनाथालयांत ठेवावीं लागलीं. पुढें मांस, फळं वगैरेचे डबे तयार करण्याच्या एका कारखान्यांत तिला काम मिळालं, अन् जरा बरे दिवस आल्यावर तिनं आपल्या मुलांना घरीं आणलं.

विल्यम अगदीं लहानपणापासून कामधंदा करूं लागला. तारवाल्या शिपायापासून तों वार्ताहरापर्यंत नाना तऱ्हेच्या रोजगारांचा त्यानं अनुभव घेतला. त्याच्या चुलत्याचे द्राक्षांचे मळे होते त्यांतहि त्यानं काम केलं. वयाच्या सोळाव्या वर्षी त्यानं गोष्टी लिहायला प्रारंभ केला. सतराव्या वर्षी त्यानं आपलं गांव सोडलं. तें जग कसं आहे तें बघायसाठीं !

कॅलिफोर्निआंत घालविलेल्या लहानपणांतल्या दिवसांची चित्रं सारोयाननं आपल्या लिखाणांत अनेक ठिकाणीं काढलीं आहेत. ( " जीवन संगीत " या कादंबरींत तर आत्मचरित्रपर वर्णन पुष्कळच आहे. ) पण त्याच्या कथावाङ्मयाची झेप केवळ आपल्या गांवापुरती मर्यादित नाहीं. न्यूयार्कमधील राजरस्ते व विलासस्थानं यांपासून तो पश्चिमेकडची छोटीं शहरं व शेतवाड्या, बगीचे अन् उजाड वाळवंटं यांपर्यंत त्याच्या लेखनाच्या विषयाचा व्याप आहे. अमेरिकेंतले सारे प्रदेश अन् माणसांचे नमुने त्यानं चित्रित केले आहेत. अमेरिकेंत पहिली वसाहत ज्यांनीं केली त्यांच्या साध्या, राकट जीवनाविषयीं सारोयानला जिव्हाळा वाटतो. आजच्या अमेरिकन लोकांची पाळंमुळं त्या जुन्या पिढींत आहेत ही गोष्ट वाचकांना पटविण्याची त्याला ओढ आहे. अन् म्हणून त्या पिढीच्या अवशेषांतला विनोद अन् विविध रंग तो आपल्या कथावाङ्मयांत मोठ्या सहानुभूतीनं अन् तन्मयतेनं चित्रित करीत असतो. सारोयानची शैली खडबडीत प्रमाणशून्य—कित्येक वेळां कलाहीन—वाटण्यासारखी असली तरी आपल्या लिखाणानं त्यानं अमेरिका जिंकली आहे याचं रहस्य हें आहे. विल्यम सारोयान ही अमेरिकन साहित्यांतली एक प्रभावी शक्ति आहे याचा अर्थहि हाच आहे.

" The Daring young man on the flying trapeze " हा सारोयानचा प्रसिद्ध झालेला पहिला कथासंग्रह ! ( याच्या मालगाडीसारख्या लांबलचक नांवावरूनच उघड होतं कीं ठराविक संकेतांबद्दल या स्वारीच्या अंगीं केवढी बेफिकिरी त्या वेळेसच होती ! ) त्यानंतर त्याच्या आणखी आणखी गोष्टी प्रसिद्ध होत गेल्या. १९३९ सालीं तो नाटककार बनला. " My Heart's

in the Highlands हें त्याचं पहिलं नाटक. तें गाजलं. मग त्यानं "Love's Old Sweet Song", 'The Hero of the world", "Something about a soldier", "Across the Board on Tomorrow morning", "The Time of your life" हीं नाटकं एकामागोमाग लिहिलीं. "The Human Comedy" ही त्यांची पहिली कादंबरी. ती अतिशय लोकप्रिय झाली. तिचा चित्रपट करण्यांत आला आहे. तोहि फार हृदयंगम वठला आहे असें ऐकतों. मीं तो अजून पाहिला नाहीं.

सारोयानच्या लेखनांत जो निस्पृहपणा, तऱ्हेवाईकपणा आहे तो त्याच्या वागण्यांतहि दिसतो; त्यामुळें शॉप्रमाणेंच तो म्हणजे लोकांच्या कुतूहलाचा विषय झालेली एक व्यक्ति आहे. वाङ्मयाच्या निरनिराळ्या शाखांत विशेष कर्तृत्व दाखविणाऱ्या व्यक्तींना अमेरिकेंत Pulftzer Prize नांवाचं पारितोषिक दिलं जातं. हें मोठं बक्षिस मिळणं म्हणजे एक बहुमानाची गोष्ट समजली जाते. परंतु १९३९ सालीं "The Time of your life" या नाटकाबद्दल सारोयानला हें बक्षिस देण्यांत आलं तेव्हां त्यानं स्वच्छ सांगितलं कीं, "वणिज्य वृत्तीच्या लोकांकडून कलेचा गौरव झाला तर त्याची किंमत मी मानीत नाहीं. मला हें पारितोषिक नको!" सुशिक्षित शिष्टांपेक्षां अशिक्षितांच्या सहवासाचा तो अधिक भुकेला आहे. प्रतिष्ठित समाजाचे शिष्टाचार आपल्याला माहित नाहींत असं तो अभिमानानं सांगतो, एखादी अनपेक्षित गोष्ट करून लोकांना चाट करण्याची त्याला हौस आहे व त्यासाठीं आवश्यक तेवढी कल्पकताहि त्याच्या ठिकाणीं आहे. "The Beautiful People" या त्याच्या नाटकाचे प्रयोग न्यू यॉर्क शहरीं चालू होते, तेव्हां सारोयाननं जाहीर केलं कीं ज्याला नाटक आवडणार नाहीं अशा प्रत्येक प्रेक्षकांच्या तिकिटाचे पैसे मी स्वतःच्या खिशांतून परत करीन! 'गुण न आल्यास पैसे परत' या चालीवर आपल्या नाटकाची ग्वाही देणारा विक्षिप्त अमेरिकेंतसुद्धां हा पहिलाच नाटककार म्हणावा लागेल!

१९४२ सालीं तो अमेरिकेच्या सैन्यांत दाखल झाला. "The Human Comedy" या कादंबरींत युद्धाबद्दलचीं जी मतं त्यानं मार्कसच्या तोंडीं

घातलीं आहेत तीं त्याचीं असावींत. हत्या वाईट, पण अमेरिकेच्या संरक्षणा-साठीं ती करणं आवश्यक असेल तर केली पाहिजे, अशी त्याची विचारसरणी दिसते. अन् अमेरिका देश कुणाचा असं कुणी विचारलं तर "The Human Comedy" या कादंबरींतल्या स्पॅग्लर या पात्राच्या तोंडानं सारोयान उत्तर देतो. "अमेरिका अमक्या एका जातीच्या, धर्माच्या, अगर वर्णाच्या मालकीची नाहीं. त्रिखंडांतून जे जे लोक अमेरिकेंत येऊन राहिले त्यांचा हा देश आहे!"

अशा उदात्त विचारांच्या एका उमद्या अमेरिकन लेखकाची तुम्हाला ओळख करून देण्यांत व मराठी रूपांत त्याचीं "The Human Comedy" ही कादंबरी तुम्हांला सादर करण्यांत मला फार आनंद वाटतो.

—ना. सी. फडके

# अनुवादासंबंधीं चार शब्द.

विल्यम सारोयान यांची "द ह्यूमन कॉमेडी" ही कादंबरी १९४४ च्या नोव्हेंबर महिन्याच्या शेवटीं शेवटीं माझ्या वाचण्यांत आली. या लेखकाचं नांव पहिल्या प्रतीचा अमेरिकन लघुकथालेखक म्हणून गाजलेलं असूनहि मला त्याच्या गोष्टी कधीं विशेष आवडल्या नाहींत. पण त्याची ही पहिलीच कादंबरी मला फार आवडली. तिचा मराठी अनुवाद करावासा मला वाटला. मी लगेच विल्यम सारोयान व कादंबरीचे प्रकाशक "फाबर अँड फाबर" यांना अनुवादाची परवानगी विचारण्यासाठीं पत्रं लिहलीं. सारोयान सैन्यांत दाखल झाले होते व त्यांचा निश्चित ठावठिकाणा प्रकाशकांना माहित नव्हता. पण त्यांनीं सारोयानचे एजंट "पर्न पॉलिजर अँड हिघॅम" यांजकडे माझं पत्र दिलं, व मग सारोयानची अनुमति माझ्या हातीं येण्यास अवकाश लागला नाहीं. मी अनुवाद करूं लागलों व तो "झंकार" मध्यें मार्च १९४५ पासून प्रसिद्ध होऊं लागला.

मराठी अनुवादांत कुठेंहि कंटाळवाणा भाग येऊं नये यासाठीं मूळ इंग्रजी पुस्तकाच्या ४८, ५१, ८९, ९६, ९७, ९८, ९९, ११०, १२२, १५०, १९६, व १९७ या पृष्ठांवरील थोडा फार मजकूर मी गाळला आहे, आणि १२ वं, १३ वं, १५ वं, २९ वं अन् ३० वं ही प्रकरणं वगळलीं आहेत. "आऊट ऑफ द नाइट" हें पुस्तक मराठींत आणण्याच्या वेळीं मी अशीच काटछाट केली होती. त्यामुळें मूळ आत्मचरित्राची गोडी व आकर्षकता वाढली असेंच सर्वांनीं मला सांगितलं. या अनुवादाच्या बाबतींतहि तसेच होईल अशी मला आशा आहे. सारोयानच्या मूळ कादंबरींत धर्म अन् परमेश्वर यांचं ठिकठिकाणीं भलतंच स्तोम माजविलेलं आहे. तें सर्वस्वी माझ्या स्वतःच्या मतांविरुद्ध आहे. परंतु त्या स्तोमाचा भाग गाळण्याचं स्वातंत्र्य मी घेणं अन्यायाचं ठरलं असतं. म्हणून मी तो जसाच्या तसा ठेवला. त्याचं सुंदर भाषांतर करणं हें अनुवादक या नात्यानं माझं कर्तव्य होतं. त्यांत मी किंचितहि कुचराई केली नाहीं. तें यथायोग्य पार पाडल्यावर आतां टीकाकार या नात्यानं मला म्हणतां येईल कीं सारोयानच्या लेखनांत धर्मपरायणता व ईश्वरविषयक श्रद्धा यांचा येवढा बडिवार माजविलेला पाहून फार विस्मय वाटतो.

या कादंबरीतला येवढा दोष वगळला तर मी ज्या उत्तम इंग्रजी अगर अमेरिकन कादंबऱ्या वाचल्या त्यांत हिचा अंतर्भाव मी निःशंकपणें करीन. कारण हिच्यांत कॅलिफोर्नियांतील एका छोट्या गांवांतील एका कुटुंबावर चालू महायुद्धाचे झालेले परिणाम सारोयान यांनीं फार मार्मिक रीतीनं दाखविले आहेत. कादंबरीचा नायक चवदा वर्षांचा एक मुलगा आहे. परंतु त्याच्याभोंवती सारोयान यांनीं जी मंडळी जमविली आहेत ती मोठी आकर्षक आहेत. त्यांत सात वर्षांच्या एका बालकापासून सदुसष्ट वर्षांच्या म्हाताऱ्यापर्यंत मंडळी आहेत, अन् प्रत्येकाचा स्वभाव विशेष भिन्न असला तरी सारीजणं आपल्याला प्रिय होण्यासारखीं आहेत. त्यांच्या सुखदु:खांची ही छोटी कहाणी वाचली, की त्यांच्या "इथाका" गांवा-बद्दल आपल्यालाहि आपलेपणा वाटतो, त्या गांवातल्या खोडकर पण हुशार पोरांचे गोड नमुने पुनः पुन्हां पहावेसे वाटतात, त्या गांवांचं एकंदर वातावरण हृद्य भासतं, अन् विशेष म्हणजे या छोट्या गांवांतली लहान थोर सारींच माणसं ज्या चिवट आशेनं आजचे कठीण दिवस काढीत आहेत तिचा मनावर खोल ठसा उमटतो ! या माणसांचीं बोलणीं चालणीं ऐकलीं व पाहिलीं कीं मनांत येतं, कीं युद्धक्षेत्रांत रणभेरी वाजत असल्या तरी भिण्याचं कारण नाहा. व्यापक जाणीव अन् धैर्य जिथें जिथें असेल तिथें जीवन-संगीताचे स्वर ऐकूं येतील.

म्हणून या मराठी अनुवादाला मी "**जीवन संगीत**" असं नांव दिलं आहे.

या कादंबरींत युलिसेस नांवाचा एक मोठा गोड बालक आहे. माझी मुलगी बेबी रोहिणी आम्हांला त्या युलिसेसची आठवण सारखी करून देते. ती एवढीशी आहे. आमच्या सोयीसाठीं "एवढीशीशी" "इवलीशीशी" "युलिसेस" असा अपभ्रंश होत गेला असं आम्ही समजतों, व बेबीला युलि-सेस म्हणून कधीं कधीं हांक मारतों. तिला हा अनुवाद मी अर्पण करतों.

६–ऑगस्ट–१९४५ —ना. सी. फडके

# माझी आई
# टाकुहि सारोयान
## हिला !

खास तुझ्यासाठीं एक कथा लिहिण्याची माझी इच्छा होती. अगदीं उत्तमांतली उत्तम अशी ती ठरली पाहिजे असं मला वाटत होतं. बरेच दिवस माझी ती इच्छा अपुरी राहिली होती. अखेर आज ती पूर्ण होत आहे. सध्यां मला सवडीचा वेळ फार थोडा मिळत असतांना मला हवी तशी कथा लिहून पुरी करण्याचा प्रयत्न मीं केला आहे. हा प्रयत्न मीं पुढें ढकलला असता तरी चाललं असतं. पण 'पुढं' ची शाश्वति कुणी धरावी, अन् महायुद्धांतली ही धडपड संपल्यावर मनाची धांव अन् लेखणीचं कसब कायम राहील याची तरी खात्री कुठें वाटते ? म्हणून थोडी घाई केली अन् जें लिहायचं तें लिहून टाकलं. लवकरच कुणी तरी कसबी लेखक या कथेचा आर्मेनिअन भाषेंत अनुवाद करील, अन् मग तो तुला वाचतां येईल अशी मी आशा करतों. इंग्रजीपेक्षां आपल्या मायभाषेंत ही कथा अधिकच सुरस वाटेल अन् तूं पूर्वी कितीकदां केलं आहेस त्या प्रमाणें मीं लिहिलेल्या या कथेंतले भाग तूं मलाच वाचून दाखवशील. मी तन्मतेनं ऐकत राहीन, अन् आपल्या मायबोलीच्या सौंदर्याचा आस्वाद घेईन. तें सौंदर्य परकीयांना माहीत नाहीं, अन् त्याची गोडी तर तुझ्याइतकी कुणालाच घेतां यायची नाहीं. तुला इंग्रजी फारसं कळत नाहीं अन् मला आर्मेनियन मुळींच लिहितां वाचतां येत नाहीं, तेव्हां तूं माझी ही कथा वाचायची अन् मीं ती ऐकायची ही गोष्ट या पुस्तकाचं भाषांतर होईल तेव्हांच घडेल पण येवढं खरं कीं ही कथा तुझ्यासाठीं आहे. ती तुला आवडेल. अंत:करणाचं काठिण्य व मार्दव यांचं योग्य मिश्रण हा आपल्या कुटुंबाचा—अन् विशेषत: तुझा—जो गुण तो वापरून अगदीं साध्या शैलीनं ही कथा मी लिहिली आहे. नुसती गोष्ट लिहिणं म्हणजे कांहीं मोठेसं नाहीं हें मला ठाऊक आहे. पण ही आपल्या मुलानं लिहिली, व सद्भावनेनं अन् कळकळीनं लिहिली त्या विचारानं तूं ती मोठी मानून घेशील याबद्दल माझी खात्री आहे.

—विल्यम सारोयान.

# १

छोटा युलिसेस मकॉले आपल्या घराच्या मागच्या अंगणांत हिंडता हिंडता एकदम थबकून उभा राहिला व निरखून पाहूं लागला. हें बीळ त्याला पूर्वी कधीं दिसलं नव्हतं. एखाद्या सशानं तें नवीनच केलं असलं पाहिजे. बिळांतून ताजी ओली माती बाहेर आली, आणि नंतर तो सशासारखा प्राणी आपलं चिमुकलं डोकं बाहेर काढून युलेसिसकडे पाहूं लागला. अरे हा मुलगा नवीनच दिसतो आहे, बाकी त्याच्या एकंदर चर्येवरून आपल्याला भ्यायचं कांहीं कारण नाहीं अशा अर्थानंच जणूं त्यानं आपले बारीक लुकलुकणारे डोळे युलिसेसकडे लावले होते. हा अद्‌भुत चमत्कार पोटभर पहात रहावा असं युलिसेसला वाटलं पण तितक्यांत काय झालं, एक पक्षी पंखांची फडफड करीत अंगणांतल्या ‘ वॉलनट ’ झाडाकडे आला, एका फांदीवर पंख मिटवून व्यवस्थित बसला आणि मग एकदम आनंदानं त्यानं किलबील सुरूं केली. त्यामुळें युलिसेसची मंत्रमुग्ध दृष्टि खालच्या जमिनीकडून वरच्या वृक्षशाखेकडे वळली. आणि मग लगेच सगळ्यांत मोठी गंमत झाली. दूर कुठेंतरी एक मालगाडी चालली होती तिचा धाड् धाड् आवाज ऐकूं आला व तिनं सोडलेला धूर आकाशांत दिसला, युलिसेसनं कानोसा घेतला. दूरच्या त्या आगगाडी-मुळें इकडे त्याच्या पायाखालची जमीन हादरून थरथर करीत होती! त्यानं एकदम धूम ठोकली. पळतांना त्याचं त्याला वाटत होतं, कीं अंतराळांतून इतक्या शीघ्र गतीनं जाणारी वस्तु साऱ्या जगांत आपल्या खेरीज कोणतीहि नसेल.

रेल्वेच्या फाटकाजवळ तो पोहोंचला तो अगदीं वेळेवर, एंजिनापासून तो शेवटच्या डब्यापर्यंत त्याला सबंध गाडी पहातां आली. एंजिनांतल्या माणसाकडे त्यानं आपला हात उंचावून हालविला, परंतु एंजिनवाल्यानं उलट हात हालविला नाहीं. ती मालगाडी होती, परंतु मधूनच एखाद्या डब्यांत तुरळक माणसं होतीं. त्यांच्याकडे पाहून युलिसेसनं हात हालविला, परंतु त्यांपैकीं एकानं देखील त्याला परत सलामी दिली नाहीं. हात हालविणं त्यांना कांहीं अवघड नव्हतं, पण त्यांनीं हालविला नाहीं खरा. मालाचें पांच सहा डबे एका मागून एक गेले, नंतरच्या एका डब्यांत एक काळाकभिन्न नीग्रो इसम कठड्याला टेंकून उभा असलेला युलिसेसला दिसला. गाडीच्या चाकांचा रुळांवर खडाड् खडाड् असा आवाज होत होता. पण त्यांतूनहि ऐकूं यावं इतक्या उंच आवाजांत तो नीग्रो गाणं म्हणत होता तें युलिसेसला ऐकूं आलं.

"सजणे, रडूं नको, बाई रडूं नको
आवर आसूं, आपण हांसू, गीत गाऊ घरदाराचं!"

युलिसेसनं हात वर केला व त्या नीग्रोला दाखवून हालविला. आणि केवढं आश्चर्य! गाडींतल्या इतर कोणींहि माणसानं जें केलं नव्हतं तें त्या नीग्रोनं केलं! त्यानं हात वर करून हालविला, व आरोळी ठोकली "घरला चाललों राजा! घरला निघालों!"

गाडी दूर जाऊन दिसेनाशी होईपर्यंत तो छोटा मुलगा आणि तो नीग्रो हात मारे एकमेकांना दाखवून उंचावीत होते. मग शुद्धीवर आल्याप्रमाणें युलिसेसनं आजूबाजूला पाहिलं. येवढा चमत्कार घडला तरी त्याच्या भोवतालचं जग जसंच्या तसंच होतं कीं स्तब्ध, शांत अन् चमत्कारिक! कांट्याकुट्यांनीं अन् केरानं भरलेलं, पदोपदीं विस्मय उत्पन्न करणारं, एखाद्या कूट प्रश्नासारखं परंतु भारी मोहक असं तें जग! रुळांच्या सडकेवरून पाठीवर ओझं घेतलेला एक माणूस हलके हलके जवळ आला. युलिसेसनं हात वर करून त्यालाहि दाखविला. पण एक तर तो माणूस फार म्हातारा होता, अन् शिवाय तो थकून गेला होता, त्यामुळें येवढ्याशा

चिमुरड्या पोरानं दोस्ती दाखवावी ही गोष्ट त्याला आवडली नसावी. त्यानं युलिसेसकडे नजर वळविली. परंतु एका प्रेतानं दुसऱ्या प्रेताकडे पहावं तशांपैकीं होती ती.

युलिसेसची स्वारी वळली अन् हलके हलके घरच्या रस्त्याला लागली. आगगाडीचा खडखडाट आणि विशेषतः "घराला चाललों राजा! घरला निघालों!" हीं एखाद्या गाण्याच्या पालुपदांसारखी वाटणारी त्या नीग्रोची हर्षभरित आरोळी त्याच्या कानांत अजून घुमत होती. या साऱ्या गंमतीचा विचार करण्यासाठीं म्हणून तो मध्येंच थबकलासुद्धां. एका छोट्या झाडाचीं पिवळीं पिवळीं उग्र वासाचीं रानफळं खालीं पडलीं होतीं ती त्यानं टाचेनं चिरडलीं. मग एकदम त्याच्या तोंडावर हास्य दिसूं लागलं. मकॉले कुटुंबांतल्या साऱ्याच माणसांची हे हास्य म्हणजे एक निशाणी होती. तें उगीच फुटलं न फुटलं इतकंच तोंडावर दिसे, आपल्याला सर्व कांहीं समजतय असं एक गुप्त समाधान त्यांत असे, आणि जणू जें जें दिसेल त्याचं स्वागत करण्यासाठीं तें प्रगट होत असे.

कोंपऱ्यापाशीं वळल्यावर युलिसेसला आपलं घर दिसूं लागलं. त्याबरोबर मध्येंच उजव्या पायावर लंगडी घातल्याप्रमाणें तो उड्या मारीत निघाला. त्या हर्षभरांत तो एकदां पडला, पण लगेच उठून पुन्हां पुढें निघाला.

त्याची आई पुढच्या अंगणांत कोंबड्यांपुढें दाणे टाकीत होती. युलिसेस पडला, उठला, व पुन्हां उड्या मारीत निघाला तें सारं तिनं पाहिलं. तो झटकन् आपल्या आईजवळ आला, कांहीं वेळ स्तब्ध उभा राहिला, आणि मग खुराड्यापाशीं गेला. एखाद्या कोंबडीनं नवं अंड घातलं आहे काय तें त्याला पहायचं होतं. एक अंडं त्याला दिसलं, त्यानं क्षणभर त्यांकडे निरखून पाहिलं, मग तें उचललं, आणि आईजवळ येऊन अतिशय जपून त्यानं तें तिच्या हातीं दिलं. या त्याच्या करण्याचा काय अर्थ होता तें कुणाहि मोठ्या माणसाला ओळखतां येणार नाहीं आणि लहान मुलाच्या लक्षांत राहणार नाहीं!

# २

युलिसेसचा चवदा वर्षांचा मोठा भाऊ होमर आड गिन्हाईकीनं घेतलेल्या एका सायकलवर बसून निघाला होता. रस्ता खराब होता आणि सायकल केर कचऱ्यांतून कशीबशी दमटावी लागत होती. तारवाल्या शिपायाचा पोषाख होमरनं अंगावर चढविला होता. परंतु डगला त्याला फारच सैल होत होता, आणि टोपी छोटी असल्यामुळें धड डोक्यावर बसत नव्हती. सूर्य अस्तास चालला होता; व आतां लवकरच जिकडे तिकडे अगदीं निःशब्द शांतता पसरणार होती. 'इथाका' गांवच्या लोकांना ही शांतता भारी प्यार वाटे. 'कॅलिफोर्निया' नांवाचा जो प्रदेश आहे त्या प्रदेशांतला हा 'इथाका' गांव हजारों उन्ह-पाऊस खाऊन जुन्या झालेल्या या प्रदेशांतल्या जमिनींत जिकडे पहावं तिकडे मळ्यांतल्या आणि बगीच्यांतल्या फळझाडांनीं आपले बुंधे विसाव्यासाठीं टेकले होतें. होमर वेगानं चालला होता, परंतु भोंवतालचं सौंदर्य त्याच्या नजरेंतून सुटत नव्हतं. माती, गवत, झाडंझुडपं, ढग, सूर्य यांपैकीं प्रत्येकाकडे पाहून तो स्वतःशीं म्हणत होता "ओ हो, तें पहा!" तो सायकल सरळ एका रेषेंत चालविण्याऐवजीं रस्त्यावरच्या धुळींत वाकड्या तिकड्या आकृति उठाव्या म्हणून उजवी डावीकडे चाक वळवित चालला होता, आणि हव्या तशा आकृती उठविल्याचा आनंद व्यक्त करण्यासाठीं तो तोंडानं गाणं म्हणत होता. साधंसुधं, जवळ जवळ अर्थशून्य असं कांहींतरी गाणं होतं तें. पण तें म्हणतांना होमरनं आपल्या मनाशीं अशी कल्पना केली होती, कीं त्याच्या घरांतलीं सारीं माणसं मिळून त्याचे स्वर काढीत आहेत, त्याची आई 'हार्प' च्या तारा छेडीत आहे, त्याची बहीण बेस पियानो वाजवीत आहे. परंतु हें चित्र अपुरं होतं, तें पुरं करण्यासाठीं होमरनं आपला थोरला भाऊ मार्कस् यालाहि कल्पनेनं घरीं आणला. मग मात्र सबंध कुटुंबाचं चित्र पूर्ण झालं. मार्कस् आपला बाजा वाजवूं लागला आणि हंसत हंसत तो तें गीत तोंडानं म्हणूं लागला तेव्हां त्या गीताचे स्वर गंभीर आणि गोड वाटूं लागले.

परंतु होमरनं आपल्या कल्पनेपुढें उभं केलेलं तें चित्र आणि संगीत एकदम धक्का बसल्याप्रमाणें विरून गेलं. वर आभाळांतून एकदम मोठी घर घर ऐकूं येऊं लागली. तीन विमानं वेगानं निघालीं होतीं. होमरनं वर मान करून त्यांकडे पाहिलं, आणि झटकन् एका खड्डयाकडे आपली सायकल नेली. एका शेतकऱ्याचा कुत्रा जोरानं धांवत आला, आणि जणू आजूबाजूच्या सर्व लोकांना इषारा देण्यासाठीं भुंकूं लागला. "हाड् हाड्" असं एकदां म्हणण्यापलीकडे होमरनं त्या कुत्र्याकडे लक्ष दिलं नाहीं. जरा वेळानं तो पुन्हा आपल्या सायकलवर बसला आणि पुढें निघाला.

शहरांतल्या वस्तीचा भाग जवळ आला तेव्हां रस्त्याच्या कडेला त्याला एक मोठी पाटी लागली. ती त्यानं वाचली नाहीं. तिच्यावर काय लिहिलं आहे तें त्याला माहीत झालं होतं.

"इथाका, कॅलिफोर्निया
सु स्वा ग त म्"

पुढच्या कोपऱ्यावर होमरला थांबावं लागलं. लष्करी शिपायांनीं भरलेल्या मोठमोठ्या मोटारींची रांगच्यारांग रस्त्यानं निघाली होती. युलिसेसनं ज्याप्रमाणें आगगाडींतल्या लोकांना सलाम ठोकला होता त्याप्रमाणें होमरनं या शिपायांना सलाम केला. पुष्कळांनीं होमरला उलट सलाम केला. होमर कोण तें त्यांना माहीत नव्हतं. परंतु तसं पाहिलं तर जगांतली कोणती व्यक्ति अगर वस्तु त्यांना नीट माहीत होती ? आणि असं असलं तरी सलाम करायला काय हरकत आहे ?

## ३

अखेर तार ऑफीसपाशीं होमर सायकलवरून खालीं उतरला तेव्हां चांगलीच संध्याकाळ झाली होती. ऑफीसच्या खिडकींत जें घड्याळ होतं

त्यांतला मिनिट काटा सात वाजले असं दर्शवून दोन घरं पुढें सरकला होता. आंत ऑफीसचा मॅनेजर स्पॅंग्लरसाहेब एका तारेच्या फॉर्मवरील शब्द मोजीत होता. ज्यानं तार लिहून दिली तो सुमारें वीस वर्षांचा एक तरुण इसम होता. त्याची चर्या थकल्यासारखी त्रासल्यासारखी दिसत होती. होमर ऑफीसांत शिरला तेव्हां पुढील संवाद त्याच्या कानांवर आला.

"चवदा शब्द होतात" स्पॅंग्लर म्हणाला. नंतर त्या तरुणाकडे हलकेच नजर टाकून त्यानं विचारलं, "पैशाच्या फिकीरींत आहेस काय ?"

तो पोरसवदा तरुण क्षणभर कांहींच न बोलतां उभा राहिला. पण मग तो म्हणाला "होय, थोडासा फिकीरींत आहे. परन्तु माझी आई पाठवील थोडेसे पैसे आणि मग मला घरीं जातां येईल."

स्पॅंग्लरसाहेब म्हणाला, "हो हो, आवश्य पाठवील. इकडे या गांवीं कसा आलास ? रोजगारासाठीं ?"

"छे–छे ! उगाच..." असं म्हणत तो मुलगा खोकूं लागला. त्यानं विचारलं, "माझ्या आईला ही तार पोंचायला किती वेळ लागेल ?"

स्पॅंग्लरसाहेब म्हणाला, "वेळ होय ? आं......हें पहा, तिकड पूर्वेकडच्या प्रांतांत एव्हांना चांगलीच रात्र झाली असेल. अशावेळीं तुला लगेच पैसे धाडणं तुझ्या आईला सहज शक्य होईल असं मला नाहीं वाटत. तार शक्य तों लवकर जावी असा मी प्रयत्न करतों. पण......"

त्या मुलाकडे न पाहतां स्पॅंग्लरनं आपले खिसे चाचपले आणि मूठभर नाणीं, एक नोट, आणि एक अंडं एवढ्या वस्तू बाहेर काढल्या. त्यांतली नोट त्या मुलाच्या हातावर ठेवीत तो म्हणाला, "ही घे, गरज लागली तर असूं दे. तुझ्या आईकडून पैसे आले कीं तूं वाटलं तर माझे पैसे परत दे." नंतर त्या अंड्याकडे हात दाखवून तो म्हणाला, "आठ दिवसांपूर्वी एका 'बार' मध्यें हें मी खिशांत घातलं. मोठं शकुनाचं आहे."

हातांतल्या नोटेकडे बघत त्या मुलानं विचारलं, "हें काय ?"

स्पॅंग्लर म्हणाला, "कांहीं नाहीं."

" थँक्स " असं पुटपुटून तो मुलगा थांबला. तो विस्मयचकित झाला होता, गोंधळून गेला होता. " थँक्स् " असं पुन्हां म्हणून तो एकदम ऑफिसमधून बाहेर पडला.

रात्रपाळीचा मुख्य तारमास्तर विल्यम ग्रॅागन कोंपऱ्यांत आपल्या कामांत गुंतला होता. स्पँग्लरसाहेब त्याच्याजवळ गेला व म्हणाला, " विली, ही तार ताबडतोब जाऊं दे पाहूं. पैसे मी देतों हं. "

ग्रॅागननं यंत्र किंचित् पुढं ओढल्यासारखं केलं, आणि तारेंतील एकेक शब्द वाचून तो कड्कट्ट कड्कट्ट करूं लागला—

मिसेस मार्गारेट स्ट्रिक्मन
१८७४ बिडल् स्ट्रीट
यॉर्क, पेनसिल्व्हानिआ.

प्रिय आई, कृपा करून तीस डॉलर तारेनं पाठव. मला घरीं यायचं आहे. मी मजेंत आहे. सगळं ठीक आहे.

—जॉन

होमर टेबलाजवळ गेला व घेऊन जाण्यासाठीं कांहीं तारा तयार होऊन पडल्या आहेत कीं काय तें पाहूं लागला. स्पँग्लरसाहेब त्याच्याकडे अशा कांहीं नजरेनं बघत होता कीं त्याला किती पाहू अन् किती नको असं त्याला वाटत असावं. त्यानं विचारलं,

" तारवाल्या शिपायाचं हें काम तुला कसं काय आवडतं रे ? "

" कसं काय आवडतं ? कांहीं विचारूं नका. दुसरी कोणतीच गोष्ट मला इतकी गमतीची वाटत नाहीं. किती तऱ्हेतऱ्हेचे लोक भेटतात. अन् किती निरनिराळ्या ठिकाणीं जायला मिळतं ! "

" हं " असं म्हणून स्पँग्लर त्याच्याकडे आणखी निरखून बघत थांबला. मग त्यानं विचारलं. " काल रात्रीं तुला झोंप कशी काय लागली रे ? "

" बेस ! मी फार दमून गेलों होतों, पण झोंप अशी लागली म्हणतां !"

" आज शाळेंत थोडासा झोंपला होतास काय ? "

होमर म्हणाला, " तें कां ? माझं खेळणं कांहीं अजिबात बंद झालेलं नाहीं. आम्हांला रोज व्यायामाचा तास असतो. "

" होय का ? हं. मी जेव्हां हायस्कूलमध्यें होतों तेव्हां ताट्या ओलांडण्याच्या शर्यतींत मी भाग घेत असें. चँपियन होतों मीं. " स्पँग्लर जरासा थांबला, व मग त्यानं विचारलं " तुला हें काम फार आवडतं असं दिसतं, होय ना ? "

होमर म्हणाला, " तुमच्या ऑफीसला कधीं मिळाला नाहीं असा एक नंबरचा पटाईत तारवाला होणार आहे मी. "

" शाबास, शाबास ! मात्र जिवाला जप हं—सायकलवरून जरा बेतानं जात जा. जलद जावं. पण भलतीच घाई धरूं नये. प्रत्येकाशीं आदबीनं वागावं. लिफ्टमध्यें शिरलं, कीं डोक्यावरची टोपी काढावी. आणि सगळ्यांत महत्वाची गोष्ट ही, कीं हातांतली तार कधीं सांडू नये. "

" आलं लक्षांत. "

स्पँग्लर पुढें सांगू लागला, " तारा पोंचविण्याचं काम दिवसा करणं निराळं अन् रात्रीं करणं निराळं. चिनी लोकांच्या वस्तींत अगर अशाच एखाद्या ठिकाणीं तार पोंचवायची असली म्हणजे भीति वाटणं साहजिक आहे. पण तूं भीत जाऊं नकोस. माणसं आपल्यापेक्षां निराळीं दिसलीं तरी माणसंच तीं ! तीं काय करतात आपल्याला ? तुझं वय काय ? "

होमरनं आंवढा गिळला व म्हटलं " सोळा "

" असं कालहि सांगितलंस तूं मला. सोळा वर्षांच्या आंतल्या मुलांना आम्ही नोकरीवर घेत नसतों. तुझ्या बाबतींत मी मनाशीं विचार केला बघुंया तरी याला ठेवून, म्हणून तुला कामावर घेतलं. पण आतां खरं सांग, किती वर्षांचा आहेस तूं ? "

होमर म्हणाला " चवदा "

" हं, म्हणजे दोन वर्षांत होशीलच सोळा वर्षांचा. "

" होय ! "

" तुला आपल्या कामांतली एखादी गोष्ट समजली नाहीं, कीं मला विचारीत जा, बरं का. "

" हो. " होमर कांहीं वेळ थांबला व मग त्यानं एकदम विचारलं.

" ज्यांतले संदेश गात गात पोंचवायचे असतात अशा तारा आल्या म्हणजे काय करायचं ? "

" त्यांत काय आहे ? सोपं आहे ! अशा तारा आधीं फारशा येत नाहींत. आल्या तरी त्यांत अडचण काय ? तुझा आवाज चांगला असेलसं वाटतं. अं ? "

" हो, मागं शाळेंत मी शिकत होतों गायला. "

स्पँग्लर म्हणाला " होय ना? मग झालं तर ! जरा तयार असला आवाज म्हणजे पुरे कीं ! आपण परीक्षाच घेऊं या तुझी. समज तो तिथें ग्रॉगन बसलाय ना, त्याला कुणी तरी वाढदिवसाचा अभीष्ट चिंतनपर संदेश पाठविला आहे, आणखी तो तुला पोंचवायचा आहे. कसा जाशील गात गात दाखव पाहूं. "

होमर ग्रॉगनकडे पावलं टाकीत गाऊं लागला,

" घ्या हो घ्या हो अभीष्टचिंतन
जन्मदिनाचें हें शुभचिंतन "

स्पँग्लर म्हणाला,, " वा, फक्कड ! पण काय रे तुला दर आठवड्याला आम्हीं पंधरा डॉलर देणार त्यांचं तूं काय करणार ? "

" आईच्या स्वाधीन करणार. "

" ठीक आहे. या क्षणापासून तुझ्या नोकरीला आरंभ झाला असं समज. संभाळ, आमच्याप्रमाणेंच तूं देखील या ऑफीसचा एक महत्वाचा

भाग आहेस हें लक्षांत ठेव. डोळे आणखी कान सारखे उघडे ठेवले पाहिजेत तुला...मोठेपणीं काय करायचा बेत ठरविला आहेस तूं ?"

"बेत ?" होमर थोडासा गोंधळला. त्याला समजूं लागल्यापासून रोजच्या रोज तो मनाशीं बेतच ठरवीत आला होता. उद्यां अमुक करायचं, उद्यां तमुक करायचं असे बेत तो रोजच्या रोज मनाशीं करीत नसे काय ? तो म्हणाला, "तसं कांहीं सांगतां येत नाहीं मला. पण मला वाटतं केव्हां तरी कुणी तरी बडा माणूस होणं आवडेल मला. मोठा संगीतकार. किंवा अशांपैकींच कांहीं तरी."

स्पॅंग्लर म्हणाला, "होय ? मग फारच छान. मग प्रारंभ करायला या सारखं दुसरं ठिकाण नाहीं. कारण या ठिकाणीं सारखं संगीत चालू असतं. 'सारेगम'चं निर्जीव संगीत नव्हे, तर खरोखरीचं सजीव संगीत ! दाही दिशांकडून, दूरदूरच्या माणसांच्या अंतःकरणाच्या तारा सुखदुःखांनीं छेडल्या जात असतात, आणखी त्यांचे स्वर इथें उमटत असतात. त्या यंत्राकडे लक्ष देऊन ऐक. कडकट्ट कडकट्ट ! याला म्हणतात जिवंत संगीत !"

"हं !"

स्पॅंग्लरनं त्याला एकदम विचारलं, "ब्रॉडवे रस्त्यावर चॅटरटनचा भटारखाना आहे तो तुला माहीत आहे काय ? हे पैसे घे, आणखी सफरचंदाचे वाफोळे घेऊन ये. नारळाची मलई पाहिजे बरं कां. दोन आण."

होमर म्हणाला "आणतों." स्पॅंग्लरनं नाणं फेंकलं तें त्यानं पकडलं आणि धूम ठोकली. स्पॅंग्लर त्याच्याकडे बघत राहिला, आणि हलके हलके आपल्या मनाशीं कसलीं तरी स्वप्नं रंगविण्यांत गुंग झाला. थोड्या वेळानं भानावर आल्यावर तारायंत्राजवळ बसलेल्या ग्रॉगनकडे बघून त्यानं विचारलं, "कसा काय वाटतो तुला हा छोकरा !"

ग्रॉगन म्हणाला "चांगला आहे."

"मला तर आवडला बुवा. गरीब पण प्रतिष्ठित कुटुंबांतला आहे. 'सॅन्टा क्लॅरा' रस्ता आहे ना, तिथें राहतात ही मंडळी. याचा बाप मेलेला

आहे. थोरला भाऊ लढाईवर गेलेला आहे. आई काम करून पैसे मिळविते. बहीण कॉलेजांत आहे. आतां याचं वय असावं त्याहून दोन वर्षांनीं कमी आहे. पण—"

"माझं दोन वर्षांनीं जास्त आहे. मिळून गोळा बेरीज एक झाली म्हणायला हरकत नाहीं! ठीक आहे आपला संच."

स्पँग्लर आपल्या जागेवरून उठला, व म्हणाला "हें बघ विली, मी जरा बाहेर जातों आहे. त्या पोराला दोन वाफोळे आणायला सांगितले आहेत ते तूं आणि तो मिळून खाऊन टाका." तितक्यांत कागदांत गुंडाळलेले वाफोळे घेऊन होमर धांवत येऊन थडकला. त्याच्याकडे आश्चर्यानें पहात स्पँग्लरनं ओरडून विचारलं—

"अरे तुझं नांव विसरलोंच पुन्हां?"

"होमर मकॉले"

त्याच्या गळ्याभोंवतीं हात टाकून त्याला कुरवाळीत स्पँग्लर म्हणाला, "होमर मकॉले! छान! आमच्या ऑफीसच्या रात्रीच्या कामाला अगदीं हवा तसा तूं आहेस. अशी विद्युतवेगानें धांवणारी एकहि वस्तू या टापूंत खचित नसेल. मोठेपणीं तूं खरोखरीच कुणी बडा माणूस होशील—म्हणजे मोठा होईपर्यंत जिवंत राहिलास तर—तेव्हां जिवंत राहायचं लक्षांत ठेव."

स्पँग्लर झटकन वळला आणि निघून गेला. त्याच्या बोलण्याचा काय अर्थ असावा याचा विचार करीत होमर उभा राहिला. इतक्यांत ग्रॅगननं त्याला म्हटलं, "बेटा, वाफोळे आणले आहेस ना?"

होमरनं पुडा ग्रॅगनपुढें ठेवला. ग्रॅगन त्याच्याशीं बोलूं लागला "हें बघ होमर मकॉले, आधीं माझं नांव तुला सांगतों. विल्यम ग्रॅगन. मात्र मी जरी सदुसष्ट वर्षांचा झालों आहे तरी मला सारीजणं म्हणतात विली. मी एक जुना तारमास्तर आहे. अगदीं जुन्यांतला जुना. बाकीचे गेले, मी एकटाच उरलों आहे. या कचेरींतल्या तारखात्याचा मी मुख्य आहे. बदलत्या दुनियेचे शेकडों रंग मी पाहिले आहेत, आणि माझ्या डोळ्यांदेखत जीं नवीं जगं उत्पन्न झालीं

व नाहींशीं झालीं त्यांच्या आठवणींनीं माझं डोकं भरलेलं आहे. या क्षणाला माझं पोट मात्र रिकामं आहे. भूक फार लागलेली आहे मला. तेव्हां चला आपण दोघं या मेजवानीवर हात मारूं या. सफरचंदाचे वाफोळे आणि वर नारळाची मलई ! या क्षणापासून तुम्हीं आम्हीं दोस्त. लक्षांत ठेव."

"बरं."

त्या म्हाताऱ्या तारमास्तरनं एक वाफोळा उचलून त्याचे बरोबर चार तुकडे केले व ते दोघेजण खाऊं लागले. ग्रॅागन खातां खातां सांगूं लागला, "हें बघ, कधीं कधीं माझा एखादा निरोप घेऊन जायला सांगेन मी तुला. कधीं कधीं माझ्याबरोबर गायला सांगेन. आणि एखाद्या वेळीं म्हणेन जरा बैस आणि बोल. कधीं कधीं प्रमाणाबाहेर दारु घेऊन मी झिंगलेला असेन. झिंगलेल्या माणसाशीं कसं वागावं तें मोठ्या माणसांना कळत नाहीं. बारा वर्षांच्या आंत ज्यांचं वय आहे अशा लहान मुलांना कळतं. तुझं वय किती ?"

होमर म्हणाला, "चवदा. परंतु केव्हां कसं वागावं हें मला फार चांगलं समजतं."

"ठीक आहे. समजतं असं तूं म्हणतोस तें खरं धरून चालूं या. रात्रीं माझं काम मी बरोबर करतों कीं नाहीं याच्यावर तुला लक्ष ठेवावं लागेल. एखादे वेळीं मी आपल्या खुर्चीत निपचीत पडलों आहे असं तुला आढळून आलं तर काय करायचं तें नीट ऐकून ठेव. आधीं मला गदगदा हालवायचं. तेवढ्यानं जागा झालों नाहीं तर चांगलं भांडभर गार पाणी माझ्या तोंडावर मारायचं. आणखी मग लगेच 'कॅार्बेट'चं हॉटेल माहीत आहे ना तुला तिथून गरमा गरम कॉफीचा पेला आणून माझ्यासमोर ठेवायचा. लक्षांत आलं ना ?"

"आलं"

ग्रॅागन पुढें म्हणाला, "रस्त्यांत मला तूं झिंगलेल्या स्थितींत पाहिलंस तर मात्र वागण्याची तऱ्हा अगदीं निराळी ठेवायची बरं का. माझ्याकडे पाहून मंदस्मित करायचं आणखी मला अभिवादन करायचं. माझ्या सुखसमाधीचा उल्लेखसुद्धां करायचा नाहीं. मी थोडासा हळव्या मनाचा आहे,

आणि चारचौघांत माझ्याविषयीं कुणी अनुकंपा दाखविलेली मला आवडत नाहीं. "

होमर जणू पाठ करीत म्हणाला, " ऑफीसांत थंड पाणी आणि गरम कॉफी, पण रस्त्यांत मात्र फक्त सलामी ! आलं लक्षांत ! "

तोंडांतून नारळाची मलई सांडूं नये म्हणून आवरून ग्रॉगन म्हणाला, " काय रे, या महायुद्धानंतर जगाला अधिक बरें दिवस येतील असं वाटतं कां तुला ? "

होमरनं किंचित् विचार केला, व म्हटलं " हो, वाटतं. "

" नारळाची मलई आवडते का तुला ? "

" तर ? "

तितक्यात तारायंत्रानं कडकट्ट केलं, ग्रॉगननं संदेश घ्यायला सुरवात केली पण तो बोलत राहिलाच. " नारळाची मलई मलासुद्धां फार आवडते. आणखी काय आवडतं सांगूं काय ? संगीत. त्यांतल्यात्यांत गाणं. तूं शाळेंत असतांना गायला शिकत होतास असं मघाशी म्हणालास तें ऐकलं मी. एखादं गाणं म्हण पाहूं. तें ऐकतां ऐकतां मी हा संदेश टाईप करतों. "

होमर " रॉक ऑफ एजेस " हें गाणं म्हणूं लागला. ग्रॉगन संदेश उतरून घेऊं लागला. मिसेस् रोझा सॅन्डोव्हॉल या बाईला आलेला होता तो संदेश. युद्धखात्याकडून तिला कळविण्यांत आलं होतं, कीं तिचा मुलगा ज्युऑन डॉमिंगो लढाईत मारला गेला होता !

ग्रॉगननं ती तार होमरच्या हातीं दिली. मग टेबलाच्या खणांत त्यानं नेहमीं ठेवलेली असे ती दारूची बाटली काढली, आणि बाटलीच तोंडाला लावून त्यानं चांगला मोठा घोट घेतला. होमरनं तारेच्या कागदाची घडी केली, पाकिटांत घातली, सील केलं, लिफाफा टोपींत ठेवून दिला आणि तो बाहेर पडला. तो गेल्यानंतर त्या म्हाताऱ्या तारमास्तरानं अगदीं मोकळ्या उंच आवाजांत " रॉक ऑफ एजेस " हें गाणं म्हणायला प्रारंभ केला. कारण तोहि एके काळीं आजच्या मुलांप्रमाणेंच तरुण होता नव्हे काय ?

# ४

सॅन्टा क्रॅरा रस्त्यावरच्या मकॉले कुटुंबाच्या घरांतून संगीत ऐकूं येत होतं. होमरची बहीण बेस पियानो वाजवीत होती, व होमरची आई हार्प वाजवीत होती. "साऱ्या जगानं माझ्या भाग्याचा हेवा करावा" अशा अर्थाचा प्रारंभ असलेलं पद त्या दोघीं वाजवीत होत्या. मार्कस् लढाईवर गेला होता. यावेळीं तो कोठें असेल याची त्यांना कल्पना नव्हती. परन्तु त्या गीताचं वादन त्याच्यासाठींच चाललं होतं. कारण हें त्याचं सगळ्यांत आवडतं गाणं होतं. थोड्या वेळानं शेजारच्या घरांतील मेरी आंत आली, कांहीं वेळ पियानो वाजविण्याच्या बेसजवळ ती उभी राहिली, आणि मग ती गाऊं लागली. आपण मार्कससाठीं गात आहोंत अशीच तिनं देखील कल्पना केली. कारण तिचं तर मार्कस म्हणजे जीवनसर्वस्व होतं.

छोटा युलिसेस एकाग्र चित्तानं ऐकत होता, व त्या तिघींकडे बघत होता. त्या छोट्याशा दिवाणखान्यांतील वातावरणांत कुठेंतरी कसलं गूढ आहे असं त्याला वाटत होतं, आणि तें गूढ जाणण्याची त्याला तीव्र इच्छा होती. एकीकडे त्याला झोंप येत होती. परन्तु या तीव्र इच्छेमुळें जागं राहण्याचा प्रयत्न तो करीत होता. बराच वेळ तो जागच्याजागीं स्तब्ध पडून राहिला. परन्तु अखेर त्यानं प्रयत्नानं मोठा आवाज करून विचारलं—

"मार्कस् कुठें आहे?"

त्याच्या आईनं त्याच्याकडे वळून पाहिलं, व ती हलकेंच म्हणाली, "आतां तुला समजायला हवं."

"मार्कस गांव सोडून गेला आहे."

"कां गेला ग?"

"लढाईवर गेला ना."

"घरीं केव्हां परत येणार आहे तो?"

" लढाई संपली म्हणजे. "

" उद्यां ? "

" नाहीं, उद्यां नाहीं. "

" मग केव्हां ? "

" कुणास माहीत केव्हां तें ? पण आपण वाट पहात आहोंत. तेव्हां येईलच तो. "

युलिसेस म्हणाला, " आणखी बाबा कुठें गेले आहेत ? आपण वाट पाहिली तर मार्कस्सारखें ते देखील घरीं परत येतील काय ? "

त्याची आई म्हणाली, " नाहीं. मार्कससारखें येणार नाहींत. पूर्वी ते रस्त्यानं येऊं लागले कीं आपल्याला दिसत असत, पायऱ्या चढून येत, आणि दारांतून आंत शिरत, तसे ते आतां कधीं येणार नाहींत. "

छोट्या युलिसेसला आईच्या या बोलण्यातलं एक अक्षर समजलं असेल तर शपथ. एखाद्या गोष्टीचा उलगडा करून घ्यायचा असेल तर एकाच शब्दाचं हत्यार युलिसेसला माहीत झालं होतं. तो शब्द त्यानं उच्चारला.

" कां ? "

त्याची आई, बेस आणि मेरी यांच्याकडे पाहून त्याच्या प्रश्नाचं उत्तर देऊं लागली. ती म्हणाली, " मृत्यूचा अर्थ फार गहन आहे. तो एवढ्याशा लहान मुलाला कुठून कळणार ? सृष्टींतल्या प्रत्येक जीवाचा केव्हां ना केव्हां अंत व्हायचाच असतो. " युलिसेसकडे बघून ती म्हणाली, " दोन वर्षांपूर्वी तुझ्या वडिलांचा अंत झाला. " पुन्हां बेस आणि मेरी यांच्याकडे वळून ती बोलूं लागली, " मात्र जोपर्यंत आपण जिवंत आहोंत, एकत्र आहोंत, त्यांची आठवण काढीत आहोंत तोंपर्यंत तें सदैव आपल्यांतच असतील. त्यांचं शरीर नाहींसं झालं. पण ते आहेतच. तुम्हीं जसजशीं वाढाल, आपण कोण हें तुम्हाला जसजसं अधिक कळेल तसतशी तुमच्या वडिलांची ओळख तुम्हाला अधिक पटेल. ते नष्ट झालेले नाहींत. कारण तुम्हीं आहांत.

श्रम, आजार, वय इत्यादींनीं त्यांचीं काया नाहींशीं केली. पण तुमच्या रूपानं त्यांनीं पुन्हा देह धारण केला आहे. या देहांत अधिक चैतन्य आहे, अधिक प्रसन्नता आहे, अधिक उत्कंठा आहे. मी जें हें सांगतें आहे त्याचा अर्थ तुम्हाला कळणार नाहीं हें माहीत आहे मला. पण एक गोष्ट लक्षांत ठेवा म्हणजे झालं. या जगांत म्हणून जे जें कांहीं असेल त्याचा कधीं देखील अंत होत नाहीं, तसा अंत होत असता तर या जगांत माणसंच शिल्लक राहिलीं नसतीं ! संसाराची धडपड कुठेंहि दिसली नसती ! परंतु जगांत माणसं आहेत, आणि संसारांतली परोपरीची मजा जिकडे तिकडे चालली आहे ! तेव्हां— "

आईचं तें बोलणं छोट्या युलिसेसनं अगदीं लक्षपूर्वक ऐकलं. त्या बोलण्यांतल्या 'मजा' या शब्दावरून सकाळीं पाहिलेल्या एका गंमतीची त्याला आठवण झाली. त्यानं विचारलं,

"आई, ससे काय करतात ग ?"

तो असा कांहीं तरी प्रश्न विचारील ही जणूं कांहीं त्याच्या आईला कल्पना होती. कारण तिला माहीत होतं, कीं या तिच्या छोट्या बालकाला डोळे तर होतेच, परंतु डोळ्यांपलीकडे जी एक अंतर्यामींची दृष्टि असावी लागते तीहि होती, आणि केवळ तसेंच नव्हे तर जें जें दिसेल त्या सगळ्या-बद्दल जिज्ञासा आणि प्रीति होती.

ती म्हणाली, "खालीं जमिनींत बिळं करून राहणारे ससे, वर आभाळांत घिरट्या घालणारे पक्षी, समुद्रांत राहणारे मासे—सृष्टीचे हे सारे अंश आहेत. अर्थात् आपल्या जीवनाचे देखील. चैतन्यमय अगर जड असं जें जें कांहीं आपल्याला दिसतं तें आपल्या जीविताशीं जोडलेलं आहे. सूर्य, पृथ्वी, आकाश, तारे, नद्या, समुद्र—या साऱ्यांचा आपल्या जीवितांत समावेश होतो. आपण मनुष्य-जन्माला आलों तें कशासाठीं, तर या सगळ्यांचा आनंद घेण्यासाठीं व हा आनंद ज्याच्या कृपेमुळें आपल्याला लाभला त्या प्रभूचं कृतज्ञतापूर्वक स्मरण करण्यासाठीं."

छोट्या युलिसेसनें हे सारं ऐकून घेतलं व विचारलं, "पण मग होमर कुठें आहे ?

"तो आपल्या कामावर गेला आहे. शाळा सुटल्यावर करतां येईल अशी एक नोकरी काल त्याला मिळाली आहे. काम आटपून तो घरीं येईल तेव्हां मध्यरात्र झालेली असेल. तूं आपल्या अंथरुणांत निजलेला असशील."

आईचं हें बोलणं युलिसेसच्या ध्यानांत नीटसं येईना. तो मनाशीं विचार करूं लागला, काम म्हणजे काय बुवा ? आपल्या भावानं काम कशासाठीं करायचं ? काम करण्यांत माणसाला गंमत ती काय वाटते ?... त्यानं विचारलं.

"होमरनं नोकरी धरली ? ती कां ?"

यावर आई काय उत्तर देतें तें पाहण्यासाठीं बेस आणि मेरी स्तब्ध राहिल्या.

आई म्हणाली, "कारण तुझा सगळ्यांत वडील भाऊ मार्कस् लढाईवर गेला आहे ना. आपल्याला जेवायला हवं, कपडे हवेत, घरभाडं दिलं पाहिजे, म्हणून होमरनें काम केलं पाहिजे. शिवाय आपण लोकांना कांहीं तरी द्यायला नको कां ?"

"लोकांना ? म्हणजे कुणाला ?"

"जीं माणसं गरीब असतील त्यांना."

"पण गरीब कोण असतं ?"

"पुष्कळ असतात" असं सांगून त्याची आई स्वतःशीं किंचित् हंसली.

युलिसेस जागं राहण्याचा अगदीं कसून प्रयत्न करीत होता. पण आतां झोपेनं त्याला अगदीं गाठलंच.

त्याची आई म्हणत होती, "आपल्याजवळ जें जें कांहीं असेल त्यांतला वांटा दुसऱ्याला द्यायला हवा हें नेहमीं लक्षांत ठेवा. तो वांटा देतांना अविचार घडला तरी हरकत नाहीं, उधळपट्टी झाली तरी हरकत नाहीं.

ज्यांचा ज्यांचा म्हणून तुमच्याशीं संबंध येईल त्यांना तुम्ही जें जें शक्य तें तें दिलं पाहिजे. मग तुम्हांला कोणी फसवील अगर दुःख देईल असा संभवच उरायचा नाहीं. चोराला तुमची जी वस्तू हवी आहे ती तुम्हीं त्याला देऊन टाकलीत तर त्याला ती मग चोरतां यायची नाहीं, आणि मग त्याचा चोरपणाहि शिल्लक राह्यचा नाहीं. आणि जितकं जास्त जास्त तुम्ही द्यायला लागाल तितक्या देण्यासारख्या गोष्टी तुमच्याजवळ अधिकाधिक साठूं लागतील...बेस, याला नेऊन त्याच्या अंथरुणांत ठेव."

बेस आणि मेरी दोघींनीं मिळून झोंपी गेलेल्या युलिसेसला उचलून खोलीकडे नेलं. त्या गेल्यावर युलिसेसची आई एकटीच बसली. कांहीं वेळानं तिला वाटलं मागच्या बाजूस कुणाची तरी पावलं वाजलीं. तिनं मागं वळून पाहिलं. युलिसेसचे वडील दारांत उभे असलेले तिला दिसले. जणू ते इहलोक सोडून गेले नव्हतेच !

त्यांचं बोलणं तिला ऐकूं आलं. "मी निजलों होतों. मला फार झोंप आली होती म्हणून इतके दिवस मी घरीं आलों नाहीं. केटी, मला माफ कर."

असं म्हणून ते हंसले. अगदीं हुबेहुब युलिसेसच्या हंसण्यासारखा त्यांच्या हंसण्याचा आवाज वाटला ! तितक्यांत बेस परत आली ती म्हणाली, "आई निजतां निजतां युलिसेस केवढ्यांदा हंसला ऐकलंस ना ?"

## ५

मिसेस रोझा सॅन्डोव्हालच्या घरापुढें होमर सायकलवरून खालीं उतरला. तो दाराजवळ गेला आणि त्यानं हलकेच कडी वाजविली. आंत कुणाची तरी चाहूल ताबडतोब झाली. कुणी ओ दिली नाहीं, परन्तु कुणी

तरी दाराकडे पावलं टाकीत येत होतं खास. जी व्यक्ति आतां दार उघडील ती कशी असेल असं होमरच्या मनांत सारखं येत होतं. ही रोझा नांवाची जी कोणी स्त्री होती, तिला जगांतल्या एका भयंकर हत्येची बातमी कळायची होती. त्या बातमीचे शहारे तिच्या अंगभर उठणार होते !...इतक्यांत दार उघडलं गेलं. मात्र तें घाईनें नव्हे, तर दाराच्या फळ्या बिजागऱ्यांवर अलगद हालल्याप्रमाणें. जणू जिनं तें उघडलं तिला भयप्रद असं कांहीं आपल्याकडे चालून येत असेल असं वाटतच नव्हतं. दार पुरतं उघडलं गेलं. होमरच्या समोर ती स्त्री उभी राहिली !

होमरच्या दृष्टीला ती स्त्री सुंदर वाटली. तिच्याकडे अधिक पहातांच त्याला वाटलं, या बाईनं कित्येक वर्षं मोठ्या धीरानं काढलीं असली पाहिजेत, आणि म्हणून साधुसंतांच्या मुद्रेवर असतं तसलं असली मंदस्मित तिच्या ओंठावर कायमचं दिसत असलं पाहिजे. परन्तु ज्यांना कुणाकडून कधीं तार येत नाहीं त्यांना घराच्या दाराशीं तारवाला शिपाई उभा राहिलेला दिसला, कीं छातींत धस्स झाल्याप्रमाणें होतं. या कारणानं आपल्याला पाहतांक्षणींच मिसेस रोझा दचकली हें होमरच्या लक्षांत आलं. तिच्या तोंडून एकदम विस्मयाचा अन् भीतीचा उद्गार बाहेर पडला. जणू ज्याची आपली खूप दिवसांची ओळख आहे असा एखादा स्नेही आला आहे व त्याला घरांत घेऊन आपण त्याच्याशीं पुष्कळ वेळ बोलत बसणार आहोंत, अशा कल्पनेंत ती दार उघडावयास आली होती, आणि तिला प्रत्यक्ष दिसलं. तें भलतंच, तिच्या तोंडांतून चटकन् शब्द बाहेर पडेना. ती आपला चेहरा न्याहाळून घेत आहे असं होमरला दिसलं, आणि त्याला असंही वाटलं कीं आपण कांहीं तरी दारुण वार्ता आणली आहे हें तिनं ओळखलं असावं. तिनं विचारलं,

"तार घेऊन आला आहेस काय तूं ?"

खरं पाहतां या बाईला आतां शोकवार्ता ऐकावी लागणार होती हा कांहीं होमरचा अपराध नव्हता. तारेनं जे संदेश येतील ते पोंचते करणं येवढंच त्याचं काम होतं. परन्तु या दुःखपूर्ण प्रसंगाचा दोष अंशतः का

होईना पण आपल्याकडे येतो असं होमरच्या मनांत सारखं येत होतं. इतकंच नव्हे तर क्षणभर त्याला असं देखील वाटलं, कीं—या बिचाऱ्या स्त्रीच्या दुःखाला सर्वस्वी आपणच कारणीभूत आहोंत, आणि या कल्पनेनं त्याला अगदीं विलक्षण शरमल्यासारखं झालं. एकीकडे ही लज्जा त्याला असह्य होत होती, आणि दुसरीकडे त्याला वाटत होतं, सारं बळ एकवटून ओरडून एकदाचं सांगून टाकावं हिला, कीं बाई हें बघ मी फक्त निरोप-पोचव्या आहे. तुझ्याकडे ही तार आणतांना मला किती दुःख झालं तें तुला काय सांगूं ? पण ही माझी नोकरी पडली. मी तरी काय करूं ?

तो स्तब्ध उभा राहिलेला पाहून तिनं विचारलं, "कुणाची तार ?"

"मिसेस रोझा सँडोव्हाल, ११२९ जी स्ट्रीट" असं म्हणून होमरनं लिफाफा तिच्यापुढें धरला.

परन्तु ती तो घेईना. तेव्हां त्यानं विचारलं, "हें तुमचंच नांव ना ?"

होय किंवा नाहीं म्हणण्याऐवजीं ती म्हणाली, "मेहेरबानी करून आंत ये. मला इंग्रजी वाचतां येत नाहीं." ती क्षणभर थांबली. होमरनं आंत पाऊल टाकलं परन्तु दाराला खेटूनच तो उभा राहिला.

क्षणभर त्याच्याकडे बघत राहून तिनं विचारलं, "तारेंत काय लिहिलं आहे ?

"मिसेस सँडोव्हाल, तारेंत लिहिलं आहे कीं—"

"परन्तु लिफाफा न उघडतांच आंतला मजकूर तूं कसा सांगणार मला ? आधीं तें पाकीट फोड कीं."

शाळेंत शिक्षकानं चूक काढली कीं विद्यार्थि चर्या करतो तशी चर्या करून होमर म्हणाला "खरंच कीं" आणि त्यानं थरथरत्या बोटांनीं लिफाफा उघडून आंतला कागद बाहेर काढला.

फाटलेला लिफाफा खालीं पडला तो झटकन उचलून घेण्यासाठीं ती खालीं वाकली आणि लिफाफ्याला पडलेली घडी साफ करीत तिनं विचारलं, "कुणी पाठविली आहे तार ? माझ्या मुलानं ? ज्युआननं ?"

" नाहीं. युद्धखात्याकडून आलेली तार आहे ही. "

" युद्धखात्याकडून ?—"

एकदा सारं झटकन सांगून टाकावं म्हणून होमर घाईनं म्हणाला " मिसेस् सॅन्डोव्हाल, तुमचा मुलगा मारला गेला आहे. बातमी कदाचित् चुकीचीहि असेल. अशा चुका नेहमी होतात. तुमचा मुलगा मारला गेला नसेलहि. जो मारला गेला तो दुसराच कोणीतरी असेल. तारेंत ज्युआन डॉमिंगो असं नांव लिहिलं आहे. परंतु तार चुकीची असणं शक्य आहे. "

परंतु होमरचं बोलणं त्या स्त्रीला जाणूं ऐकूंच आलं नाहीं !

ती म्हणाली, " अरे भितोस काय म्हणून. ये, आंत ये ना ! थांब मी तुला थोडी मिठाई देतें " तिनं त्याचा हात धरला आणि खोलीच्या मधोमध एक टेबल होतं त्याच्या जवळ आणून त्याला बसायला लावलं.

" मुलांना मिठाई आवडते मला माहीत आहे. तुला देते हं ! असं म्हणत ती आंतल्या खोलींत गेली आणि एक छोटीशी पेटी घेऊन आली. ती तिनं त्याच्या पुढें ठेवून उघडली. होमरनं असली मिठाई कधीं पाहिली नव्हती. "

" घे, ही मिठाई खा. मुलांना फार आवडते. "

होमरनं एक तुकडा घेतला, तोंडांत घातला, आणि तो चघळूं लागला.

ती स्त्री म्हणाली, " तूं वाईट मजकुराची तार घेऊन येशील हें शक्यच नाहीं. तूं चांगला मुलगा आहेस. माझा लाडका ज्युआन लहान असतांना जसा होता तसा तूं आहेस. घे आणखी खा ना. " तिनं त्याला आणखी मिठाई घ्याव-यास लावली. होमर ती खात होता, ती पुढें बोलत होती. " ही मिठाई बाजा-रांतली नाहीं. मी स्वतः हातानं केली आहे. माझा लाडका ज्युआन घरीं परत येईल तेव्हां त्याला द्यायसाठीं मी केली आहे. पण तूं खा. तूं सुद्धां माझाच आहेस —"

मग मात्र तिला एकदम हुंदका आला, परंतु रडणं आपल्याला शोभत नाहीं अशा विचारानं तिनं तें आवरलं. होमरला वाटलं उठावं अन् धूम ठोकावी. परंतु त्याला माहीत होतं, की तिथेंच बसून रहाणं हें त्याचं कर्तव्य होतं. आतां आपण कायमचेच इथं राहाणार कीं काय असंहि त्याच्या मनांत आलं, कारण त्या शोकविव्हल स्त्रीचं सांत्वन कसं करावं हें त्याला कळत नव्हतं, त्यामुळें ती जर म्हणाली कीं, आतां तूं कायमचाच माझ्याजवळ रहा तर नाहीं असा शब्द तोंडावाटे काढणं त्याच्यानं होणारं नव्हतं. तो एकदम उठून उभा राहिला. जणूं कांहीं बसल्या बसल्या जें साधण्यासारखं नव्हतं तें उभं राहून त्याला करतां येण्यासारखं होतं. मनांतल्या मनांत तो सारखा म्हणत होता, " मीं काय करूं ? माझा काय इलाज ? कुणी सांगा, माझा काय इलाज ? मी फक्त तारवाला शिपाई आहे ! "

त्या स्त्रीनं त्याला एकदम ओढून कुशींत घेतलं व ती विलाप करूं लागली, " माझ्या बचड्या, माझ्या लाडक्या—"

या साऱ्या प्रकाराची होमरच्या अंतःकरणाला असह्य वेदना झाली. का कोण जाणें, परंतु त्याला अगदीं किळस आली, अन् त्याला वाटलं आपल्याला आतां ओकारी येणार. त्या स्त्रीचा त्याला राग आला नाहीं. कुणाचाच आला नाहीं. परंतु तिची तशीं अवस्था व्हावी या गोष्टीची दुर्गंधी त्याला सहन करवेना. या असल्या जगांत जिवंत राहण्यापेक्षां मेलेलं काय वाईट. नको हें जिणं असं त्याला वाटलं.

" ये, असा इकडे ये. बैस इथें. " असं म्हणून मिसेस रोझानं त्याला एका खुर्चीत बसविलं आणि स्वतः न बसतां ती म्हणाली " तुला डोळे भरून पाहूं दे. "

मोठ्या चमत्कारिक नजरेनं ती त्याला न्याहाळूं लागली. होमरचा सारा जीव आंतल्या आंत गुदमरून गेला होता. परंतु त्याला हातपाय हालविण्याची शक्तिच उरली नव्हती. प्रेम अगर द्वेष यांपैकीं एकहि भावना त्याच्या मनांत त्या क्षणीं नव्हती. फक्त कसला तरी तीव्र तिरस्कार त्याच्या ठिकाणीं उसळला होता,

व त्या तिरस्काराबरोबरच केवळ अभागी स्त्रीबद्दलच नव्हे तर सृष्टींतल्या साऱ्याच वस्तू ज्या तऱ्हेनं जन्मतात व मरतात त्या अर्थशून्य तऱ्हेविषयींची अनुकंपा त्याच्या अंतःकरणांत भरून आली होती...मिसेस रोझा आपल्या तरुण वयांत कशी दिसत असेल—तिचा मुलगा जेव्हां तान्हा होता तेव्हां त्याला पाळण्यांत ठेवून त्याच्याजवळ बसलेली असतांना ती किती सुंदर दिसत असेल—याची त्यानं कल्पना करून पाहिली. तिच्या पोटीं आलेल्या मुक्या, असहाय, मुग्ध, सुंदर अशा त्या बालकाकडे ती घटका घटका खचित पहात राहिली असेल. आपल्या त्या बालकाचं पुढचं आयुष्य असं होईल, तसं होईल अशीं रम्य चित्रं तिच्या डोळ्यांपुढें तरंगलीं असतील. अलगद हातांनीं झोंके देता देतां तिनं आपल्या तान्हुल्यासाठीं गाणीं म्हटलीं असतील...होमर स्वतःशीं म्हणाला, आणि आतां बघा बिचारीची काय अवस्था झाली आहे !...

सायकलवर परत बसल्याबरोबर तो अगदीं वेगानं निघाला. आतां अंधार झाला होता. त्याच्या डोळ्यांतून आसवं ओघळत होतीं. त्याच्या तोंडांतून विद्रे शिव्याशाप बाहेर पडत होते. तो परत तार ऑफिसांत पोंचला तेव्हां त्याचीं आसवं थांबलीं होतीं. परंतु त्याच्या शरीराच्या बाकीच्या सर्व क्रिया अगदीं जोरांत सुरू होत्या. त्या कशानं देखील थांबणार नाहींत असं त्याला वाटत होतं. "मी अशी धांवपळ केली नाहीं तर मी खचित मरून पडेन" असं तो इतक्या मोठ्यांदा ओरडला कीं, जणू एखाद्या बहिऱ्या माणसाला तो ती गोष्ट सांगत होता !

## ६

तारायंत्राचा कडकट्ट कडकट्ट असा आवाज झाला तेव्हां होमरचं लक्ष त्याकडे गेलं. त्याला वाटलं ग्रॉगन यंत्राजवळ बसला आहे तो संदेश

घेईल. परंतु यंत्राचा आवाज होतच राहिला आणि ग्रॅागन तर कांहीं हालचाल करीना, तेव्हां होमर झटकन् त्याच्याजवळ गेला. त्याला हालवीत तो म्हणाला "ग्रॅागन ! तार आली !" पण ग्रॅागन डोळे उघडीना. त्यानं ओरडून म्हटलं "ग्रॅागन ग्रॅागन ! उठा उठा."

त्यानं झटकन् थांबून पाणी आणलं. परंतु ते त्याच्या तोंडावर मारण्याचा त्याला धीर होईना. भांडं टेबलावर ठेवून त्यानं ग्रॅागनला गदगदां हालविलं. "ग्रॅागन ! उठा उठा ! तार येते आहे."

मग मात्र त्या वृद्धाच्या तोंडावर त्यानं सपदिशीं पाणी मारलं. ग्रॅागननं एकदम दचकल्याप्रमाणें डोळे उघडले, त्यानं क्षणभर होमरकडे पाहिलं, व मग यंत्रांकडे लक्ष देऊन तो त्याला म्हणाला "छान केलंस ! पण आतां आटप. गरम कॉफी आण. पळ."

होमरनं कॉर्बेटच्या हॉटेलकडे धूम ठोकली. तो परत आला तेव्हां डोळे मिटल्या मिटल्या ग्रॅागन यंत्रांशीं कडकट्ट कडकट्ट करीत होता.

होमरनं कॉफी पुढें ठेवली तिचे घोट घेत घेत तो म्हणाला, "आधीं थंड पाणी मारणें, नंतर गरम कॉफी आणणें !"

होमर म्हणाला, "समजलों...आतां संदेश आला तो महत्त्वाचा आहे काय ?"

"मुळींच नाहीं. व्यापारी संदेश आहे तो. बेट्यांना पैसे सांठवायचे आहेत ना. तेव्हां धाडतात एकमेकांना तारा. ही तार आतां रात्रीं पोंचवलीच पाहिजे अशी नाहीं, पडेना का सकाळपर्यंत तशीच ! तिचं काय महत्त्व आहे ? माझ्या आयुष्यावर मात्र या तारेचा फार मोठा परिणाम होणार आहे, हं !"

त्याचं तें बोलणं होमरच्या नीटसं लक्षांत आलं नाहीं. ग्रॅागननं डोळ्यांची थोडीशी उघडझाप केली, आणि मग पूर्ण जागा झाल्याप्रमाणें व शक्ति परत आल्याप्रमाणें तो एकदम आवाज उंच चढवून सांगूं लागला, "मला बेकार

करायचे आज कित्येक दिवस बेत चाललेले आहेत यांचे ! माणसं घालवून त्यांच्या जागीं यंत्रं बसवायचीं आहेत यांना ! मल्टीप्लेक्स, टेलेटाईप ! असलीं यंत्रं !" अमर्याद तिरस्कारानं त्यानं यंत्रांचीं तीं नांवं घेतली. "माणसांच्या ऐवजीं जिकडे तिकडे यंत्रं करून टाकायचीं आहेत या चोरांना !" मग आवाज एकदम कमी करून जवळ जवळ स्वतःशींच तो पुटपुटूं लागला, "माझं हें काम सुटलं तर मी करूं काय ? काय करूं ?" आणि अखेर जे लोक त्याच्या कामावर गदा आणूं पहात होते त्यांना उद्देशून बोलल्याप्रमाणें तो म्हणाला, "जन्मभर मी हें काम करीत आलों आहे, आतां प्राण गेला तरी हें मी सोडणार नाहीं."

होमर म्हणाला, "बरोबर आहे."

"बेटा, तूं माझ्या मदतीला नेहमीं धांवून येशील अशी माझी खात्री आहे. मघाशींच मला केली नाहीस का तूं मदत ? थँक यू !" त्यानं यंत्रांशीं कडकट्ट केलं, आणि उलट संदेश आला तो टाईप करतां करतां तो बोलूं लागला. त्याच्या बोलण्यांतला अभिमान आणि आवेश होमरला फार प्रिय वाटला. "अरे तुला काय सांगू, माझ्या सारखं जलद काम जगांत कुणी करीत नसेल, येवढा मोठा बॉलिन्स्की पण माझ्यापुढें तो टिकेल म्हणतोस काय ? हॅट ! संदेश पाठविणं आणि घेणं, दोन्हीं कामं म्हणजे माझ्या तळहाताचा मळ आहे. एक चूक होईल तर कान पकडा ! विली ग्रॅगन जगांतल्या साऱ्या तारमास्तरांना नांव ठाऊक आहे आमचं. सगळे सांगतील कीं ग्रॅगनसारखा तारमास्तर झाला नाहीं."

बोलतां बोलतां तो थांबला. आणि होमरकडे—काल रात्रींपासून कामावर आलेल्या एका गरीब कुटुंबांतल्या त्या छोकऱ्याकडे—बघत त्यानं हास्य केलं. मग तो एकदम म्हणाला; "बेटा, आणखी एक गाणं म्हण. तूं आणि मी दोघंहि जिवंत आहोंत. आपण गाऊं या !"

तें ऐकताच होमरनं गाणं म्हणण्यास प्रारंभ केला.

## ७

पुढच्या खोलींत एक झुलती खुर्ची होती, तिच्यावर बसून होमरची आई त्याची वाट पहात होती. तो आला तेव्हां मध्यरात्र नुकतीच उलटून गेली होती. त्याच्या पोषाखावर आणि अंगावर धूळ सांचली होती. तो थकला होता त्याचे डोळे झोपेनं जड झाले होते. या गोष्टी कुणालाहि दिसण्यासारख्या होत्या. परन्तु त्याच्याकडे दृष्टि टाकतांच त्याच्या आईनं हें देखील ओळखलं. कीं तो अंतर्यामी कशानं तरी दचकलेला आहे, धास्तावलेला आहे. या तिच्या मुलाचे वडील घरीं आले म्हणजे जसं हलकेच, हृदयांतील एखादी गूढ गोष्ट सांगितल्याप्रमाणें बोलत, तसाच हाहि बोलेल हें तिच्या लक्षांत आलं. खोलींत प्रकाश अगदीं थोडा होता. होमर आला तो पुष्कळ वेळ तसाच उभा राहिला. आणि मग आईशीं ज्या गोष्टी बोलल्याच पाहिजेत असं त्याला वाटत होतं त्या बोलण्याऐवजीं तो फक्त म्हणाला,

"आज माझं काम छान केलं मी. आई, रोज माझी वाट पहात बसणार कीं काय तूं ? अशी बसत जाऊं नको." तो थांबला. पण त्याला वाटलं आईला पुन्हां बजावून सांगितलं पाहिजे, म्हणून तो म्हणाला, "आज सगळं ठीक झालं."

त्याची आई म्हणाली, "तें माहीत आहे मला. पण आतां जरा बैस पाहूं तूं."

खुर्चीवर बसायसाठीं तो पुढें झाला, परन्तु नीट बसण्याऐवजीं तो एकदम कोसळल्याप्रमाणें पडला. त्याची आई किंचित हंसली व म्हणाली, "बेतानं, तूं अगदीं थकून गेला आहेस हें अगदीं उघड आहे. परन्तु तुझं मन ठिकाणावर नाहीं हें देखील मला दिसतं आहे. तें कां बरें ?"

होमर क्षणभर स्तब्ध राहिला. आणि मग अगदीं हलक्या आवाजांत परंतु फार घाईनें तो सांगूं लागला, "एका बाईला आलेली तार मला पोंचवावी

लागली. ती बाई—" तो एकदम थांबला. आणि मग उभा राहून म्हणाला, "तुला कसं सांगूं तें कळत नाहीं. कारण...जाऊं दे. तिला तार आली होती ती युद्धखात्याकडून, तिचा मुलगा मारला गेल्याची ती तार होती. परंतु ती बाई ती बातमी खरीच मानींना. मुलगा मेला हें खरं मानायला ती तयारच होईना. दुःखानं अगदीं असं घायाळ झालेलं माणूस मी पूर्वी कधीं पाहिलं नव्हतं. तिनं मला मिठाई खाऊं घातली. तिनं मला आपल्या उराशीं धरलं अन् ती म्हणाली, 'तूं माझा मुलगा आहेस.' तसं करण्यांनं तिला बरं वाटलं असेल म्हणून तिनं तसं केलं असेल. करिना कां बिचारी. मी मिठाई खाल्ली ती सुद्धा तिला बरं वाटेल असं दिसलं म्हणून. ती माझ्याकडे अशा कांहीं नजरेनं पहात राहिली कीं जणूं मी खरोखरच तिचा मुलगा होतों. होतों कीं नव्हतों तें माझं मलाच क्षणभर कळेनासं झालं होतं. अगदी विचित्र झाली होती माझ्या मनाची स्थिति. तिथून परत तार आफीसांत गेलों तो ग्रॅागनची स्वारी झिंगून पडलेली दिसली. त्यानं मला आधीं सांगूनच ठेवलं होतं, कीं कधी कधी मी असा झिंगतो, आणि मी झिंगून पडलों आहे असं तुला दिसलं कीं माझ्या तोंडावर थंड पाणी मारीत जा आणखी गरम कॉफी आणीत जा. त्याच्या हातून काम झालं नाहीं तर तें त्याला पेन्शनींत काढणार आहेत. आणि त्याला तर तें नको आहे. मी त्याला शुद्धीवर आणलं. मग तो ठीक काम करूं लागला आणि स्वतःच्या हकीगती मला सांगूं लागला. अखेर आम्ही दोघांनीं मिळून एक गाणं म्हटलं. हें सारं कांहीं तरीच वाटेल तुला, परंतु हें आठवलं, कीं मला रडूं येतं."

तो थांबला आणि कांहीं वेळ खोलींत येरझारा घालूं लागला. मग दारांशीं उभं राहून आईकडे न पहातां तो पुढें म्हणाला, "एकदम मला वाटलं मी अगदीं एकटा आहे. असा एकटेपणा मला पूर्वी कधीं देखील वाटला नव्हता. आपले बाबा गेले तेव्हां देखील एकटेपणाचं असं दुःख मला झालं नाहीं. कारण तूं होतीस, तूं आम्हांला दुःख होऊं दिलं नाहींस, कांहीं बदल झाला असं कधीं वाटूंच दिलं नाहींस. आणि खरं म्हणजे कांहीं बदल झाला नाहींच. सगळ्या गोष्टी पूर्वीसारख्याच सुरळीत चालल्या होत्या. पण आज काय झालं कुणाला

ठाऊक, मला एकाएकीं वाटूं लागलं, सारं बदललं." आणि अल्पवयी मुलांची ज्या खात्रीनं बोलायची पद्धत असते ती खात्री व्यक्त करण्यासाठीं तो पुन्हां म्हणाला, "सारं सारं बदललं." दारापासून दूर सरकून त्यानं आईकडे बघितलं, "अवघ्या दोनच दिवसांत सगळं बदललं ! मला वाटतं माझं कुणी नाहीं. मी एकटाच आहे. मला कोण भेटलं अगर काय मिळालं म्हणजे माझं एकटेपण नाहींसं होईल तें मला समजत नाहीं." तो अगदीं तिच्याजवळ सरकला व "आई !" येवढाच उद्गार त्याच्या तोंडून बाहेर पडला.

कांहीं उत्तर करण्याऐवजीं तो आणखी पुढं काय बोलतो त्याची वाट पहात ती स्तब्ध राहिली. तो म्हणाला, "जगांत काय चाललं आहे तें मला कळत नाहीं. जें चाललं आहे तें कशासाठीं चाललं आहे तेंहि समजत नाहीं. कांहीं कां चालेना, पण आई, त्याचा धक्का तुला लागूं नये असं मनाला वाटतं. सारं जग बदलतं आहे हें तर खरंच, परन्तु त्या बदलाची झळ आपल्यापर्यंत तर पोंचणार नाहीं ना अशा शंकेनं माझा जीव कासावीस होतो !"

त्याची आई हंसली. त्याला आणखी कांहीं बोलायचं असलं तर बोलूं द्यावें म्हणून ती थोडी थांबली. परंतु तो स्तब्ध राहिला तेव्हां ती बोलूं लागली. "खरं पाहिलं तर जग बदललेलं नाहीं. साऱ्या गोष्टी जशाच्या तशाच आहेत. पण सारं बदललं आहे असं तूं म्हणतोस तेंही कांहीं खोटं नाहीं. ऐवढंच, कीं तुझी दृष्टि बदलली आहे म्हणून तुला जग बदलल्यासारखं वाटतं आहे. तूं आतां लहान नाहींस. तुला समजूं लागलं आहे. आणि त्यामुळें तुला एकटं एकटं वाटूं लागलं आहे. ज्या एकटेपणाच्या अनुभवानं तुला बावरल्यासारखं वाटूं लागलं आहे, तसला अनुभव प्रत्येक माणसाच्या वाट्याला केव्हांना केव्हां तरी येतोच. महायुद्धामुळें एकटेपणाची भावना उद्भवते असं नाहीं. उलट तुझ्या मनाची आज जी अवस्था झाली आहे तशी झाली, मनाचं समाधान नाहींसं झालं आणि मनाला काय हवं आहे ते कळेनासं झालं म्हणजेच माणसांना युद्धाचे डोहाळे सुचतात. मानवी जीवनांतलं सत्व आणि सत्य यांवरची श्रद्धा उडाली म्हणून या महायुद्धाला प्रारंभ झाला. तूं भिऊं

नकोस. जगांत केवढाहि बदल होत असला तरी आपल्या घरापर्यंत तो पोंचायचा नाहीं. आपल्याला धक्का लागायचा नाहीं." ती क्षणभर थांबली. तिला वाटलं, कीं ज्या विवाक्षित घटनेची त्याच्या मनानं धास्ती घेतली आहे ती दुर्दैवानं घडली तर आपण कशाप्रकारें वागूं हें त्याला स्पष्ट सांगितलेलं बरं. म्हणून ती म्हणाली, "हें बघ होमर, त्या बाईला आज रात्रीं तूं नेऊन दिलीस तसली तार मला आली तर मी काय करीन तें तुला सांगतें. त्या तारेंतले फक्त शब्द खरे आहेत येवढंच मी म्हणेन. मी शोक करणार नाहीं. कारण आपल्या मार्कस्चा कधीं अंत होणार नाहीं हें मला पक्कं माहीत आहे." ती थोडीशी थांबली. मग मुद्रेवरचं गांभीर्य एकदम टाकून जवळ जवळ हंसल्यासारखं करून ती म्हणाली, "आज तूं कांहीं खाल्लंस कीं नाहीं ?"

होमर म्हणाला, "वाफोळे खाल्ले ना सफरचंदाचे वरती नारळाची मलई असलेले. ऑफिसच्या मॅनेजरनं पैसे दिले. असा उमदा माणूस मी कधीं पाहिला नाहीं."

"उद्यां तुझ्यासाठीं थोडं फराळाचं देऊन मी बेसला पाठवीन."

"नको आई. बाहेर जाऊन एकाद्या हॉटेलांत दोघां-तिघांनीं एकत्र बसून खाणंच मला जास्त आवडेल. तूं फराळाचं करायचंस, मग बेसनं आणायचं, येवढं हवं आहे कशाला ? बाहेर कुठेंतरी खाण्यांतच गंमत आहे. आई, ही नोकरी मला फार फार आवडते. मात्र हें नवं काम करूं लागल्यावर मला वाटूं लागलं आहे, कीं शाळेंत जाणं म्हणजे शुद्ध वेडेपणा आहे."

"तूं म्हणतोस तें खोटं नाहीं. मुलांना शाळेंत पाठवायचं तें येवढ्याच हेतूनं, कीं त्यांनीं रस्त्यावर मस्ती करण्यांत वेळ दवडूं नये. परंतु मुलांना शाळेंत कांहीं कायमचं डांबून ठेवायचं नसतं. केव्हां ना केव्हां तरी त्यांनीं रस्त्यावर यायलाच पाहिजे, आयुष्याच्या धकाधकींत मिसळलंच पाहिजे. त्यांना आवडो न आवडो, ही गोष्ट टाळण्यासारखी नाहीं. आईबापांना साहजिक वाटतं, कीं आपल्या मुलांना जगाचा संपर्क झाला तर कसं होईल ? परंतु हें भय व्यर्थ आहे. बहुतेक मोठीं माणसं नुसती दिसायला मोठीं असतात, परंतु खरं

पहातां तीं भेदरलेल्या मुलांसारखीं असतात. तीं स्वतः घाबरलेलीं असल्यामुळें एकमेकांनाहि तीं घाबरवितात. जें जें माणूस तुला भेटेल त्याच्यावर प्रेम करायचा प्रयत्न कर, तो जसा वागतो तसा का वागतो तें समजून घेण्याचा प्रयत्न करीत जा. रोज रात्रीं इथें मी तुझी वाट पहात बसेन. परंतु माझ्याजवळ यावं अन् बोलावं असं तुला वाटलं तरच तूं माझ्याशीं बोलत जा. एरवीं नाहीं. तूं कांहीं बोलला नाहींस तरी मला वाईट वाटायचं नाहीं. कित्येकदां तुझं अंतःकरण अगदीं जड झालेलं असेल आणखी तोंडावाटे एक शब्द देखील काढूं नये अशी तुझ्या मनाची अवस्था झाली असेल, हें मी ओळखूं शकतें." बोलणं बंद करून तिनं त्याच्याकडं पाहिलं, व म्हटलं, "तूं फार दमला आहेस. जा, आतां नीज."

होमर होय म्हणाला आणि आपल्या खोलीकडे गेला.

## ८

सकाळचे सात वाजलें तेव्हां घड्याळांत गजर होऊं लागला. परंतु घर्र्र्र असा आवाज सुरू झाल्याबरोबर होमर उठून बसला आणि जास्त आवाज होऊं नये म्हणून त्यानं झटकन् बंद केला. तो उठला, न्युयॉर्ककडून मुद्दाम मागविलेल्या व्यायामाचा 'कोर्स' त्यानं बाहेर काढला. तो घड्याळाचा गजर कधीं पुरता वाजूं देत नसे, परंतु घर्र्र्र असा आवाज झाला कीं तो जसा उठत असे त्याप्रमाणें युलिसेस देखील रोज झटकन जागा होत असे, व आपला भाऊ काय करतो तें पहात रहात असे. होमरनं कोर्समधला सातवा धडा उघडला, आणि प्राणायामाचे कांहीं प्रकार केल्यावर उताणं पडून तंगड्या वर उंच केल्या. युलिसेस एव्हांना त्याच्या शक्यतों जवळ सरकला होता. व त्या पुस्तकांत बघूं लागला होता. भावाच्या तंगड्याकडे बघत त्यानं विचारलं.

" हें काय करतोस ? "

" व्यायाम ! "

" तो कशाला ? "

" स्नायु तयार व्हावेत म्हणून. "

" जगांतला सगळ्यांत दांडगा माणूस व्हायचं ठरविलं आहेस वाटतं ? "

" अं-हं ! "

" मग कोण व्हायचं ठरवलं आहेस ? "

" तूं आपल्या अंथरुणावर जाऊन नीज पाहूं ! "

युलिसेस निमुटपणानं अंथरुणाकडे गेला, परंतु निजण्याऐवजीं बसून पहात राहिला. होमर आपला व्यायाम संपवून कपडे करूं लागला तेव्हां त्यानं विचारलं,

" कुठें निघालास ? "

" शाळेंत. "

" कांहीं शिकणार आहेस वाटतं ? "

" ताट्या ओलांडण्याच्या शर्यतींत भाग घेणार आहे मी. "

" म्हणजे ? असली कसली ही शर्यत ? काय करायचं असतं ? "

" दर दहा पंधरा यार्डांवर एक ताटी उभी केलेली असते. या ताट्यांवरून उड्या मारीत मारीत धांवायचं असतं. "

" तें कशाला ? "

" कशाला म्हणजे काय ? त्यालाच तर शर्यत म्हणतात. आपल्या गांवांतल्या प्रत्येक माणसाला ही शर्यत मोठी वाटते. इथाका गांव या शर्यतीबद्दल प्रसिद्ध आहे. आमच्या तारऑफिसांतला मॅनेजर हायस्कूलमध्यें होता तेव्हां त्यानें या शर्यतींत भाग घेतला होता. चॅंपियन होता तो. "

" म्हणजे काय ? "

" म्हणजे शर्यतींत पहिला आला होता. "

" तूं येणार आहेस काय पहिला ? "

" बघूं या. प्रयत्न करणार आहे मी. पण तूं परत नीज पाहूं आतां ?"

युलिसेस अंथरुणांत आडवा झाला. पण तसं करतां करतां तो म्हणाला, " उद्यां–नाहीं काल मी काय पाहिलं माहीत आहे का ? आगगाडी ! "

युलिसेसचं बोलणं होमरच्या लक्षांत आलं. लहानपणीं आगगाडी दिसली कीं आपणाला केवढी गंमत वाटत असे त्याची त्याला आठवण झाली, व त्याला हसूं आलं. त्यानं विचारलं, " असं का ? काय काय झालं सांग पाहूं ?"

गंभीर चर्या करून आठवून बघत युलिसेस म्हणाला, " एक काळा माणूस होता. त्यानं माझ्याकडं हात उंच करून हालविला. "

होमरनं विचारलं," तूं नाहीं का त्याला हात दाखविलास ? "

" दाखविला ना ! पहिल्यांदा मी दाखविला. मग पहिल्यांदा त्यानं दाखविला. मग पुन्हां त्यानं. तो मोठ्यांदा गाणं म्हणत होता. "

" खरं ? "

" त्यानं ओरडून सांगितलं घरीं चाललों राजा........आपण केव्हां जायचं रे घरीं ? "

" आपण जिथें आहोंत तेंच घर कीं. "

" मग तो इकडे कां आला नाहीं ? "

" हें आपलं घर आहे. त्यांचं नाहीं. प्रत्येकाचं घर निरनिराळ्या ठिकाणीं असतं. कांहींचीं पूर्वेला कांहींचीं पश्चिमेला. आपलं गांव पश्चिमेकडचं आहे. "

" आपलं गांव सगळ्यांत चांगलं होय ? "

होमर म्हणाला, " कुणास ठाऊक ! मी कधीं कुठें गेलोंच नाहीं. "

" जाणार आहेस काय ? "

" केव्हांतरी. "

" कुठं ? "

" न्यूयॉर्कला "

" तें कोणीकडे आहे ? "

" पूर्वेला. न्यूयॉर्कनंतर लंडन, तिथून पॅरिस, तिथून बर्लीन, मग व्हिएन्ना, रोम–जगांतली सारीं मोठीं शहरं पहाणार आहे मी. "

" परत येशील का ? "

" तर ! "

" परत आलास की आनंद होईल तुला ? "

" अर्थात् ! "

" कां ? "

होमर म्हणाला, " का म्हणजे काय ?–परत आलों कीं आई भेटेल, मार्क्स् भेटेल, बेस भेटेल आणि मुख्य म्हणजे तूं भेटशील. मेरी आणि तिचे वडील भेटतील, लांबची मुशाफरी करून परत यावं, सगळ्यांच्यांत बोलावं बसावं, गाणं ऐकावं म्हणावं, एकत्र जेवण करावं, यांत किती मजा आहे ! "

एकदम विनवणीच्या स्वरांत युलिसेस म्हणाला, " छे–छे ! होमर जाऊं नकोस रे ! "

होमर म्हणाला, " अरे मी आत्ताच निघालों काय ? आत्ता मी शाळेंत निघालों आहे ! "

" पण तू कधींच जाऊं नकोस. बाबा गेले अन् ते कांहीं घरीं परत आले नाहींत. मग मार्कस् गेला. अन् आतां तूंहि जाणार म्हणतोस ? नको नको होमर ! "

" मला जायला पुष्कळ अवकाश आहे अजून. तेव्हां तूं आतां नीज पाहूं. "

" बरं निजतों...एकूण तूं शर्यतींत पळणार म्हणायचा ? "

" होय. शर्यतींत पळणार. "

न्याहारीसाठीं होमर जेवणघरांत गेला तेव्हां त्याची आई व बहीण दोघी वाटच पहात होत्या. तिघांनी आपली मस्तकं क्षणभर खालीं केलीं, आणि मग खायला प्रारंभ केला.

" बेसनं भावाला विचारलं, " कोणती प्रार्थना म्हटलीस तूं ? "

" नेहमी म्हणतों तीच ! " त्याला बोलतां येऊं लागलं तेव्हां जी प्रार्थना तो शिकला होता ती त्यानं म्हणून दाखविली.

बेस म्हणाली, " उंः ! ही प्रार्थना शिळी आहे. आणखी शिवाय हिच्यांतल्या शब्दांचा अर्थ तरी तुला कळतो काय ? "

" अर्थात् कळतो ! मला भूक लागली असल्यामुळें मी कदाचित् ती घाईनें म्हणून टाकली असेल. परंतु अर्थ मला माहीत आहे. शब्दांच्या उच्चाराचं महत्त्व नाहीं. भावनेचं महत्त्व आहे. आणखी येवढी विचारते आहेस तर तुझी प्रार्थना कोणती आहे कळूं दे तरी ? "

" हां, विषय नको बदलूंस. तुझ्या प्रार्थनेचा अर्थ काय तें सांग आधीं. "

होमर म्हणाला, " अर्थ काय म्हणजे काय बुवा ? शब्द आहेत, त्यांचा जो अर्थ तोच अर्थ ! "

" तोच काय तें सांग की ? "

होमर सांगू लागला, "परमेश्वरा, आम्हीं भोजन करीत आहोंत, तूं आमच्या सन्निध रहा—ही पहिली ओळ. सन्निध रहा म्हणजे सन्निध रहा, दुसरं काय ? हे परमेश्वरा, परमेश्वर म्हणजे—म्हणजे सगळं कांहीं. मला वाटतं, जें जें चांगलं तें परमेश्वराचंच रूप. आतां दुसरी ओळ. इथें आणि सगळीकडेच तुझी पूजा चालावी. याचा अर्थ असा, कीं जें जें चांगलं त्यावर सगळ्या माणसांचं प्रेम असावं. पुढें. या प्राणीमात्रांवर तुझी कृपा असावी. प्राणीमात्र म्हणजे आपण सारीं, नाहीं काय ? कृपा असावी म्हणजे काय उघडच आहे. कृपा म्हणजे काय तें तुला माहीत नाहीं ? कृपा करायची म्हणजे क्षमा करायची. दया करायची. सगळ्यांच्यावर दृष्टि ठेवायची—किंवा असंच कांहींतरी. मला नक्की माहीत नाहीं. परंतु कृपा या शब्दाचा असाच कांहीं अर्थ असणार खास.

आतां शेवटची ओळ. तुझ्याबरोबर स्वर्गात अन्न सेवन करण्याचं पुण्य आम्हाला मिळावं. या ओळीचा अर्थ तर अगदीं सरळ आहे. तो काय मी सांगायला हवा ? ”

बेसनं विचारलं, “ पण तुझ्याबरोबर म्हणजे काय ? हा ‘ तूं’ कोण ? ”

होमरनं आपल्या आईकडं पाहिलं व म्हटलं, “ जीं माणसं सद्वर्तनी आहेत तीं एकत्र जेवायला बसलीं, कीं परमेश्वराच्या संगतींत स्वर्गात जेवल्याप्रमाणें त्यांना आनंद होतो असा या प्रार्थनेचा अर्थ आहे. परमेश्वर म्हणजे जें जें चांगलं, पवित्र असेल तें ! नाहीं का ग आई ? ”

त्याची आई म्हणाली, “ बरोबर आहे. ”

पण बेसनं विचारलं, “ पण असं नाहीं. परमेश्वराला जर आपण ‘ तूं ’ म्हणून संबोधितों तर तो कुणीतरी असला पाहिजे. ”

“ आहेच की ! उदाहरणार्थ मी आहे. ” किंचित चिडक्या स्वरांत होमर म्हणाला, “ हेंच बघ बेस, जेवणाच्या वेळेस म्हणायची ही प्रार्थना आहे, अन् तिचा अर्थ मला कळतो. तुला कळतो. तुला फक्त मला अडवायचं आहे, दुसरं काय ! एखाद्याला अडविणं कांहीं अवघड नाहीं. तूंच कशाला, कुणीहि अडवूं शकेल मला. परंतु मला जरी अर्थ सांगतां आला नाहीं तरी प्रार्थनेवरती माझी श्रद्धा आहे ती आहेच. प्रत्येकाची श्रद्धा म्हणून कांहीं तरी असते. नाहीं का ग आई ? ”

त्याची आई म्हणाला, “ बरोबर बोललास. श्रद्धा असली तरच मनुष्य जिवंत आहे म्हणावयाचं. ती नसेल तर स्वर्गात तर राहूं दे, पृथ्वीवर तरी मनुष्य जेवला असं होईल काय ? अगदीं पंचपक्वान्नांनीं भरलेलें ताट पुढें असलं तरी श्रद्धेवांचून त्याला कांहीं खरं जेवण म्हणतां येणार नाहीं. कोणती वस्तु आपल्याला मिळते त्याचें महत्त्व नाहीं. ज्या श्रद्धेनं आपण तिचा उपभोग घेतों तिचं खरं महत्व आहे. ”

बेसकडे बघून होमर म्हणाला, “ ऐकलंस ? ” जणूं तिच्या प्रश्नाचा कायमचा निकाल लागला असंच त्याला सुचवायचं होतं. मग तो म्हणाला, “ आज ताठ्यांच्या शर्यतींत भाग घेणार आहे मी. ”

त्याच्या आईनं विचारलं, " हं ? हें केव्हां ठरवलंस ? "

" आई, ही शर्यत अशी तशी नाहीं. स्पॅंग्लरनं शाळेंत असताना ही शर्यत जिंकली होती. आई तुला मी सांगितलं का, स्पॅंग्लरजवळ एक अंडं आहे, आणि तो म्हणतो तें शकुनाचं आहे. "

बेस म्हणाली, " हं: ! शकुनाचं अंडं ! शकुन म्हणजे एक भोळी गांवठी समजूत आहे ! "

होमर म्हणाला, " बरं असूं दे. गांवठी समजूत असूं दे नाहीं तर वाटेल तें असूं दे. "

तितक्यांत शेजारची मेरी मागच्या दारानं आंत आली, होमर तिला म्हणाला, " बैस. थोडा फराळ करणार का तूं आमच्याबरोबर ? "

मेरी म्हणाली, " आतांच मी बाबांच्या बरोबर न्याहारी केली अन् ते कामावर गेले. त्यांच्यासाठीं मी ' पीच ' फळं उकडलीं होतीं. त्यांतली थोडीं आणलीं आहेत. "

होमरची आई म्हणाली, " तुझे बाबा ठीक आहेत ना ? "

" ठीक आहेत कीं. पण अलीकडे ते सकाळ संध्याकाळ मला सारखे चिडवीत असतात. उठले कीं पहिला प्रश्न मला विचारतात, आज कांहीं एक आहे कीं नाहीं ? म्हणजे मार्कसूचं पत्र आलंय् कीं नाहीं ? "

बेस म्हणाली, " मार्कस्चं पत्र येईलच आज उद्यां. " ती टेबलाजवळून उठली व म्हणाली " मेरी चल आपण जाऊं या. "

" चल जाऊं. " मग बेसच्या आईकडे वळून मेरी म्हणाली, " पण आई, तुम्हांला खरं सांगूं ? कॉलेजांत जायचा मला अगदीं कंटाळा येऊं लागला आहे. कॉलेज आणि शाळा यांत कांहीं अंतर आहे म्हणतां काय ? मी आपलं शिकत राह्यचं म्हणजे काय ? आतां मोठी नाहीं का झालें मी ? अन् शिवाय आजची परिस्थिति निराळी नाहीं का ? खरंच, कुठें नोकरी मिळाली तर ती करावी असं मला फार वाटतं. "

बेस म्हणाली, " मला सुद्धां ! "

बेसची आई म्हणाली, “ उगाच मूर्खासारखं बोलूं नका ग ! तुमचं काय वय झालं आहे होय ? अवघ्या सतरा वर्षांच्या पोरी तुम्हीं. मेरी, तुझा बाप पैसे मिळवितो. अन् बेस तुझा भाऊ मिळवितो. तुम्हांला ग नोकरी करायचे डोहाळे कशाला ? ”

मेरी म्हणाली, “ आई तुम्हीं कांहीं म्हणा, पण मनाला हें पटत नाहीं. मार्कस् तिकडे लढाईवर गेला आहे, जगांत लोक एकमेकांचे डोळे ओरबाडून काढताहेत, आणि इकडे आम्हीं मात्र बुकांचीं दप्तरं घेऊन शाळेंत जायचं अन् खुशाल स्वस्थ बसायचं हें काय ? मला कधीं कधीं वाटतं, मी पुरुषाच्या जन्माला कां नाहीं आलें ? मग मी मार्कस्‌बरोबर सैन्यांत दाखल झालें असतें. आणखी त्यानं अन् मी खात्रीनं खूप गंमत केली असती.

बेसची आई म्हणाली, “ पुरे कर, समजलें ! जगाची घडी अशी विस्कटलेलीच रहाणार नाहीं. लवकरच पूर्वीच्यासारखं सगळं कांहीं स्थिरस्थावर होईल. ”

“ होऊं दे बाई ? ” असं म्हणून मेरी बेसबरोबर निघून गेली.

होमर त्यांच्याकडे कांहीं वेळ बघत राहिला, मग त्यानं आईला विचारलं, “ आई, हें आहे काय ? ”

“ अरे चालायचंच. जरा जगांत मिसळावं आणि पंख फडफडून पहावं असं तरुण मुलांना वाटावं हें अगदीं साहाजिक आहे. ”

“ तें जाऊं दे, मी मेरीबद्दल विचारीत होतों ? ”

“ मेरी साधी भोळी आहे. एखाद्या पोरासारखी आहे ती. इतकी गोड मुलगी मी दुसरी पाहिली नाहीं. मार्कस्‌चं तिच्यावर प्रेम जडलेलं आहे हें पाहून मला फार समाधान वाटतं. अशी गोड मुलगी त्याला मिळाली नाहीं. ”

“ तें मला माहित आहे आई. मी तुला निराळंच विचारीत होतों. तुझ्या लक्षांत कसं येत नाहीं ? ”—पण तो एकदम थांबला. जीं माणसं प्रत्यक्ष युद्धापासून फार दूर होतीं त्यांच्या आयुष्यांत देखील या महायुद्धामुळें परोपरीचीं दुःख कां निर्माण होतात असा जो प्रश्न कालपासून त्याच्या मनाला त्रास देऊं लागला होता त्याचं उत्तर आईकडून त्याला हवं होतं. परंतु त्याला

आढळून आलं, कीं आपल्या मनांतला प्रश्न आपल्याला कांहीं धड विचारतां यायचा नाहीं. म्हणून जातां जातां तो फक्त म्हणाला, "आई चाललों ग!"

त्याची आई त्याच्याकडे पहात राहिली. तो काय विचारणार होता पण न विचारतां गेला ते तिला समजेना. तितक्यांत नजरेच्या कोपऱ्यांतून तिच्या दृष्टीस एक अगदीं लहान आकृति दिसली. तो युलिसेस होता. एखाद्या मुक्या प्राण्याचं पिलूं आईकडं पहातं त्याप्रमाणं तो तिच्याकडे बघत होता. आईच्या दर्शनासारखी दुसरी कोणतीहि गोष्ट पिलाला आनंद देऊं शकत नाहीं. युलिसेसची चर्या अत्यंत मोहक दिसत होती, व कसल्या तरी विचारांत तो असल्याप्रमाणें त्याच्या चेहऱ्यांत गांभीर्याची छटाहि होती. आई जवळ येताच त्यानं विचारलं, "आई, रडूं नको, बाई रडूं नको' असं का ग तो म्हणतो?"

"तो म्हणजे कोण?"

"आगगाडीवरचा तो काळा बुवा,"

"अरे तें एक गाणं आहे. चल, आतां कपडे घालायचे ना" असं म्हणून तिनं त्याला जवळ ओढलं.

युलिसेसनं विचारलं, "आजसुद्धां आगगाडींत तो काळा माणूस असेल का ग आई?"

त्याच्या आईनं क्षणभर विचार केला, व म्हटलं 'नक्की'

## ९

होमरच्या शाळेच्या वाटेवर 'सॅन बेनिटो' रस्ता लागत असे. एके ठिकाणीं या रस्त्याच्या कडेला खूप रानगवत माजलेलं होतं व त्याच्या भोंवतीं कुंपण घातलेलं होतं. त्या मोकळ्या जागेला आणि त्या रानगवताला येवढं

अगदीं शिस्तशीर कुंपण कशाला हवं होतं कुणास ठाऊक? परंतु कुंपण घालणाऱ्यानं तें घालून ठेवलं होतं खरं. ते कांहीं मोठं भक्कम नव्हतं. जुनं अन् कुजकं झालं होतं.

आज या जागीं आल्याबरोबर होमरनं भरवेगांत सोडलेली आपली सायकल खाडकन् थांबविली, ती जमिनीवर फेंकून दिली, आणि तो अशा कांहीं घाईनें कुंपणाकडे धांवला कीं त्यानं चपळाई केली तर ठीक नाहीं तर तें कुंपण जागचं नाहींसं होणार होतं. जवळ गेल्यावर होमरनं कुंपणाकडे निरखून पाहिलं, कुंपणापर्यंत धांवत यायला कितीशी जागा लागेल व कुंपणाच्या पलिकडची जागा कशी काय आहे याचा त्यानं अदमास घेतला, आणि मग कुंपणाची उंची त्यानं मोजून पाहिली. त्याच्या कमरेच्या वर जरासं लागत होतं तें. त्यानं जागच्या जागीं दहा पांच उड्या मारून पाहिल्या, आणि मग दहा यार्ड मागं सरकून स्वतःचा स्वतःला देखील इशारा न देतां त्यानं अगदीं चेवानं कुंपणाकडे धांव घेतली. हवं तेवढं जवळ आल्यावर त्यानं मोठ्या सफाईनं उडी मारली. त्याची निसटती लाथ लागून कुंपणाचा थोडासा भाग पडला, आणि तो स्वतः देखील रानगवतांत आपटला. परंतु तो लगेच उठला आणि त्यानं पुन्हा उडी मारण्याची तयारी केली. उडी मारली कीं त्याची लाथ लागून कुंपणाचं लाकूड मोडे व लाकडाचा कर्रर्र कर्रर्र कडकड असा उगीचच्या उगीच झाल्याप्रमाणें हास्यास्पद आवाज होई. होमरनं एकंदर सात उड्या मारल्या परंतु एक देखील उडी यशस्वी झाली नाहीं. अखेर तो थांबला तो उडी साधली म्हणून नव्हे तर कुंपण अगदींच मोडलं म्हणून.

कुंपणासमोर रस्त्याच्या दुसऱ्या कडेला असलेल्या एका घरांतून एक म्हातारा माणुस काठी टेकीत बाहेर आला व होमरकडे पहात राहिला. अखेरची आपटी खाऊन होमरची स्वारी उठून उभी रहात होती व अंग झटकीत होती, तेव्हां त्याला त्या वृद्धानं विचारलं,

"काय चाललं आहे रे?"

"ताट्या ओलांडायचं प्रॅक्टिस करतों आहे."

"लागलं काय?"

" छीः ! हें कुंपण जरा जास्त उंच आहे. आणखी या रानगवतावर पाय घसरतात इतकंच ! "

गवताकडे बघत म्हातारा म्हणाला, " याला दूध–गवत म्हणतात. सशांना फार आवडतं हें. अकरा वर्षांपूर्वी मी ससे बाळगले होते; परन्तु एकदां रात्रीं कुणीतरी दार उघडलं अन् सारे ससे पळून गेले. "

होमरनं विचारलं, " दार उघडलं तें कशासाठीं ? "

" कुणास ठाऊक ! माझे ससे गेले येवढं खरं. तांबूस डोळ्याचे, मांजराच्या रंगाचे, बेल्जम जातीचे, अशा नाना तऱ्हा होत्या माझ्या सशांच्या, असे देखणे होते, कीं, काय सांगू. मग काय ? सारे गेले ! कुणा रांडलेकानं तें दार उघडलं देव जाणें. "

" तुम्हांला सशांची फार आवड आहे ? "

म्हातारा म्हणाला, " फार गरीब प्राणी. माणसाळणारे ससे असतात ना ते अगदीं गरीब असतात. " त्यानं कुंपणापलीकडच्या मोकळ्या जागेकडे पाहिलं व म्हटलं, " या मोकळ्या जागेंत कुठें तरी असतील ते माझे ससे. अकरा वर्षांत त्यांची वीण किती झाली असेल त्याला काय सुमार ! साऱ्या गांवभर पसरलीं असलीं त्यांचीं पिलं तर कांहीं मला आश्चर्य वाटायचं नाहीं. "

होमर म्हणाला, " माझ्या दृष्टीस तर कधीं एकसुद्धां ससा पडला नाहीं. "

म्हातारा म्हणाला, " हां, नसेल. पण माझी खात्री आहे कीं माझे ससे इथेंच कुठें तरी आहेत, आणि बहुधा त्यांची पोरं साऱ्या गांवभर हिंडत असलीं पाहिजेत. आणखी दोन वर्षं जाऊं देत, या सशांचा बंदोबस्त कसा करावा असा गांवकऱ्यापुढें मोठा प्रश्न उभा राहील ! "

परन्तु त्या गंभीर प्रश्नाकडे दुर्लक्ष करून होमरनं सायकलवर टांग मारली व म्हटलं, " अच्छा ! आतां जायला पाहिजे मला. पुन्हां भेटेन मी. "

" वा, म्हणजे काय ! माझं नांव चार्लस, पण तूं मला चार्ली म्हण. वाटेल तेव्हां, खुशाल म्हण ! "

" बरं बरं ! " मग होमरनं आपला विषय काढला, त्यानं सांगितलं, आज तिसऱ्या प्रहरीं शाळेंत ताटयांची शर्यत होणार आहे तिच्यांत पळणार आहे मी. "

" असं का ? आम्हीं शाळेबिळेंत कधीं गेलों नाहीं. मात्र स्पेनशीं लढाई झाली, तेव्हां लढाईवर गेलों होतों. "

" असं का ! " असा उद्गार काढून होमर निघाला.

परन्तु म्हतारा स्वत:शीं बडबडत राहिला. " म्हणजे काय विचारतां ! गेलोच होतों लढाईवर ! सारखी सशासारखी धांवपळ करावी लागली ! "

आतां होमर दिसेनासा झाला होता.

म्हाताऱ्याची स्वारी इकडे तिकडे बघत आणि तोंडांतल्या पाईपचा धूर काढीत आपल्या चंद्रमौळी घराकडे हलके हलके निघाली. चालतां चालतां एके ठिकाणीं थांबून त्यानं आपली काठी गवतांत भोंसकली व म्हटलं, " इथें कुठें तरी माझे ससे आहेत खास...बाकी माझ्याजवळ होते तसे माणसाळलेले कुठले राह्यला ते आतां ! रानटी बनले असतील एव्हांना... "

## १०

होमरच्या शाळेच्या मैदानावर तिसऱ्या प्रहरीं होणाऱ्या शर्यतीसाठीं ताटया उभ्या केलेल्या होत्या. शर्यतीची संवय करण्यासाठीं चार मुलगे ताटयां-वरून उड्या मारून धांवत होते. शिक्षक ' बायफील्ड ' हातांत घड्याळ धरून त्यांच्याकडे पहात होता. ॲक्ले नांवाचा मुलगा पहिला आला. तेव्हां धांवत त्याच्याजवळ जाऊन बायफील्ड म्हणाला, " या वेळेस तूं जास्त चांगला धांवलास, अजून पुष्कळ शिकायला हवंस तूं, परन्तु मला वाटतं आजची तिसऱ्या प्रहरची शर्यत तूं जिंकशील. "

त्या मुलानं उत्तर दिलं, " सर, मी आपल्या प्रयत्नांची शिकस्त करीन येवढं खास. " ॲक्ले नांवाचा हा मुलगा त्याच्या एकंदर चर्येवरून पहातां

फार मोठ्या कुळांतला नसेल, परंतु अगदीं सामान्य गरीब कुळांतला नव्हता खास. अन्न, वस्त्र आणि निवारा यांच्या ददातींचा अनुभव ज्यांना वर्षानुवर्षे कधीं आलेला नसतो, इतकंच नव्हे तर मित्रमंडळींचं व पाहुण्यांचं थोड्या फार थाटानं आगतस्वागत करण्याची ऐपत ज्यांना असते अशा कुटुंबांतलीं मुलं दिसायला इतरांपासून एकदम वेगळीं दिसतात. अॅक्ले अशा मुलांपैकींच दिसत होता.

शाळेंतल्या मुलांना खेळणं, धांवणं, कसरत शिकवणं, हें बायफील्डचं काम होतं. तो अॅक्लेला म्हणाला, " आज एवढी मेहनत पुरे झाली. आतां जाऊन स्नान कर, आणि तिसऱ्या प्रहरपर्यंत विश्रांति घे."

अॅक्लेनं होय म्हटलं व तो तेथून जाऊं लागला. परन्तु मध्येंच थांबून त्यानं बायफील्डला विचारलं, " सर, किती मिनिटं लागलीं मला धांवायला ?"

बायफील्ड म्हणाला, "मिनिटांची फिकीर करूं नकोस. मी तुला शिकवलं आहे त्याप्रमाणें धांव म्हणजे तूं शर्यत जिंकशील असं मला वाटतं."

बाकीचे तीन मुलगे एका बाजूला उभे राहून तो संवाद ऐकत होते. मध्येंच त्यांपैकीं एकजण आपल्या सोबत्यांना म्हणाला, " ह्या ह्यूबर्ट अॅक्लेचं बोलणं चालणं एखाद्या नाजूक पोरीसारखं आहे पण लेकाचा शर्यतींत सदा पहिला येतो. काय रे सॅम, तुला कांहीं लाज ?"

सॅम चिडून म्हणाला, "माझी लाज कशाला काढतोस लेका ? तुला येवढी लाज आहे तर त्या अॅक्लेची तूं कां नाहीं जिरवीत ?"

" मी ? शर्यतींत मी दुसरा तरी आलोंच आहे."

" दुसऱ्याची किंमत कांहीं तिसऱ्यापेक्षां जास्त नाहीं." आतांपर्यंत गप्प राहिलेला तिसरा मुलगा म्हणाला.

" छे छे, ह्यूबर्ट अॅक्ले शर्यत जिंकतो ही तुम्हां आम्हांला मोठ्या शरमेची गोष्ट आहे."

" उगीच शरम शरम म्हणण्यांत काय अर्थ आहे ? तो धांवतोच चांगला त्याला काय करायचं ?"

तेवढ्यांत बायफील्ड त्यांच्याजवळ आला व मघापेक्षां अगदीं निराळ्या स्वरांत म्हणाला, " ए पोरांनो, उभे काय राहिलांत. विश्रांति घ्यायची तुमची लायकी नाहीं. चला आपल्या जागीं जाऊन उभे रहा आणि पुन्हां एकदां धांवा. "

ते तिघे मुलगे मुकाटयानं खुणेच्या जागीं जाऊन उभे राहिले, व बायफील्डनं शिटी फुंकल्याबरोबर त्यांनीं धूम ठोकली. त्यांच्याकडे पहातां पहातां बायफील्ड मनाशीं म्हणाला, यांना आणखी दोन वेळां धांवायला लावलं पाहिजे. तिसऱ्या प्रहरीं होणारी शर्यत ह्यूबर्ट अॅक्लेनं जिंकावी असं त्याला मनांतल्या मनांत वाटत होतं.

इकडे शाळेच्या इमारतींत वर्ग सुरू होण्याच्या बेतांत होते. इतिहासाची अध्यापिका मिस् हिक्स आपल्या वर्गांत जाऊन बसली होती, व शेवटच्या घंटेची वाट पहात होती. मुलगे आणि मुली हलके हलकें वर्गांत शिरून आपापल्या जागेवर बसत होत्या. आतां घंटा वाजली, कीं त्यांचा गलगा थांबणार होता ,वर्गांत शांतता होणार होती, व मिस् हिक्स आपलं काम सुरू करणार होती. प्राथमिक शिक्षणक्रम संपवून हायस्कूलांत दाखल झालेल्या तरुणपिढीला नागरिक बनविण्यासाठीं प्राचीन इतिहासरूपी ज्ञानामृत पाजण्याचं अवघड काम तिनं पत्करलं होतं. त्या ज्ञानामृताचा आणखी एक घुटका ती आतां मुलांमुलींना पाजणार होती. हेलन एलिअट् नांवाची एक छोटी मुलगी दारांतून आंत आली व आपल्या जागेकडे जाऊं लागली तेव्हां होमर तिच्याकडे अगदीं निरखून पहात राहिला. त्याच्या मनांत तिच्याविषयीं जवळ जवळ भक्तीची भावना असली पाहिजे हें त्याच्या पाहण्याच्या तऱ्हेवरून उघड दिसण्यासारखं होतं. हेलनइतकी सुंदर मुलगी जगांत दुसरी आढळणं शक्य नाहीं याबद्दल होमरला शंकाच नव्हती. शिवाय ती श्रीमंताची मुलगी होती, व संपन्न घराण्यांतलीं मुलं ज्या ऐटीनं व गुर्मीनं वागतात ती तिच्याहि वागण्यांत होमरला दिसे. त्यामुळें ती अधिकच आकर्षक वाटे. मात्र तिची ही ऐट त्याला मनापासून आवडत नसे. उलट एवढी हिनं सोडली तर बरं होईल, आणि बहुधा ती सोडीलहि असं तो मनाशीं म्हणे. शाळेच्या त्या

चिमुकल्या जगांत अनेक गोष्टींबद्दल होमरला शत्रुत्व वाटे, परन्तु त्याला सगळ्यांत चीड येई ती श्रीमंतांच्या पोरांच्या पोकळ ऐटीची व गुर्मीची. ही पोकळ ऐट कुठेंहि आणि कुणांतहि दिसली रे दिसली कीं त्याला वाटे तिच्याशीं दोन हात करावेत. ह्यूबर्ट ॲक्ले वर्गांत आला. हेलन जिथं बसली होती तिथं पोंचल्यावर त्या दोघांनीं एकमेकांशीं थोडी कुजबूज केली, तें पाहून होमरला मोठी चीड आली. तितक्यांत घंटा वाजून मिस् हिक्स म्हणाली, "हा, गलगा बंद करा पाहूं आतां. गैरहजर कोण कोण आहे ?"

एक मुलगा ओरडला "मी आहे" या मुलाचें नांव 'ज्यो.' ही स्वारी म्हणजे वर्गांतला विदुषक होती. त्याच्या चारपांच भगतमंडळींचे वर्गांत एक लहानसं टोळकंच होतं. ज्योनं खेंकाळायचं असा क्रम ठरलेला असे. त्याला अनुसरून आत्तांसुद्धां ज्योनं "मी आहे." असं म्हटल्याबरोबर त्याच्या जवळची हीं चारपांच पोरं खो खो करून हंसलीं. ह्यूबर्ट आणि हेलन यांनीं झटकन माना वळविल्या व 'भिकारड्या लोकांची टारगट कारटीं कुठलीं !' अशा अर्थानं आणि कपाळाला आठ्या चढवून त्यांनीं त्यांच्याकडे नजर टाकली. या प्रकाराचा होमरला इतका राग आला, कीं सगळ्या मुलांचं हंसणं थांबल्यावर तो एकटाच खूप मोठ्यांदा 'हा–हा–हा' करून हंसला, आणि जिच्यावर त्याची भक्ति होती त्या हेलनकडे व ज्याच्याविषयीं त्याला विद्वेष वाटे त्या ह्यूबर्टकडे, दोघांकडे त्यानं अशा कांहीं दृष्टीनं पाहिलं, कीं जणू त्याला म्हणायचं होतं, 'घ्या !' एवढा सूड घेतल्यावर मात्र तो ज्योकडे वळून रागानें म्हणाला, "ज्यो, मिस् हिक्स बोलूं लागली की गप्प रहा एवढी अक्कल नाहीं तुला ?"

मिस् हिक्स म्हणाली, "ज्यो, तुझी वटवट बंद कर." व नंतर तिनं होमरकडं वळून म्हटलं, "आणि महाराज आपणसुद्धां गप बसा बरं काय !" मग तिनं एकदां संबंध वर्गाकडे न्याहाळून पाहिलं, व ती म्हणाली, "ॲसीरियन लोकांची माहिती काल कुठपर्यंत आली ? तिथून पुढें सुरवात करायची आज. कुणाच्याहि टिवल्याबावल्या चालायच्या नाहींत. प्रत्येकानं अगदीं संपूर्ण लक्ष

दिलं पाहिजे! प्रथम पुस्तकांतला धडा वाचूं आपण, आणि नंतर जें वाचून होईल त्याच्यावर तोंडी चर्चा करूं."

गमत्या ज्योला एक कोटि सुचली, व ती करण्याचा मोह त्याला आवरेना. तो म्हणाला, "बाई, तोंडी चर्चा नको, मूक चर्चा करूं आपण, म्हणजे मला झोंप काढतां येईल." तें ऐकतांच त्याची भगत मंडळी खिंकाळली, व श्रीमंतांच्या पोरांनीं नाकं चढवलीं. मिस् हिक्सनं लगोलग उत्तर दिलं नाहीं. कारण, ज्योच्या हजरजबाबीपणाचं कौतुक न वाटणं कठीण होतं, आणि त्याच्या विनोदी वृत्तीवर विरजण न घालतां त्याला कह्यांत कसा ठेवावा तें ठरविणंहि सोपं नव्हतं. परन्तु कांहीं तरी बोलणं अवश्य होतं म्हणून ती म्हणाली.

"हें बघ ज्यो, दुसऱ्याचा असा पाणउतारा करणं चांगलं नाहीं."

ज्यो म्हणाला, "बाई, माफ करा हं. एखादी कोटि सुचली कीं मला राहवतच नाहीं बघा. तुम्हीं म्हणाला तोंडी चर्चा. पण चर्चा तोंडी नाहीं तर कशी असायची? म्हणून बोललों. आतां मला वाईट वाटतं." मग गाडीला सिग्नल दिल्याप्रमाणें हात लावून तो म्हणाला, "हं बाई, चला पुढें."

मिस् हिक्स म्हणाली, "शाबास! हं आतां धडा सुरूं हं! सारी मंडळी हुश्शार!"

ज्यो म्हणाला, "हुश्शार? अहो बाई नीट पहा, सगळ्यांना केव्हांच झोंपा लागल्या आहेत!"

ज्योची विनोदी वटवट मिस् हिक्सला मनांतून आवडत होती, परंतु वरकांती त्याला धाक दाखवला पाहिजे म्हणून ती म्हणाली, "हें बघ ज्यो, आतां तुला अखेरचं बजावतें. पुन्हां तूं पांचटपणा केलास तर तुला वर्गांतून हांकून देईन."

ज्यो म्हणाला, "बाई, मी पांचटपणा करीत नाहीं. खरंच बघा वर्गाकडे. सगळे झोंपेनें पेंगताहेत! माझे खास दोस्तसुद्धां! 'बेस बॉल' खेळण्यांत येवढे पटाईत पण इथें वर्गांत आले, कीं लागले डुलक्या घ्यायला. काय, करावं काय यांना!"

होमर त्याला म्हणाला, " ज्यो, तोंड आटोपतोस कीं नाहीं ? सदाच पांचटपणा करायचा हें कांहीं चांगलं नाहीं. तुझं डोकं मोठं कोटीबाज आहे माहीत आहे सर्वांना."

मिस् हिक्स म्हणाली, " गप, गप ! तुम्ही दोघंहि गप बसा पाहूं ! हां, आतां ११७ वं पान उघडा. दुसरा पॅरिग्राफ. प्राचीन इतिहास हा विषय रुक्ष वाटण्यासारखा आहे, व कुणी म्हणेल या विषयाच्या अभ्यासाची गरज तरी काय ? आज आपल्या डोळ्यांदेखत केवढा तरी महत्वाचा इतिहास घडत आहे. अशावेळीं जगाच्या इतिहासांतल्या एका जुन्यापुराण्या प्रकरणा-कडे लक्ष देण्यांत काय फायदा ? परंतु ही समजूत बरोबर नाहीं. प्राचीन काळ, त्या काळांतली संस्कृति, लोक, त्या लोकांची रहाणी इत्यादि गोष्टींची माहिती करून घेणं महत्वाचं आहे. बोला, इथें माझ्या टेबलाजवळ् येऊन धडा वाचण्याची कोणाची तयारी आहे ?"

ह्यूबर्ट ॲक्लेनं व दोन विद्यार्थिनींनीं हात वर केले.

ज्यो होमरला हळूंच म्हणाला, " बेट्याचं तोंड तरी पहा."

मिस् हिक्सनं धडा वाचण्यासाठीं हेलनला बोलावलं. ती आपल्या जागे-वरून उठून जाऊं लागली तेव्हां होमर अगदीं भाळून गेल्याप्रमाणें तिच्याकडे पहात राहिला. हेलन मिस् हिक्सच्या टेबलाजवळ पोचली, क्षणभर एखाद्या अतिसुंदर पुतळीप्रमाणें स्तब्ध उभी राहिली, आणि मग ती धडा वाचूं लागली ती अशा कांहीं विलक्षण निर्मळ आणि गोड आवाजांत, कीं होमरच्या मनांत आलं, हिचं मोहक शरीर अन् हिचा श्रुतिमनोहर आवाज म्हणजे दोन अद्-भुत चमत्कारच म्हणावयाचे.

हेलन वाचूं लागली. " ॲसीरियन लोक लांब लांब केस वाढवीत, दाढ्या राखीत, व त्यांची नाकेंहि मोठी आणि लांबट असत. त्यांनी उत्तरेकडील निनेव्हे हें शहर मोठ्या भरभराटीस आणलें. हिटाईट, इजिप्शन वगैरे लोकांशीं झगडून त्यांनीं अखेर बॉबीलॉन शहर जिंकलें......टिग्लाथ पिलेसर नांवाच्या राजाच्या कारकीर्दीत यांनीं एकाहून एक असे पराक्रम केले......

हेलनला वाचतां वाचतां दम लागला म्हणून श्वास घेण्यासाठीं ती थोडीशी थांबली, पण ती पुढें वाचूं लागणार इतक्यांत होमरनं सबंध वर्गाला प्रश्न केल्या-प्रमाणें विचारलं, " पराक्रमावरून मला आठवण झाली. मला बरेच दिवस एक गोष्ट विचारायची आहे. हा ह्यूबर्ट अ‍ॅक्ले जेव्हां तेव्हां मोठी शेखी मिरवीत असतो. इतिहासांतला हा भाग नीट ऐकावा आणि सांगावं त्यानं अगर त्याच्या बापजाद्यांनीं कोणते पराक्रम केले आहेत तें. मोठ्या कुळांतला म्हणून सदा शेखी मिरवीत असतो. कळूं दे तरी एकदां आम्हांला याच्या घराची बहादुरी. "

तें ऐकून ह्यूबर्ट साहजिक रागावला, परन्तु सभ्यपणा न सोडतां व वर्गातली शिस्त न मोडतां तो फक्त मिस् हिक्सला म्हणाला, " बाई, कांहींतरी काढून माझा अपमान करण्याचा हा खोडसाळ प्रयत्न आहे. याची गय होतां कामा नये. तुम्हीं होमरला प्रिन्सिपलकडे धाडलं पाहिजे. तुम्हीं त्याला अशी शिक्षा देणार नसाल तर तसं मला सांगा म्हणजे काय पारिपत्य करायचं तें माझं मी करीन."

होमर आपल्या जागीं एकदम उभा राहिला व म्हणाला, " अरे बस कर. मोठा पारिपत्य करणारा आलाय. रागवायला काय झालं ? " तेवढ्यांत त्यानं हेलनकडे दृष्टिक्षेप केला व जणूं तिच्यासाठीं म्हटलं, " मी जो प्रश्न विचारतों आहे त्यांत वावगं काय आहे बुवा ? सरळ आहे माझं विचारणं ! " मग पुन्हां वर्गाकडे पाहून तो बोलूं लागला, " हा ह्यूबर्ट जेव्हां तेव्हां आपल्या घराण्याची शेखी मिरवीत असतो, तेव्हां त्यानं सांगावं ह्या अ‍ॅसीरियन लोकाप्रमाणें ह्याच्या आजापणजांनीं अगर बापजाद्यांनीं कांहीं तरवार गाजविली होती कीं काय ? "

ह्यूबर्ट म्हणाला, " हें पहा येवढं खास, कीं आमच्या घराण्यांतला एकहि पुरुष तुम्हां दरिद्री लोकासारखा मवाली नव्हता ? "

होमर चिडून म्हणाला, " मवाली ? म्हणजे काय बुवा ? हें बघ, मला शिव्या द्यायच्या झाल्या तर मला कळतील अशा तरी दे कीं ! " हेलनकडे बघत तो म्हणाला " हं: मवाली म्हणे ! काय बोलतंय खुळं तें समजत देखील नाहीं ! "

हेलन इतका वेळ धडा वाचण्याचं बंद करून उभी होती. तिनं मिस् हिक्सकडे पाहिलं व वाचन पुन्हां सुरू करण्यास तिची परवानगी आहे काय याचा अदमास घेतला. परंतु मिस् हिक्सनं तिला पुढें वाचण्याची खूण केली नाहीं. उलट ती अगदीं गप्प राहिली. तिनं सबंध वर्गाकडे नजर फिरविल्या-सारखं केलं व नंतर म्हटलं,

" होमर मकॉले आणि ह्यूबर्ट ॲक्ले या दोघांनीं शाळा सुटल्यावर जायचं नाहीं. इथं वर्गांत बसून राहायचं."

हें ऐकतांच होमर चमकला. त्यानं घाईनं म्हटलं, " पण बाई, शाळा सुटल्यावर तिसऱ्या प्रहरीं शर्यत आहे ना?"

मिस् हिक्स म्हणाली, " असेल शर्यत. मला काय करायचं आहे! शरीरसंपत्ति कमावणं जितकं महत्त्वाचं आहे तितकंच सभ्यता, नम्रता, रीत-भात शिकणं महत्त्वाचं आहे. कदाचित हेंच शिक्षण अधिक महत्त्वाचं म्हणावं लागेल."

ह्यूबर्ट ॲक्ले म्हणाला, " पण बाई, आजची शाळेची शर्यत मी जिंकणार हें जवळ जवळ ठरलेलं आहे. आणखी दोन आठवड्यांनीं जी मोठी खुली शर्यत होणार आहे तिच्यांत मी शाळेचा प्रतिनिधि म्हणून भाग घेतला तर शाळेचं नांव होण्यासारखं आहे. मी तिसऱ्या प्रहरच्या शर्यतींत भाग घेतलाच पाहिजे असा बायफील्ड आग्रह धरून बसेल कीं नाहीं पहा."

होमर म्हणाला, " बायफील्डनं आग्रह धरण्याचं हे काय प्रकरण आहे मला माहीत नाहीं. पण आजच्या शाळेच्या शर्यतींत मी भाग घेणार आहे येवढं मला माहीत आहे."

" तूं भाग घेणार आहेस? तूं नांव घातलं असशील अशी मला कल्पना नव्हती."

" नसेल. पण मी शर्यतींत नांव घातलेलं आहे समजलास?" मग मिस् हिक्सकडे वळून तो म्हणाला, " बाई, आत्तांपुरती आम्हांला दोघांना तुम्ही जर क्षमा करून सोडून दिलंत तर मी वचन देतों, कीं पुन्हां कध्धीं कध्धीं मी वर्गांत दांडगाई करणार नाहीं, अगर तुमच्या शब्दाबाहेर जाणार

नाहीं, किंवा कांहीं खोडी करणार नाहीं. ह्यूबर्ट देखील तुम्हाला असं वचन देईल. काय रे, देशील कीं नाहीं ?"

ह्यूबर्ट चटकन म्हणाला, "होय बाई, मी सुद्धां वचन देतो."

परन्तु प्राचीन इतिहासाची ती शिक्षिका चर्येवरचं गांभीर्य ढळूं न देतां म्हणाली, "तुम्ही दोघांनीं शाळा सुटल्यावर इथें वर्गात बसून राहिलंच पाहिजे. समजलांत ? हं चल हेलन, सुरू कर, पुढें वाच."

हेलन पुढें वाचूं लागली, "...दक्षिणेकडील खाल्डियन लोक आणि उत्तरेकडील पर्शियन लोक यांच्या संयुक्त सैन्यानीं असीरियन साम्राज्यावर जोराचे हल्ले चढविले व त्यांचें निनेव्हे शहर हस्तगत केलें. बॅबिलोनचें साम्राज्य दुसरा नेबुचॅडझ्झर यानें हस्तगत केलें. पर्शियाचा राजा सायरस यानें प्रचंड सैन्यानिशीं स्वारी करून तें सायरसकडून हिसकावून घेतलें. परन्तु त्याच्याहि हातीं तें दीर्घकाल टिकलें नाहीं. कारण अलेक्झांडर दी ग्रेट यानें पुढें लवकरच त्याच्यावर स्वारी करून विजय मिळविला..."

होमर थकून गेलेला होता. मनांतल्या मनांत चिडलेला होता. परन्तु हेलनचा मधुर मंजुळ आवाज त्याच्या कानावर पडूं लागल्यावर थोड्याच वेळानें त्यानें हलकेच आपल्या दोन्ही हातावर डोकं टेकलं व झोपेंत भान विसरावं त्याप्रमाणें तो भान विसरून गेला. विधात्यानं हेलनला केवळ आपल्यासाठींच निर्माण केली आहे ही सुखद भावना एकीकडे त्याच्या मनांत तरळत होती, आणि दुसरीकडे तिच्या कंठातून श्रवणाच्या अमृताच्या धारांचं तो प्राशन करीत होता.

"...साम्राज्याच्या या उदयास्तांतून मानवजातीच्या कल्याणाच्या अनेक गोष्टी निर्माण झाल्या. त्या काळांतील एक मोठा पंडित हामुराबी यानं घालून दिलेल्या विधिनिषेधांतच बायबलमधील आज्ञांचं मूळ आहे. संख्याशास्त्रहि या काळांतच प्रथम तयार झालं. कालगणनेच्या शास्त्राचा उगमहि या काळांतच झाला. आणि खगोलाच्या अभ्यासासाठीं राशिचक्राची कल्पना शास्त्रज्ञांनीं प्रथम बसविली ती या काळांतच. अलीकडे

ऑशियामायनरमध्यें जे भूमिगत अवशेष सांपडले आहेत त्यांवरून असं दिसतं, कीं प्राचीन काळीं त्या ठिकाणीं एक टोलेजंग साम्राज्य असलें पाहिजे..."

एकीकडे स्वप्न पहात असतां माणसानं विचार करावा त्याप्रमाणें होमर स्वतःशीं म्हणाला, "टोलेजंग साम्राज्य ? कुठें ? इथें, इथाका गांवांत ? छे छे, कॅलिफोर्नियाच्या या भूमिवर कधीं काळीं एखादं साम्राज्य होऊन गेलंच असलं तर तें झालं आणि गेलं इतकंच ! त्या साम्राज्याच्या संस्कृतीचे कसलेहि अवशेष मागं राहिले नाहींत. शोध नाहींत, कालगणना नाहीं, राशिचक्र नाहीं, कांहीं एक नाहीं ! ज्याची कसलीहि खूण मागं उरलेली नाहीं असं तें साम्राज्य या भूमीवर कुठें होतं ?..." होमर एकदम सांवरून बसला व त्यानं सभोंवार दृष्टि टाकली. त्याच्या नजरेला फक्त हेलनचं सौंदर्ययुक्त मुखमंडल दिसत होतं. त्या दिव्य शोभेपुढें साम्राज्यांची काय किंमत् होती ? फक्त हेलनचा अतिमधुर आवाज त्याला ऐकूं येतं होता ! तो आवाज म्हणजे मनुष्य जातीच्या अभ्युदयाची परिसीमा होती...

हेलन पुढें वाचीत होती. " पुढें कालांतरानें हिटाइट लोक समुद्रकिनाऱ्याच्या पट्टीवरून खालीं सरकले व इजिप्तमध्यें शिरले. हिब्रू जातींच्या रक्तांत त्यांचं रक्त मिसळून गेलं. हिटाइट लोकांच्या नाकाचा वारसा हिब्रू लोकांकडे आला."

हेलन मिस् हिक्सकडे वळली व म्हणाली, " बाई, धडा संपला."

मिस् हिक्स म्हणाली, " ठीक आहे. तूं आपल्या जागेवर जाऊन बैस. फार सुंदर वाचलंस. शाबास !"

हेलन आपल्या जागेवर जाऊन बसल्यावर मिस् हिक्स सबंध वर्गाला उद्देशून म्हणाली, " आतां जो धडा आपण वाचला त्यावरून आपण कोणत्या कोणत्या गोष्टी शिकलों, बोला ?"

होमर चटकन म्हणाला, " पहिली गोष्ट शिकलों ती ही, कीं जगांतल्या साऱ्या माणसांना नाकं असतात."

हें चमत्कारिक उत्तर अगदींच अनपेक्षित होतं. परन्तु त्याकडे अधिक लक्ष न देतां मिस् हिक्सनें विचारलं, " आणखी काय शिकलों आपण ?"

होमर मघांप्रमाणेंच चटकन म्हणाला, " हें कीं माणसाच्या नाकाचा उपयोग फक्त सर्दी झाली कीं शिंकण्यापुरताच नसून प्राचीन इतिहासाची नोंद ठेवण्याचं तें एक महत्वाचं साधन आहे."

" दुसऱ्या कुणाला कांहीं सांगायचं आहे का ? होमरला नाकाशिवाय कांहीं सुचत नाहीं असं दिसतंय. "

" पुस्तकांत आहे म्हणून मी बोललों. नाकाचा उल्लेख ज्याअर्थी पुस्तकांत केलेला आहे त्याअर्थी नाकाचं महत्व फार असलं पाहिजे."

" मला वाटतं नाक या विषयावर स्वयंस्फूर्त भाषण करण्याची लहर आली आहे तुला. "

" अं...अं...भाषण असं कांहीं नाहीं, पण मला असं वाटतं प्राचीन इतिहासावरून एक गोष्ट उघड दिसते. ती ही, कीं प्राचीनकाळींसुद्धां लोकांना नाकं होतीं. या वर्गात सभोंवार दृष्टि टाकल्याबरोबर हा सिद्धांत पटण्यासारखा आहे. ज्याला त्याला नाक आहे बघा. खरं म्हटलं तर माणसाचं नाक म्हणजे त्याच्या शरीरांत सर्वांत हास्यास्पद अवयव होय. त्या अवयवाचं काय करावं हें मनुष्याला कधींहि नीटसं कळलेलं नाहीं. हिटाईट लोकांचीं नाकं मोठीं आणि बाकदार होतीं म्हणूनच मला वाटतं त्यांनीं इतर लोकांवर येवढे विजय मिळविले. सूर्याच्या सावलीवरून दिवस मोजण्याची युक्ति प्रथम कोणाला सुचली ही गोष्ट फारशी महत्त्वाची नाहीं. कारण त्या माणसाला ती सुचली नसती तरी देखील पुढें केव्हां तरी आणि कुणीतरी घड्याळाचा शोध लावला असताच. ज्यास्त महत्त्वाचा प्रश्न आहे तो असा, कीं माणसाला नाक केव्हांपासून आणि कसं प्राप्त झालं. "

वर्गांत जिकडे तिकडे हंशा झाला. गमत्या ज्यो अगदीं एकाग्रतेनं ऐकत होता. होमरचा थोडासा मत्सर देखील त्याला वाटूं लागला. पुढें काय बोलावं याचा विचार करण्यासाठीं क्षणभर थांबून होमर पुन्हा बोलूं लागला—

" नाकाचे विविध उपयोग आहेत. कांहीं माणसं नाकांतून घोरतात, कांहीं नाकांतून बोलतात, आणि कुणी कुणी तर नाकांतून गातातसुद्धां. कांहीं माणसं अशी असतात कीं इतरांनीं त्यांच्या नाकांत वेसण घालून त्यांना खुशाल

इकडे तिकडे हिंडवावं. नको तिथें नाक खुपसण्यासाठीं कित्येक लोक नाकाचा उपयोग करतांना दिसतात. नाकानं कांदे सोलणं अगदीं सोपं आहे. कांहीं गोष्टी दुसऱ्याच्या नाकावर टिच्चून करायच्या असतात. कित्येकांच्या नाकीं नऊ चटकन येतात, कित्येक नाक घांसायला नेहमी तयार असतात, तर उलट कित्येकांच्या नाकावरची माशी देखील उठत नाहीं. वास्तविक पहातां नाक हें एखाद्या झाडासारखं स्थिर आहे. परंतु तें एका हालचाल करणाऱ्या वस्तूवर—म्हणजे तोंडावर—बसविलेलं असल्यामुळें नको त्या ठिकाणीं त्याला जावं लागतं, अनेक प्रसंगीं त्याची उगीच अडचण मात्र होते, व त्याचे स्वतःचे हालहि कांहीं कमी होत नाहींत. वास्तविक हवेंत जें कांहीं असेल त्याचा वास घेणं हें नाकाचं कार्य. परंतु कांहीं लोक त्याचा फार वाईट उपयोग करतात. इतरांना तुच्छ लेखण्यासाठीं तें आपलं नाक चढवितात." हें बोलतांना होमरनं मुद्दाम ह्यूबर्ट आणि हेलन यांच्याकडे नजर टाकली. "या लोकांचीं नाकं पहावीं तों सदा वर केलेलीं असतात. जणुं कांहीं नाकाच्या सहाय्यानं आपल्याला स्वर्ग दोन बोटं उरेल असं त्यांना वाटत असतं. माणसाच्या नाकासारखं नाक पशुपक्षांना नसतं. त्यांना फक्त नाकपुड्या असतात. परंतु असं असूनहि त्यांना माणसांपेक्षां वास अधिक येतो." होमरनं मोठा श्वास घेतला व आपल्या भाषणाचा समारोप करायचं ठरविलं. "सारांश काय? तर नाक ही एक मोठी आपत्ति आहे. नाकाच्या ठेवणीवरून शत्रू मित्र ठरविले जातात, कलह माजतात, युद्ध उत्पन्न होतात, जुन्या स्नेहाचं रूपांतर वैरांत होतं, कुटुंबच्या कुटुंब धुळीला मिळतात! बाई, आतां तरी मला शर्यतीला सोडाल काय?"

एका क्षुल्लक विषयावर होमरनं अत्यंत कल्पकतापूर्ण मार्मिक भाषण केलेलं ऐकून मिस् हिक्स अतिशय खूष झाली होती. परन्तु वर्गातली शिस्त संभाळण्यासाठीं तिनं जी शिक्षा सांगितली होती तिच्यांत बदल करण्याची तिची इच्छा नव्हती. ती म्हणाली, "होमर शाळा सुटल्यावर तूं इथें वर्गात बसून रहायला पाहिजेस आणि ह्यूबर्ट तूंसुद्धां! जो धडा आपण आतां वाचला त्याच्यावर आणखी कुणाला कांहीं बोलायचें आहे काय?"

परंतु तितक्यांत घंटा वाजली. सारीं मुलं आपापलीं पुस्तकें गोळा करून उठलीं, व घाईघाईनें वर्गाबाहेर पडलीं. शर्यतीच्या मैदानावर केव्हां पोंचूं असं प्रत्येकाला झालं होतं.

होमर आणि ह्यूबर्ट हे दोघे मात्र वर्गांत बसून राहिले होते !

# ११

शाळेच्या प्रिन्सिपलच्या ऑफिसांत बायफील्ड उभा होता. प्रिन्सिपल त्याला म्हणत होता, "मिस् हिक्स ही या शाळेंतली सर्वांत उत्तम अन् सर्वांत जुनी शिक्षिका आहे. मी या शाळेंत होतों तेव्हां तिच्या हाताखालीं शिकलों. तूंहि तिच्या हाताखालीं शिकलास. तिचा एखादा हुकूम माझ्या अधिकारांत फिरविणं मला आवडणार नाहीं. दोन दंगेखोर पोरांना शिस्त लावायसाठीं तिनं—"

बायफील्ड म्हणाला, "ह्यूबर्ट दंगेखोर मुलगा नाहीं. होमर आहे. पण ह्यूबर्ट नाहीं तो श्रीमंत खानदान कुळांतला आहे."

प्रिन्सिपल म्हणाला, "होय, तें बरोबर आहे. परंतु मिस् हिक्सनं त्याला वर्गांत रहायला सांगितलं असेल तर त्यानं वर्गांत राहिलंच पाहिजे. ह्यूबर्ट सभ्य आहे, त्याचा बाप सभ्य होता, याबद्दल वाद नाहीं. परंतु मिस् हिक्सनं कधींहि कुणालाहि विनाकारण शिक्षा केलेली नाहीं. ह्यूबर्टला शर्यतींत भाग घेतां आला नाहीं तर त्याला इलाज नाहीं. पुढें केव्हां तरी त्याला भाग घेतां येईल."

विषय संपविल्याप्रमाणें प्रिन्सिपलचा स्वर होता. अर्थात् बायफील्डहि कांहीं न बोलतां तेथून गेला. परंतु क्रीडांगणाकडे न जातां मिस् हिक्सच्या

वर्गाकडे तो गेला. तिला अभिवादन करून तो म्हणाला, " माझं आणखी प्रिन्सिपल यांचं बोलणं झालं आहे. " तेवढ्या एका वाक्यांत त्याला सुचवायचं होतं, कीं ह्यूबर्टला सोडून देण्याचा हुकूम त्यानं मिळविला होता. होमरला मात्र वाटलं, कीं आपली देखील सुटका होणार. तो झटकन उभा राहिला.

बायफील्ड तुच्छेतेच्या स्वरानं म्हणाला, " तूं नव्हेस ह्यूबर्ट. "

मिस् हिक्सनं विचारलं. " काय, चाललंय काय हें ? "

बायफील्ड म्हणाला, " ह्यूबर्ट, ताबडतोब शर्यतीच्या वेळचा पोषाख चढव आणि ताबडतोब मैदानाकडे ये, आम्हीं तुझी वाट पाहूं. "

" असं असं ? वा ! " मनांतला संताप होमरला अनावर झाला होता, " ह्यूबर्टला घेऊन चाललांत, पण माझ्याबद्दल काय ? "

बायफील्डनं कांहींएक उत्तर केलं नाहीं. तो वर्गातून निघून गेला. ह्यूबर्टला हा प्रकार कांहीं फारसा आवडला नाहीं. त्याची चर्या गोंधळल्यासारखी दिसली. पण क्षणभरच घोंटाळल्यासारखं करून तोहि बायफील्डच्या मागोमाग गेला.

होमर मोठ्यांदा ओरडला " पहा पहा बाई ! हा धडधडीत पक्षपात नाहीं तर काय ? "

मिस् हिक्स झालेल्या प्रकारानं स्वतःच इतकी चिडून गेली होती, कीं तिच्या तोंडून शब्द फुटेना. थोड्या वेळानं मात्र ती हलकेंच म्हणाली, " बायफील्ड गाढव आहे, आणखी गाढवांचाच शिक्षक होण्याची त्याची लायकी आहे ! " पण येवढं म्हणून ती एकदम थांबली. आपल्या तोंडून असभ्य शब्द बाहेर पडावेत हें तिला बरं वाटलं नाहीं. मग ती म्हणाली, " मी असं बोलायला नको होतं. परंतु बायफील्डच्या अंगांत शहाणपणा नाहीं येवढंच नव्हे तर सत्याची चाड देखील नाहीं ! "

असे कडू पण साहजिक उद्‌गार मिस् हिक्सच्या तोंडांतून निघालेले ऐकून होमरला फार बरं वाटलं. इतकी चांगली शिक्षिका जगांत दुसरी नसेल असं त्याच्या मनांत आलं. तो म्हणाला, " बायफील्डविषयीं मला नेहमीं तिटकारा

वाटत आलेला आहे. बाई, तुम्हालाही तो आवडत नाहीं हें पाहून मला फार बरं वाटलं."

मिस् हिक्स म्हणाली, "हें बघ होमर, या शाळेंत मी पस्तीस वर्षे काम करतें आहे. इथाका गांवांतील शेकडों मुलं आणि मुली माझ्या हाताखालीं शिकलीं आहेत. एखाद्या आईप्रमाणें मी त्या सर्वांना वागविलं आहे. तुझा भाऊ मार्कस् आणि बहीण बेस या दोघांना मीं शिकविलं. तुला आणखीं धाकटे भाऊ आणि बहिणी असतील तर त्या सुद्धां एक दिवस माझ्या वर्गांत येतील."

होमर चटकन म्हणाला, "मला एकच धाकटा भाऊ आहे. त्याचं नांव युलिसेस. बाई मार्कस् शाळेंत असतांना कसा होता?"

"मार्कस् आणि बेस दोघंहि फार चांगलीं सद्‌गुणी अन् सुसंस्कृत मुलं होतीं. होय, सुसंस्कृत." त्या शब्दावर विशेष जोर देऊन तिनं म्हटलं. "आपले प्राचीन पूर्वज संस्कृति संभाळून वागले, त्यामुळें मार्कस् व बेस जन्मापासूनच सभ्य, सुविनीत अन् सुसंस्कृत होतीं. तूं ज्याप्रमाणें खोडी करण्यासाठीं वर्गांत मध्येंच बोलतोस त्याप्रमाणें मार्कस् देखील कधीं कधीं बोलत असे. परंतु तो कधीं खोटं बोलला नाहीं. या बायफील्डसारखीं जीं मूर्ख माणसं आहेत त्यांना वाटतं मी आतां म्हातारी झालें. हा बायफील्ड माझ्या वर्गांत जेव्हां होता तेव्हां वारंवार खोटं बोलत असे. मला माहीत आहे कीं आतां त्यानं मला जें सांगितलें तें खोटं आहे. याचा अर्थ इतकाच कीं तो एरंडासारखा वाढला, परंतु त्याला कांहींएक अक्कल आलेली नाहीं. ज्यांना तो केवळ मूर्खपणानं आपल्यापेक्षां वरिष्ठ कुळांतले समजतो, त्यांची थुंकी कशी झेलावी ही एकच गोष्ट तो शिकला."

"हो हो!" असा उद्‌गार होमरनं अशा कांहीं स्वरांत काढला कीं 'उडवा बाई, उडवा त्या बायफील्डची आणखी.'

मिस् हिक्स पुढें म्हणाली, "खऱ्या योग्यतेचीं माणसं मागं पडतात, आणि बायफील्डसारखीं लबाड खोटारडीं माणसं वर चढतात असं मीं पाहिलं आहे. सज्जन माणसांना यांच्यासारखं अप्रमाणिकपणं वागता येत नाहीं. जगाच्या गर्दींत बायफील्डसारखे लुच्चे लोक त्यांना सहज दूर ढकलूं शकतात,

व शर्यतींत पुढें जातात ! हा आज ताव्यांच्या शर्यतीवर देखरेख करणार म्हणे हं: !" आंतल्या आंत त्या वृद्धेच्या मनांचा इतका संताप झाला होता कीं तिनं झटकन रुमाल काढला, नाक शिंकरलं अन् डोळे पुसले.

तें पाहून होमर म्हणाला, " जाऊं दे बाई, तुम्हीं इतकं वाटून घेऊं नका. मी वर्गात राहीन ! मला काय शिक्षा द्यायची असेल ती खुशाल द्या. यापुढें मी कधीं खोडी करणार नाहीं. मी चांगलं व्हायचं ठरविलं आहे. आपले शिक्षक आपल्यासारखेच—माणसांसारखेच—असतात असं मला पूर्वी वाटत नसे. परंतु आतां मला कळलं, कीं आपले शिक्षक आपल्यापेक्षांहि चांगले असतात. तेव्हां जाऊ द्या बाई. तुम्हीं कांहीं वाटून घेऊं नका. माझी मुळींच तक्रार नाहीं. खुशाल हवी ती शिक्षा करा मला."

मिस् हिक्स म्हणाली "तुला मी वर्गात ठेवून घेतलं तें शिक्षा करण्यासाठीं नव्हे. मुलांना शाळा सुटली तरी मागं ठेवून घेण्यांत त्यांना शिक्षा करण्याचा माझा उद्देश नसतो त्यांचा अधिक जवळून परिचय करून घ्यावा अशी माझी इच्छा असते. खरं म्हणजे तुम्हांला दोघांनाहि मी लवकरच सोडून देणार होतें. तुम्हांला शासन करावं म्हणून नव्हे तर तुम्हाला चार गोष्टी समजून सांगाव्या यासाठीं मी तुम्हांला ठेवून घेतलं होतं. माझ्या वर्गात जी मुलं असतात त्यांच्या मनाची व अंतःकरणाची वाढ कशी होत आहे याकडे माझं लक्ष असतं. ती योग्य प्रकारें होत आहे असं जेव्हां जेव्हां मला आढळून येतं तेव्हां तेव्हां मला फार समाधान वाटतं. तुम्हां दोघांशीं मला मोकळेपणानं बोलायचं होतं म्हणून मी बसवून घेतलं होतं. ह्यूबर्ट चांगल्या प्रतिष्ठित व श्रीमंत घराण्यांतला आहे. तुझं कुटुंब गरीब असलं तरी प्रतिष्ठित आणि अब्रूदार आहे. ह्यूबर्ट श्रीमंताचा मुलगा आहे, परंतु जगांत नांवलौकिक मिळविणं त्याला तुझ्यापेक्षा अधिक सोपं जाणार आहे असं तूं समजूं नकोस. कदाचित् त्याला तें अधिक अवघडच जाईल. तुम्हांला दोघांना एकमेकांची अधिक ओळख करून द्यावी अशी माझी इच्छा होती. तुम्हां दोघांशीं मला बोलायचं होतं. तुमच्यांतला वैरभाव मला नाहींसा करावयाचा होता. तुम्ही दोघं एकमेकांना आवडण्यासारखे आहांत—"

होमर हलकेच म्हणाला, " मला वाटतं ह्यूबर्ट मला मनांतून आवडतोहि परंतु इतरापेक्षां आपण कोणी तरी विशेष आहोंत अशी शेखी दाखवायची त्याला खोड आहे. "

" तें मला माहीत आहे, अन् त्याची तुला कां चीड यावी तेंहि मला कळतं. परंतु त्याचं असं आहे, जगांत प्रत्येकजण कुणापेक्षांतरी वरचढ हा असतोच; आणि उलट त्याच्यापेक्षां दुसरा कुणीतरी वरचढ असतोच. ज्योचं उदाहरण घे, ह्यूबर्टपेक्षां त्याची बुद्धि खात्रीनं अधिक तीव्र आहे. पण म्हणून ह्यूबर्ट त्याच्यापेक्षां अधिक वाईट आहे असं नाहीं. सगळीं माणसं सारखीं हें लोकशाहीचं तत्व आहे. परन्तु या सारखेपणाचा खरा अर्थ काय ? तर प्रत्येकाला प्रयत्न करण्यास सारखाच अवसर असावा. ही प्रयत्नाची मर्यादा ओलांडली, कीं सारखेपणा संपला. त्या मर्यादेच्या पलीकडे जो तो मनुष्य सज्जन अगर दुर्जन व्हायला, स्वार्थत्यागानं अगर मूर्खपणानं वागायला आपापल्यापरीनं स्वतंत्र असतो. माझ्या हाताखालीं शिकणाऱ्या मुलांनीं प्रयत्नाचं महत्व ओळखावं आणि सज्जनपणानं व स्वार्थत्यागानं वागायला शिकावं अशी माझी तळमळ अन् खटपट असते. मुलं वरून कशीं दिसतात त्यांकडे माझं लक्ष नसतं. बाह्य वर्तनांत नम्रता दिसली तरी मी फसत नाहीं. उलट खोडकरपणा दिसला तरी मी माझा गैरसमज होऊं देत नाहीं. मुलाच्या अंतःकरणांत काय आहे तें मी पहात असतें. मुलगा श्रीमंताचा आहे कीं गरीबाचा आहे, कॅथॉलिक पंथाचा आहे कीं प्रोटेस्टंट आहे कीं ज्यू आहे, गोरा आहे, काळा आहे कीं पिवळा आहे, हुषार आहे कीं मंद आहे, इत्यादि प्रश्नाचं मला मुळींच महत्व वाटत नाहीं. मुलांत माणुसकी आहे काय, त्याला अंतःकरण आहे काय, सत्य व स्वाभिमान यांची चाड त्याला आहे काय, आपल्याहून जे कनिष्ठ त्यांचा मान कसा राखावा आणि वरिष्ठांवर प्रेम कसं करावं या गोष्टी त्याला कळतात कीं नाहीं इकडे माझं लक्ष असतं. या गोष्टी माझ्या वर्गातल्या सर्व मुलांच्या ठिकाणीं असायला हव्यात, व तेवढ्यापुरती तीं सगळीं सारखीं असायला हवींत असं मला वाटतं. परंतु यापलीकडे तीं सगळीं सारखीं असावींत अशी माझी इच्छा नसते, व तशी अपेक्षा ठेवणं

चूकच होईल. माझ्या वर्गातल्या प्रत्येक मुलाच्या अगर मुलीच्या अंगांत स्वतंत्र व्यक्तित्व दिसलंच पाहिजे. मला बरं वाटावं म्हणून किंवा माझं काम सुकर व्हावं म्हणून तूं जर ब्रूबर्टसारखं व्हायचं ठरविलंस तर मला आवडायचं नाहीं. माझ्या क्लासांतलीं मुलं एका साच्यांतून काढलेल्या सभ्य स्त्रीपुरुषांसारखीं दिसूं लागावीत अशी माझी मुळींच इच्छा नाहीं. त्यांनीं खऱ्याखुऱ्या अर्थानं जिवंत माणसं व्हावं, प्रत्येकांत माणुसकीचा स्थूल धर्म असावा, परन्तु प्रत्येकाच्या ठिकाणीं त्या माणुसकीला जें प्रत्यक्ष स्वरूप आलं असेल त्यांत भिन्नत्व असावं, गंमत असावी अशी माझी इच्छा असते. हें जें मी आता तुला सांगतें आहे तें तुझ्याबरोबर ब्रूबर्टनंहि ऐकावं अशी माझी इच्छा होती. तुला मी जसं समजावून सांगतें आहे तसं त्यालाहि समजून सांगणार होतें, कीं आज तुला तो आवडत नसला तर अगर त्याला तूं आवडत नसलास तर त्यांत अनैसर्गिक असं कांहीं नाहीं. तुमच्यांत माणुसकी आली असं केव्हां म्हणतां येईल ? तर एकमेकांबद्दल अप्रीति वाटत असूनहि योग्य आदर ठेवून तुम्ही वागायला शिकाल त्या वेळेस. संस्कृति म्हणतात ती यालाच, आणि इतिहासापासून जें शिकायचं तें हेंच..."

मिस् हिक्सनं थांबून होमरकडे पाहिलं. कां तें त्याचं त्यालाच कळेना परंतु तो अगदीं हुंदका द्यायच्या बेतांत आला होता.

ती पुढें म्हणाली, "तुझ्याशीं मी बोललें हें बरं झालं. इतर कुणापेक्षां तुझ्याशींच बोलण्याची माझी इच्छा होती. या शाळेंतून तूं बाहेर पडशील, कालांतरानं माझी आठवणहि तुला रहाणार नाहीं, पण माझं मात्र तुझ्याकडे लक्ष असेल. तुझ्या हातून चांगल्या गोष्टी घडलेल्या ऐकल्या, कीं मला आश्चर्य वाटायचं नाहीं. तुझी योग्यता मला माहीत आहे." प्राचीन इतिहासाच्या त्या वृद्ध शिक्षिकेनं नाक शिंकरलं व हातरुमालानं डोळे पुसले. नंतर ती म्हणाली, "आतां तूं मैदानाकडे पळ बघूं. शर्यतींत भाग घ्यायचा आहे ना तुला ? आटप, जा. शर्यतीचा पोषाख चढवायला तुला वेळ नसला तर आहेस तसाच पळ. लोक हंसले तरी हरकत नाहीं. या जगाचा तूं जसजसा अनुभव घेशील तसतसं लोकांचं हंसणं तुझ्या कानांवर वारंवार येईल. थट्टा,

हंसणं, उपहास, या गोष्टी तुझ्या वाट्यांला येतील. माणसंच हंसतील असं नव्हे तर परिस्थिति देखील संकटाच्या रूपानं तुझा उपहास करील व तुझे पाय ओढण्याचा प्रयत्न करील, परंतु उपहासाकडे तूं लक्ष देणार नाहींस अशी माझी खात्री आहे." तिनं श्वास सोडला व थकल्याप्रमाणें ती म्हणाली, "होमर, जा शर्यतीच्या मैदानाकडे पळ पाहूं, मी बघायला येणार आहे."

होमर झटकन् उठला व वर्गाबाहेर पडला.

ह्यूबर्ट व सकाळीं मेहेनतीच्या वेळीं जे त्याच्याबरोबर धांवले होते ते तीन मुलगे असे चौघेजण शर्यत जिथून सुटायची तिथें आपापल्या आंखलेल्या जागेवर उभे राहण्याच्या बेतांत होते, शर्यत सोडणारा माणूस पिस्तूल उडविण्यासाठीं आपला हात हवेंत उंच करणार इतक्यांत होमर आपल्या जागेवर जाऊन रांकेत उभा राहिला. त्याला मोठी हुषारी वाटत होती, आणि एक प्रकारचा राग आणि चेवहि वाटत होता. त्याच्या अंगावर धड शर्यतीचे कपडे नव्हते, पायांत शर्यतीचे वेळीं घालावयाचे बूट नव्हते, त्याला कुणी शिकविलं नव्हतं, त्याला तयारी करतां आली नव्हती. परंतु कांहीं झालं तरी ही शर्यत जिंकायचीच असं त्यानं ठरविलं होतं. कुणाचीहि अन् कसलीहि मदत त्याला नव्हती. परंतु साहजिकपणें येईल तसं तो धांवणार होता, आणि शर्यत जिंकणार होता !

त्याच्या जवळच उभा असलेला ह्यूबर्ट त्याच्या कपड्यांकडे पाहून म्हणाला "अशा अवतारांत धांवून तूं पहिला येणार होय ? शक्यच नाहीं !"

होमर म्हणाला "असं कां ? मग बघच तर !"

बायफील्ड प्रेक्षकांत बसून होता. कपाळाला आठ्या चढवून तो शेजारच्या माणसाला म्हणाला "हा ! व्यवस्थित कपडे न करतां हा कोण पोरटा शर्यतींत धांवायसाठीं उभा राहिलाय् ?" आणि लगेच त्याच्या लक्षांत आलं तो मुलगा कोण होता तें.

होमरला बाजूला काढून घेऊन मग शर्यत सोडावची असं त्यानं ठरविलं. तो उठला. परंतु तो जाऊन पोंचण्यापूर्वीच बंदुकीचा बार झाला व पांची मुलगे सुटले. पहिल्या टार्टीपाशींच इतर तिघांना मागं टाकून होमर व ह्यूबर्ट पुढें

झाले. दुसऱ्या तार्टीपाशीं होमर ह्यूबर्टच्या पुढें निघाला व मग तो सारखा अधिकाधिक पुढें चालला. धांवता धांवता त्या दोघांची शब्दाशब्दी चालू होती. पहिल्या तार्टीपाशीं ह्यूबर्टनं होमरला ओरडून विचारलं "अरे असं सुंदर पळायला कुठें शिकलास?"

होमरनं उत्तर दिलं "कुठेंहि नाहीं! खरं म्हणजे आतांच शिकतों आहे मी!"

दुसऱ्या तार्टीजवळ ह्यूबर्ट म्हणाला, "घाई काय आहे? फार वेगानं पळतो आहेस तूं?"

"मला शर्यत जिंकायची आहे!"

तिसऱ्या तार्टीपाशीं ह्यूबर्ट म्हणाला, "तूं जिंकणार असं कोण म्हणतो?"

"मी म्हणतों!"

पांचव्या तार्टीपाशीं ह्यूबर्ट म्हणाला, "जरा आस्ते, जरा आस्ते! अजून पुष्कळ मजल गांठायची आहे. असा धांवत सुटलास तर तुझा दम तुटेल आणखी शेवटीं—" परन्तु तें वाक्य पुरं करण्याऐवजीं तो एकदम ओरडला "अरे बापरे, संभाळ! बायफील्ड समोरून येतो आहे बघ."

बरोबर नवव्या तार्टीजवळ बायफील्ड व होमर समोरासमोर आले. होमरनं तार्टीवरून सफाईनं झेप घेतली ती नेमकी बायफील्डच्या अंगावर. दोघांनींहि एकमेकांना कवटाळून जमिनीवर लोळण घेतली. ह्यूबर्ट पुढें धांवण्याचं सोडून थांबला व मागून धांवत येणाऱ्या मुलांना म्हणाला "ए! ए! धावूं नका! जागच्या जागीं उभे रहा! होमरला उठूं द्या. तो सुंदर धांवतो आहे, आणि त्याच्या धावण्यांत अडथळा आलेला आहे."

तितक्यांत होमर उठला व पुढें पळूं लागला. त्याबरोबर बाकीचे चौघे पळूं लागले.

झालेल्या प्रकारानं सारी प्रेक्षक मंडळी थक्क होऊन गेली. हेलन तर बघतच राहिली.

ज्या ठिकाणीं शर्यत संपायची तिथें मिस् हिक्स केव्हाच येऊन उभी राहिली होती, व मोठ मोठ्यांदा ओरडत होती. मात्र ती कुणाला एकालाच म्हणून नव्हे तर सर्वांची नांवं घेऊन उत्तेजन देत होती. "होमर शाबास! ह्यूबर्ट पळ पळ! सॅम, जॉर्ज, हेन्री! अरे पळा, पहातां काय?"

अगदीं अखेरच्या ताटीच्या अलिकडल्या ताटी जवळ ह्यूबर्ट होमरच्या बरोबरीला आला. तो म्हणाला "माफ कर, पण मला तुझी गय करतां येत नाहीं!"

होमर म्हणाला, "छाती असेल तर पुढें जा की!"

शर्यत होमरनं जिंकली कीं ह्यूबर्टनं जिंकली ते ठरवितां येण्यासारखं नव्हतं, दोघांची बरोबरी झाली, त्यांच्या मागोमाग सॅम, जॉर्ज, आणि हेन्री आले, त्या पाची मुलांना गोळा करून पोटाशीं धरून मिस् हिक्स म्हणाली,

"किती छान धांवलात रे! सगळीजण छान धांवलांत!"

ह्यूबर्ट म्हणाला, "बाई, मला तुमची क्षमा मागायची आहे. होमर-प्रमाणेंच मी देखील वर्गात बसून रहायला हवं होतं."

मिस् हिक्स म्हणाली, "आतां तें जाऊं दे! होमरला जेव्हां अडथळा झाला तेव्हां पुढें धांवण्याऐवजीं तूं थांबलास याबद्दल मी तुला शाबासकी देतें."

इतक्यांत बायफील्ड त्या ठिकाणीं आला. तो संतापानें लाल झाला होता. जमिनीवर आपटल्यामुळें चिडला होता. मिस् हिक्सच्या भोंवतीं गोळा झालेल्या मुलांच्यापर्यंत पोंचण्याच्या आधींच दूर अंतरावरून दांत ओंठ खात तो ओरडला, "मकॉले, आतां तूं जें वर्तन केलंस त्याबद्दल शिक्षा म्हणून शाळेच्या कोणत्याहि खेळांत भाग घेण्याची तुला बंदी केलेली आहे."

तो जवळ आला तों अगदीं फों फों करीत आणि डोळे वटारीत. मिस् हिक्सनं त्याच्याकडे वळून विचारलं, "बायफील्ड, तुम्ही होमरला कशासाठीं शिक्षा करीत आहांत?"

बायफील्डनं उत्तर दिलं, "बाई, माफ करा, मी काय करावं अन् काय नाहीं या बाबतींत प्राचीन इतिहासाचा सल्ला नको आहे मला." नंतर होमर-कडे वळून त्यानं म्हटलं "समजलं?"

होमर म्हणाला, " होय सर ! "

" आतां माझ्या ऑफिसांत जाऊन बस आणि मी सांगितल्याशिवाय जाऊं नकोस ! "

" तुमच्या ऑफिसांत ? पण मला तर गेलंच पाहिजे. " त्याला आठवण झाली, कीं तार ऑफिसांत चार वाजतां हजर झालं पाहिजे. त्यानं विचारलं, " आतां किती वाजले असतील ? "

ह्यूबर्टनं आपल्या घड्याळांत पाहून सांगितलं, " पावणे चार "

बायफील्ड ओरडला, " ऑफिसांत जाऊन बस म्हटलं ना तुला ? "

होमर म्हणाला, " पण सर, तुम्हाला माहीत नाहीं. एके ठिकाणीं मला गेलंच पाहिजे. उशीर होईल मला. "

तितक्यांत ज्यो त्या घोळक्यांत शिरला व त्यानं बायफील्डला विचारलं, " होमरला शिक्षा काय म्हणून ? त्यानं कांहीं एक गुन्हा केलेला नाहीं. "

बायफील्डचा संताप आतां अनावर झाला. आधींच बिचाऱ्याचे फार हाल झाले होते. ज्योकडे पाहून तो ओरडला, " तुझं भोचक तोंड आटपतोस कीं नाहीं ! "

त्यानं एक धक्का दिला त्यासरशीं ज्यो कोलमडला, मात्र पडतां पडतां तो चिडून ओरडला, " काय म्हणतां ? भोचक ? "

फुटबॉलच्या खेळांत प्रतिपक्षावर तुटून पडावं त्याप्रमाणें होमर बायफील्डवर तुटून पडला व म्हणाला, " माझ्या मित्राला शिव्या दिलेल्या मी नाहीं ऐकून घेणार. "

ते दोघं जमिनीवर लोळत होते तितक्यांत ज्यो उठून उभा राहिला व संतापाच्या भरांत त्यानं बायफील्डवर अशी कांहीं झेंप घेतली कीं तो पुरताच उताणा झाला.

तितक्यांत प्रिन्सिपल धांवत धांपा टाकीत येऊन पोंचला. " अरे, अरे ! हें काय ! " अशा आरोळ्या ठोकीत त्यानं ज्योला ओढून बाहेर काढलं. बायफील्डला उठून उभं राहतां येईना. प्रिन्सिपलनं विचारलं " बायफील्ड, या विलक्षण प्रकाराचा अर्थ तरी काय ?'

बायफील्डच्या तोंडातून शब्द फुटेना. त्यानं फक्त मिस् हिक्सकडे बोट दाखविलं.

खालीं पडलेल्या बायफील्डकडे बघत मिस् हिक्स म्हणाली "बायफील्ड, मी तुला वारंवार सांगितलं आहे कीं लोकांना धक्के देऊन लोटूं नये. लोकांना तें आवडत नाहीं." प्रिन्सिपलकडे वळून ती म्हणाली, "बायफील्डनं ज्योची माफी मागितली पाहिजे."

प्रिन्सिपल म्हणाला "माफी ? अस्सं ? होय बायफील्ड ?"

मिस् हिक्स म्हणाली, "ज्योचं कुटुंब इटालियन आहे. पण म्हणून त्याला अपशब्द बोलणं कांहीं बरं नाहीं."

ज्यो म्हणाला "माफीबीफी करायची आहे काय मला ? बायफील्ड मला अपशब्द बोलेल तर मी त्याच्या श्रीमुखांत देईन अन् त्यानं मला उलट मारलं तर मी माझ्या भावांना आणीन."

मिस् हिक्स म्हणाली, "ज्यो, बायफील्डला माफी मागूं दे. तो तुझी अगर तुझ्या लोकांची माफी मागणार नाहीं, तर स्वदेशाची माफी मागणार आहे. आपण अमेरिकन आहो याचं भान तो विसरला. अमेरिकन माणसासारखं वागण्याचा प्रयत्न करूं दे त्याला. मागूं दे माफी."

प्रिन्सिपल म्हणाला, "बरोबर आहे. ही अमेरिका आहे; आणि या देशांत परके कोण ? तर आपण अमेरिकेंत आहोंत याचं भान ज्यांना रहात नाहीं. तेच ! बायफील्ड, हं !"

बायफील्ड उठून उभा राहिला, "मी माफी मागतों." असं म्हणून तो झटकन् निघून गेला.

ज्यो आणि होमर दोघे मिळून निघाले. बायफील्डशीं त्याची झोंबाझोंबी झाली त्यावेळेस होमरचा पाय थोडा दुखावला गेला होता त्यामुळें तो थोडा लंगडत होता.

एव्हांना चांगला तीस चाळीस मुलामुलींचा घोळका गोळा झाला होता, त्यांना उद्देशून मिस् हिक्स म्हणाली, "हं, पळा पळा सारीजणं आपापल्या

घरीं ! असं बावरल्यासारखी काय पहातां ? काय, झालंय काय ? कांही नाहीं ! गंमतींत हंसत जा पाहूं सगळी ! "

प्रिन्सिपल म्हणाला, " हं मजेंत आनंदानं जा ! हें महायुद्ध कांहीं कायमचं चालायचं नाहीं ! "

मुलं पांगलीं. त्यांचे छोटे छोटे घोळके आपापल्या घरांच्या दिशांनीं हलके हलके जाऊं लागले.

# १२

होमरचं घर ज्या मोहोल्ल्यांत होतं त्यांतल्या समवयस्क छोट्या छोट्या पोरांचं एक टोळकं होतं. या टोळक्यांत ऑगी नांवाचा एक मुलगा होता. होमरच्या परवानगीनं तो आज छोट्या युलिसेसला घेऊन तार ऑफिसांत आला होता. होमर तारा वांटण्याच्या कामावर गेला होता. परत आल्यावर तो युलिसेसला आपल्या सायकलवरून घरीं पोंचवणार होता. ऑगी थोडा वेळ थांबून वर्तमानपत्रं विकण्याच्या आपल्या नेहमींच्या कामावर निघून जाणार होता.

युलिसेस ग्रॅागनजवळ बसला होता व त्याची प्रत्येक हालचाल निरखून पहात होता. ऑगी थोड्या अंतरावर स्पँग्लरशीं बोलत होता. ग्रॅागनकडे बोट दाखवून त्यानं विचारलं, " तो काय करतो आहे ? "

स्पँग्लरनें उत्तर दिलें, " तार धाडतो आहे तार. "

" कुठें धाडतो आहे ? "

" न्यूयॉर्क. "

" अरे बाप रे ! इतक्या लांब ? तार कशी जाते ? "

" कशी जाते म्हणजे काय ? तारेनं ! "

" हां हां. उंच उंच खांब असतात अन् त्यांना तारा असतात त्या तारावरनं होय ? म्हणजे न्यूयॉर्कपर्यंत खांब आहेत ? अबब ! आपल्या इथाका गांवापासून ? "

" हां हां, न्यूयॉर्कपर्यंत ! "

ऑगीनं विचारलं, " तारा पाठवतं म्हणजे कोण पाठवतं हो ? "

" लोक पाठवतात ! "

वर्तमानपत्र विचारणारा तो छोटा पोऱ्या क्षणभर विचारमग्न झाला, व उद्गारला, " मला जन्मात कधीं तार आली नाहीं बुवा ! कशी येते ? "

" कुणी तरी पाठवावी लागते ! "

" पण मला कधींच आली नाहीं ? कोण पाठवील ? "

" दूर एखाद्या गांवीं तुझा एखादा मित्र असेल तर, अगर असंच कुणी असेल तर—"

" ऊं: ! माझे सारे मित्र तर इथें इथाका गांवांतच आहेत ! " तितक्यांत यंत्राच्या डोक्यावर एक हिरवा दिवा दिसूं लागला तेव्हां ऑगीनं विचारलं, " तो दिवा कशासाठीं लागला ? "

" लाईन खुली झाल्याची खूण आहे ती. "

" कुठली लाईन ? "

" सॅन फ्रॅन्सिस्कोला जाणारी. "

" अस्सं ! " मग ऑगीनं एकदम विचारलं, " तारेचा शिपाई व्हायचं झालं तर किती वर्षांचं असायला पाहिजे ? "

" सोळा. "

" मला तर सारं नववं वर्ष आहे ! सोळावं वर्ष लागेपर्यंत वाट कशासाठीं पहायची ? "

" तसा नियम आहे. "

" हे असे नियम कशासाठीं करतात ? "

तारांचा एक जुडगा फायलींत घालतां घालतां स्पँग्लर म्हणाला, "लहान मुलांनीं कामं करूं नयेत म्हणून !"

"केलीं तर काय बिघडेल ?"

"तीं दमतील, थकतील. त्यांचं खेळण्याचं वय असतं. त्या वयांत त्यांनीं खेळलंच पाहिजे. तेव्हां नियम आहे तो लहान मुलांच्या रक्षणासाठींच आहे !"

ऑगीनं विचारलं, "कशापासून रक्षण ?"

"रक्षण होय ? हं...श्रमापासून ! लहान मुलं नोकरी करूं लागलीं तर मालक लोक त्यांना वाजवीपेक्षां अधिक राबवितील. तसं होऊं नये म्हणून मुलांचं रक्षण झालं पाहिजे."

ऑगीनं विचारलं, "पण आपलं रक्षण करून घेण्याची मुलांची इच्छा नसली तर ? त्याला काम करावंसं वाटत असलं तर ?"

"तरी कांहीं नाहीं. नियमाप्रमाणें त्याला वागावंच लागेल."

ऑगीनं विचारलं, "कितवं वर्ष लागलं म्हणजे लोक आपल्याला लहान मूल म्हणत नाहींत ? आपलं आपल्याला रक्षण करायला केवढं व्हावं लागतं ? मुलगा किती वर्षांचा झाला म्हणजे त्याला कामावर घेतात ?"

"तारेचा शिपाई व्हायचं असेल तर तो सोळा वर्षांचा असला पाहिजे."

ऑगी म्हणाला, "होमरला तुम्ही कामावर घेतलं आहे, नाहीं ? त्याला केव्हां लागलं सोळावं वर्ष ?"

"हं...होमरची गोष्ट सोड, तो चवदाच वर्षांचा आहे खरा, परन्तु तो चांगला मजबूत आहे. अन् शिवाय हुशार आहे."

"हुशार ? ही काय भानगड आहे ? तारेचा शिपाई व्हायला हुशारीची देखील अट आहे कां आणखी ?"

"अट नाहीं, पण हुशारी असलेली बरी. कामधंदा कोणताहि असला तरी त्यांत हुशारीची मदत होतेच."

"असं, पण काय हो, एखादा मुलगा हुशार आहे कीं नाहीं हें तुम्हीं कसं ओळखतां ?"

स्पँग्लर त्याच्याकडे पाहून हंसला व म्हणाला, "त्याच्याशीं दोन मिनिटं बोललं कीं समजतं."

ऑगीनं मध्येंच प्रश्न केला "ते कागद तुम्हीं त्या ठिकाणीं कां ठेवतां आहांत ?"

"काल इथून गेलेल्या तारा आहेत ह्या. त्यांची शहरांप्रमाणें वर्गवारी करून त्या फाईल करायच्या असतात. आतां ही पहा, ही तार सॅन-फ्रॅन्सिस्कोला गेली, तेव्हां ती मी इथें घालणार, या कप्प्यांतल्या साऱ्या तारा सॅन फ्रॅन्सिस्कोच्या आहेत."

ऑगी म्हणाला, "मग यांत काय अवघड आहे ! मी सहज करीन हें ! मला सायकलवर सुद्धां बसतां येतं. माझ्याजवळ सायकल नाहीं येवढंच काय तें. पण समजा मी जर सायकल मिळवली तर मला तारेचा शिपाई होतां येईल ? तुम्ही कामावर घ्याल मला ?"

"हो हो, पण इतक्यांत नाहीं हं ! नऊ वर्षांचा म्हणजे अगदींच लहान आहेस तूं. चौदावं, निदान तेरावं तरी वर्ष असावं."

ऑगीनं घाईनं विचारलं, "बारावं चालेल ?"

"हां, एखादवेळेस चालेल. परंतु तारेचा शिपाई होण्याची येवढी हौस तुला कशासाठीं ?"

"मला शिकायचं आहे. तारा वाचायच्या आहेत, इकडे तिकडे लोकांकडे जायचं आहे." त्यानं एकदम सुस्कारा सोडला व म्हटलं, "मला बारावं लागायला अजून तीन वर्षं पाहिजेत."

"अरे तीन वर्षं काय हां हां म्हणतां निघून जातील."

"छे ! मला नाहीं तसं वाटत. अहो नववं वर्ष लागेपर्यंतच किती वाट पहावी लागली मला."

"चुकतोस तूं. बारा वर्षांचा होशील तें तुझ्या लक्षांत सुद्धां येणार नाहीं. बरं, तुझं नांव सांग कीं आम्हांला ?"

"ऑगस्ट. पण सगळींजणं मला ऑगी म्हणतात."

स्पँग्लरनें हातांतल्या कागदांतून मान वर करून त्याच्याकडे पाहिलं. ऑगी त्याच्याकडे अगदीं गंभीर मुद्रेनं बघत होता. स्पँग्लर म्हणाला, " ठीक ठीक, हें बघ ऑगी, मी तुला वचन देतों कीं योग्य वेळ आल्याबरोबर—"

पण स्पँग्लरनं आपलं वाक्य पुरं केलं नाहीं. कारण तितक्यांत एक सुंदर तरुण स्त्री जवळ जवळ उड्या मारीतच ऑफिसांत शिरली. ज्या बादशाही थाटाच्या मोटार गाडींतून ती आली ती दाराशीं उभी होती. तिच्यांत बसलेल्या ड्रायव्हरच्या अंगावर भारी किंमतीचा थाटाचा गणवेश होता. ती आंत आली ती " ओ हो ! शोधून काढलं कीं नाहीं तुम्हाला " असं मोठ्यांदा म्हणतच आली. तिचा आवाज कांहींसा कृत्रिम परंतु मोठा मधुर होता. प्रेमाच्या गोड भरांत तिनं स्पँग्लरभोंवतीं आपले दोन्हीं हात टाकले, व एखाद्या चित्रपटांत शोभेल अशा रीतीनें त्याचं चुंबन घेतलं.

" आस्ते आस्ते ! " असं म्हणत स्पँग्लरनं तिला दूर ढकललं, व टेबलावर मांडलेल्या फायली व्यवस्थितपणें बाजूला ठेवल्या. नंतर त्यानं तिच्याकडे पाहिल्यावर ती त्याला बिलगूं लागली, तेव्हां तिला आडवून तो म्हणाला " अरे, पण हो हो. हा कोण मुलगा आहे पाहिलंस का ? याचं नांव ऑगस्ट. "

ती स्त्री ऑगस्टला म्हणाली, " कसं काय बाळ ? ठीक आहे ? "

स्पँग्लर म्हणाला, " ऑगी, ही कोण माहीत आहे काय ? ड्याना ! "

" हल्लो ! " त्या सुंदर तरुण स्त्रीशीं काय बोलावं तें ऑगीला सुचेना. खाकेखालचं वर्तमानपत्रांचं जुडगं चांचपीत तो म्हणाला, " विकत घेतां का ? "

ड्याना म्हणाली, " हो हो ! किती किंमत ? "

" फक्त पांच सेंट ! पण शर्यतीचे निकाल आहेत, बाजारभाव आहेत, अन् शिवाय युद्धाच्या अगदीं ताज्यांतल्या ताज्या बातम्या आहेत ! "

' अरे, वा वा ! हे घे पैसे, शाबास. "

ऑगीनें आधीं पैसे घेऊन खिशांत घातले, आणि मग जुडग्यांतला एक अंक काढून, त्याची घडी करून ती मांडीवर आपटून हवेंत उंच धरली ती अशा कांहीं आविर्भावानं कीं जणू तो एखादा जादूचाच प्रयोग करीत होता.

मग त्यानं घडी केलेला अंक ड्यानाच्या हातीं दिला व म्हटलं "थँक यू! बुधवार असला, कीं मी "ईव्हनिंग पोस्ट' आणि 'लिबर्टी' पत्रं विकतों. शुक्रवार असला, कीं कॉलियारचं साप्ताहिक विकतों. एकाच ठराविक कोंपऱ्यावर मी उभा रहात नाहीं. साऱ्या गांवभर चक्कर असते माझी."

"असं का? मग पुष्कळ पैसे मिळवीत असशील रे?"

"रोज सुमारें चाळीस सेंट्स् मिळवतों, जत्रा सुरू झाली कीं 'सोडा-पॉप' विकतो."

"म्हणजे सारखं काम करीत असतोस म्हणायचा?"

ऑगी म्हणाला, "हो, कामहि करतों, अन् तें करतां करतां पुष्कळशा गोष्टी कळायला लागतात. कोण माणूस कसा आहे तें ताबडतोब मी ओळखूं शकतों." त्यानं ज्या तऱ्हेनं ड्यानाकडे हंसत पाहिलं तिच्यावरून त्याचं तिच्याबद्दल फार अनुकूल मत झाल्याचं स्पष्ट दिसत होतं.

"होय, मोठाच हुषार आहेस म्हणायचा." मग एकदम स्पँग्लरकडे वळून ती म्हणाली, "पांच वाजतां टेलिफोन करीन म्हणालां होतां. मी किती किती वाट पाहिली."

स्पँग्लर म्हणाला, "खरंच, मी विसरलोंच बघ. या ऑगीशीं बोलत राहिलों ना. त्याला तारेचा शिपाई व्हायचं आहे. तो मोठा झाला कीं त्याला कामावर घ्यायचं मीं कबूल केलं आहे."

ऑगी जायला निघाला व स्पँग्लरला म्हणाला, "थँक्स, पुन्हा भेटेनच मी तुम्हाला!" त्यानं ड्यानाकडे पाहून 'गुडबाय' म्हटलं, आणि होमरच्या धाकट्या भावाला उद्देशून तो म्हणाला.

"जातों रे युलिसेस!"

ड्याना एकदम टाळी वाजवून म्हणाली, "युलिसेस! अगबाई किती गोड नांव! युलिसेस!" मग ती स्पँग्लरला म्हणाली, "मी घाईत आहें, जातें! तुम्हीं आमच्याकडे जेवायला आलं पाहिजे हं!"

स्पॅंग्लर बोलूं लागला परन्तु त्याला आडवून ती म्हणाली, "अंह, मी कांहीं सबबी ऐकणार नाहीं. आईजवळ तुम्हीं कबूल केलं आहे येईन म्हणून. बरोबर सात वाजतां बरं का ?"

स्पॅंग्लर म्हणाला, "हो हो, आस्ते आस्ते !"

ज्याना म्हणाली, "अं हं, तें कांहीं नाहीं, आमची पुन्हा निराशा करायचा विचार दिसतोय तुमचा. पण बघा हं."

"अग तुझी निराशा करायची छाती आहे का कुणाची या जगांत ? तेव्हां तो प्रश्नच दे सोडून. पण मला सांग, जेवायला येण्याचा येवढा आग्रह काय म्हणून ?"

"माझं तुमच्यावर प्रेम आहे म्हणून !" एखाद्या लहान मुलाला अवघड गोष्ट समजून सांगावी त्याप्रमाणें ती म्हणाली, "माझं तुमच्यावर प्रेम आहे. फार प्रेम आहे. अतिशय प्रेम—" ती अत्यानंदानें हंसली.

"आस्ते, आस्ते, तूं असं बोलूं लागलीस, कीं— "

"बोलूं नको तर काय करूं ? माझं प्रेम आहेच मुळीं तुमच्यावर !" तिनं चर्या गंभीर केली, व ओठ जुळविले.

स्पॅंग्लरनं एक उसासा टाकला व म्हटलं, "साऱ्या जन्मांत मी दोनदांच काय तो दुसऱ्याच्या घरीं जेवायला गेलों. अन् दोन्हीं वेळां असा कांहीं कंटाळा आला कीं—"

ज्याना म्हणाली, "माझी आई अन् माझे बाबा तुम्हाला फार आवडतील. बघा. बरोबर सात वाजतां बरं का ?" तितक्यांत तिची दृष्टि स्पॅंग्लरच्या टेबलावरील अंड्याकडे गेली, व तिनं विचारलं, "ओ हो ! हें काय ? कागदावर ठेवायला मोठं सुंदर वजन काढलंय."

स्पॅंग्लर म्हणाला, "वजन नाहीं तें. अंडं आहे अंड ! शकुनाचं म्हणून ठेवलं आहे मीं."

"किती गंमत ! बरं मी जातें हं." निरोप घेण्यापूर्वी त्याचं चुंबन घ्यावं म्हणून ती पुढें झाली. पण स्पॅंग्लरनं "हं, हं ! आस्ते, आस्ते !" असं म्हणून तिला चुकविलं, व मग ती निघून गेली.

युलिसेस एक शब्द देखील बोलत नव्हता, परंतु प्रत्येक गोष्टीकडे त्याचं लक्ष होतं. कडकट्ट करणारं यंत्र, त्याच्याशीं मधून मधून खटपट करणारा ग्रॉगन, स्पॅग्लर, त्याच्याशीं लगट करणारी ड्याना—प्रत्येक वस्तु आणि व्यक्ति तो अगदीं न्याहाळून घेत होता. जगांत जिकडे तिकडे चमत्कार भरलेला आहे याबद्दल त्याची आणखी आणखी खात्री होत होती.

बऱ्याच वेळानें होमर आपल्या फेरीवरून परत आला. त्याचं काम संपायला अजून पुष्कळच अवकाश होता. पण नव्या तारा आल्या होत्या त्यांतली एक जिथें नेऊन द्यायची होती तिकडे जातांना त्याला आपल्या घरावरून जावं लागणार होतं. म्हणून तो युलिसेसला म्हणाला, "आतां मी तुला घरीं पोंचवतों, चल." त्यानं त्याला उचलून सायकलवर ठेवलं आणि टांग मारली,

मोठा रस्ता संपला तेव्हां युलिसेसनं मागं मान वळवून आपल्या भावाकडे पाहिलं. तो हंसला व म्हणाला,

"होमर ?—"

"काय रे ? काय हवं आहे तुला ?"

"कांहीं नको. पण तुला माहीत आहे का, मला गाणं यायला लागलं आहे."

"छान, छान !"

परवानगी विचारण्याच्या भानगडींत न पडतां युलिसेस गाऊं लागला. "सजणे रडूं नको बाई रडूं नको" तो थांबला, आणि पुन्हा गाऊं लागला. "सजणे रडूं नको बाई रडूं नको" तो पुन्हा थांबला आणि पुन्हां गाऊं लागला.

होमर म्हणाला, "ए वेड्या, हें कांहीं गाणं नाहीं. गाण्याचा एक चरण आहे हा. थांब मी म्हणून दाखवितो तुला, अन् मग तूं माझ्याबरोबर म्हण."

"रडूं नको बाई रडूं नको" हें सबंध गाणं होमरनं म्हटलं.

युलिसेस अगदीं एकाग्र चित्तानं ऐकत राहिला. गाणं संपल्यावर तो म्हणाला, "होमर आणखी एकदां म्हण कीं ?"

" ऐक " असं म्हणून होमर गाऊं लागला. आणि या खेपेस युलिसेस नुसतंच ऐकत राहिला नाहीं तर आपल्या भावाच्या आवाजांत आवाज मिसळून त्यानं गायला सुरवात केली.

त्याचं गाणं चालूं असतांना समोरून एक मालगाडी गेली. एका उघड्या डब्यांत तो काळा निग्रो कठड्याला टेकून उभा होता. त्यानं हंसून हात उंच केला व हालविला. इतका अद्भुत दुसरा चमत्कार युलिसेसनं आपल्या चार वर्षांच्या आयुष्यांत पाहिला नव्हता. त्यानं एखाद्या माणसाला हात उंच करून हालवावा, व त्या माणसानं उलट एकदांच नव्हे तर पुनः पुन्हां हात उंच करून हालवावा म्हणजे काय ! अशी विलक्षण गंमत दुसरी कोणती असूं शकेल काय ? या गंमतीची युलिसेसला जन्मभर आठवण रहाणार होती.

घर आलं तेव्हां होमरनं सायकल थांबविली, आणि युलिसेसला उत्रवून खालीं उभा केला. आंतल्या बाजूस पियानो आणि हार्प वाजत होतं तें ऐकत दोघे भाऊ क्षणभर उभे राहिले. मग होमर म्हणाला, " युलिसेस, आतां घरांत जा. आंत आई, बेस, मेरी सगळ्या आहेत. मला अजून काम आहे. "

युलिसेसनं होमरला विचारलं, " अजून काम आहे तुला ? "

" होय ! आईला सांग मी रात्रीं येईन म्हणून. जा, आंत जा ! "

छोटा युलिसेस हलके हलके पायऱ्या चढूं लागला. दारापाशीं पोंचल्या-वर त्यानं मागं वळून पाहिलं. त्याचा थोरला भाऊ जोरजोरानं सायकल मारीत दूर दूर चालला होता !

## १३

संध्याकाळीं साताचा सुमार झाला होता. जोराचा पाऊस पडूं लागला होता. अशा वेळीं मेरीला बरोबर घेऊन बेस तार ऑफिसाकडे निघाली

होती. होमरनं जरी नको म्हणून सांगितलं होतं तरी त्याच्या आईनं त्याच्यासाठीं फराळाचं तयार केलं होतं व तें पोंचविण्यासाठीं या दोघी निघाल्या होत्या. दोघींनीं अंगावर रेनकोट व उंच उंच बूट चढविलें होते. एका औषधि दुकानाच्या दारांत एक तरुण पुरुष उभा होता. त्यानं बेसकडे पाहून डोळे मिचकवले व विचारलं,

"हल्लो ! कुठें निघालां येवढ्या नखऱ्यांत ?"

बेसनं त्याच्या चटोरपणाकडं दुर्लक्ष केलं व मेरीला अधिक बिलगून ती रस्त्यानं चालूं लागली. त्या दोघीं जरा पुढें गेल्या तों तीन लष्करी शिपाई समोरून येतांना त्यांना दिसले. त्यांना रात्रीपुरती रजा मिळाली होती. नित्याच्या जगांत चार घटका परत येऊन मौज करायला मिळणार म्हणून त्यांना फार आनंद झालेला होता. तशांत पाऊस पडायला लागल्यामुळें त्यांच्या मस्तीखोरपणाला आणखीच ऊत आला होता. ते एकमेकाला ढकलीत होते, मध्येंच शिवाशीव खेळल्यासारखे धांवत होते, आरडाओरड करीत होते, मोठमोठ्यानं हंसत होते, व मधूनच एकमेकांच्या नांवानं आरोळ्या ठोकीत होते. त्यांनीं एकमेकांला दिलेलीं नांवं मोठीं गमतीदार होतीं. लष्ठ, टेकशे आणि घोडे ! मेरी व बेस या दोघी दृष्टीस पडतांच त्यांनीं दंगा मस्ती एकदम बंद केली, कवायतींत पाय जुळवून उभे राहातात त्याप्रमाणें ते उभे राहिले, आणि मग एकेकानें अगदीं खालीं वांकून टोपी काढून सलाम केला. तें पाहून या दोघी मुली मोठ्या खूष झाल्या. मात्र आतां पुढें काय करावं—म्हणजे त्या तिघांशीं कसं वागावं तें न समजून त्या थोड्याशा गोंधळल्या.

मेरी बेसच्या कानांत हलकेंच कुजबुजली, "मला वाटतं हे सैनिक आहेत. कुठले तरी दूर देशचे दिसतात. भ्यायचं कशाला ?"

बेस म्हणाली, "आपण थांबूं या जरा !"

तितक्यांत त्या तिघांपैकीं जो लठ्ठ होता तो पुढें आला. त्यानं पावलं पुढें टाकलीं तीं अशा आविर्भावानं कीं जणूं तो त्या तिघांचा प्रतिनिधि होता. नव्हे, एकंदर सर्व लढाऊ सैनिकांनीं अमेरिकेच्या सर्व देखण्या तरुण मुलींची भेट घ्यावयासाठीं पाठविलेला वकीलच होता !

कुर्निसात करून तो ऐटीनें म्हणाला, "लोकशाहीच्या संरक्षणासाठीं लढणाऱ्या सैन्यातर्फे मी अभिवादन करतों. आम्हीं आज आपल्या गांवांत आलों आहोंत. उद्यांहि आम्हीं असूं अशी आम्हाला आशा वाटते. सध्यांच्या संकटाच्या रुक्ष काळांत आपल्या सुंदर मुखमंडलांच्या दर्शनानं विशेष आनंद होण्यासारखं आहे. आणि या घटकेला पाऊस पडत असल्यामुळें रुक्षता कमी झाली असली तरी आपल्या सौंदर्याची शोभा अधिकच वाढली आहे. आपली हरकत नसेल तर मी माझ्या मित्रांचा परिचय करून देऊं इच्छितों. कारण तेहि आपले नम्र चहाते आहेत. या सभ्य गृहस्थांचं नांव टेक्षे—न्यू जेर्सी प्रांतांत राहाणारे. या दुसऱ्याचं नांव घोडे हे राहणारे टेक्ससचे. आस्मादिकांना लट्ठ म्हणतात. माझं मूळचं गांव सांगण्यापेक्षां माझा स्वभावधर्म आपल्याला कथन करतों. मी सदा कशासाठीं तरी भुकेलेला असतों. आत्तां या क्षणीं मला जर कसली भूक असेल तर आपल्यासारख्या स्वरूपसुंदर तरुण अमेरिकन युवतींच्या सहवासाची. सहवासाचा लाभ आम्हांला मिळेल काय ?"

बेस हळुच म्हणाली, "नाहीं तरी आम्ही सिनेमाला जाणारच होतों."

लठ्ठयांची स्वारी नाटकी हावभाव करून म्हणाली, "ओहो ! सिनेमाला ! बहोत अच्छा ! आम्ही काय आज इथें आहोंत, उद्यां वाऱ्यावर कुठें उडून जाऊं कुणास ठाऊक ! अशा आम्हां सैनिकांना आपल्याबरोबर सिनेमाला जाण्याचं भाग्य लाभेल काय ? आजची रात्र आहे, त्याचप्रमाणें उद्यांचीहि आहे कबूल. परंतु आजची रात्र आमची आहे. उद्यां आम्हाला छावणींत परत गेलं पाहिजे. भयानक परंतु अपरिहार्य अशा युद्धाच्या कामाला जुंपून घेतलं पाहिजे. मानवजातीच्या अंतःकरणाच्या स्वतंत्र सात्विक वृत्तींना जी भयंकर कीड लागलेली आहे तिचा निःपात व्हावा यासाठीं हत्येचं काम आम्ही पत्करलं आहे ते केलं पाहिजे. आपापलीं घरंदारं सोडून आलेले तिघे परदेशी आपल्या पुढें उभे आहेत. त्यांना चार घटका भावासारखें मानाल अशी आशा आहे. आम्हीं आनंदांत आहोंत, खुशींत आहोंत हें सारं झालं, पण आम्ही परदेशी आहोंत अन् आम्हांला एकटं एकटं वाटतं आहे. तुमचा इथाका गांव आमचा नव्हे;

परंतु चार घटका आपल्या संगतींत घालवितां आल्या तर मला व माझ्या सोब त्यांना जरा विरंगुळा वाटेल, व आम्ही घरांदारांपासून दूर परदेशीं फिरत आहोंत या गोष्टीचा विसर पडून आम्हांला प्रिय असलेल्या आपापल्या जन्म-गांवींच आम्हीं आहोंत अशा कल्पनेचं सुख आम्हाला उपभोगतां येईल. म्हटलं तर आम्ही परके, म्हटलं तर भावासारखे आहोंत. कारण वस्तुतः मानव जात म्हणजे एक कुटुंबच. तेव्हां आमच्या नम्र अर्जीचा सहानुभूतीनं विचार व्हावा. हें महायुद्ध नसतं तर आपलं दर्शन आम्हांला कोठून होणार होतं ? आमची साता जन्मांची सुकृतं फळाला आलीं म्हणून आपल्या दर्शनाचा हा अलभ्य लाभ झाला."

येवढं बोलून पुन्हां एकदां कुर्निसात करून तो ताठ उभा राहिला व मग त्यानं विचारलं, "आमची अर्जी मंजूर झाली काय ?"

मेरीनं बेसच्या कानाला लागून हलकेच विचारलं, "याला खूळ लागलं आहे काय ग ?"

बेस म्हणाली, "नाहीं ग ! बिचाऱ्याला अगदीं कंटाळवाणं वाटत असेल, दुसरं काय ! जाऊं या आपण यांच्याबरोबर सिनेमाला !"

"जाऊं या तर जाऊंया ! पण त्यांना काय सांगायचं तें तूंच सांग. मला नाहीं जमायचं !"

बेस त्या सैनिकांकडे वळून म्हणाली, "आम्हीं यायला तयार आहोंत."

"थँक यू थँक यू !" असं आनंदानं उद्गारून लठ्यानं कमरेवर घागर धरल्याप्रमाणें आपला डावा हात वांकवून बेसपुढें केला व तो म्हणाला, "मग जाऊं या तर ?"

बेस म्हणाली, "पण आधीं माझ्या भावाची न्याहारी मला पोंचवायला हवी. तो तार ऑफीसांत कामावर आहे. खोळंबा नाहीं व्हायचा आपला !"

लठ्ठे म्हणाला, "तार ऑफीसांत ? फारच छान ! मी एक तार धाडीन. काय टेक्षा ?" टेक्षानं विचारलं "तार धाडायला किती पैसे लागतात रे."

"किती का लागेनात बेट्या. धाडूं या आपापल्या घरीं तारा."

खिंकाळल्यासारखा स्वर काढून घोडे म्हणाला, " आलबत् ! घरीं माझी आई आहे, बहिण आहे आणखी किटी आहे. किटी म्हणजे जिच्यावर माझं प्रेम आहे ती माझी छोकरी. मला तार धाडायचीच आहे त्या सगळ्यांना."

लझे म्हणाला, "खरं म्हणजे जगांतल्या सगळ्या तरुण पोरींवर माझं प्रेम आहे. परन्तु त्या सगळयांना तारा धाडणं कांहीं शक्य नाहीं. तेंव्हां एकीलाच धाडीन झालं. एका तारेंतच लक्षावधि तारांच काम भागवून घेईन."

बेस व मेरी यांना बरोबर घेऊन ते तिघे सैनिक तार ऑफीसांत पोंचले तेंव्हां ग्रॅगन एकटाच तिथें होता. बेस त्याला म्हणाली, "मी होमरची बहिण, बेस. त्याच्यासाठीं मी फराळाचं घेऊन आलें आहे." तिनं खिडकीच्या बाहेर डबा ठेवला.

ग्रॅगन म्हणाला, "होमरची बहीण काय तूं? कसं काय? होमर आपली फेरी आटपून लवकरच येईल. तो आला कीं मी डबा देईन त्याला, असूं दे."

बेस म्हणाली, 'आणि यांना तारा धाडायच्या आहेत.'

ग्रॅगन म्हणाला, 'ठीक आहे. हे फॉर्म या पेन्सिली.'

लझेनं फॉर्म भरून पुढें केला. त्यांतले शब्द मोजून पहाण्यासाठीं ग्रॅगन वाचूं लागला—

एमा डॅना
शिकागो युनिव्हर्सिटी
शिकागो

लाडके ! माझें तुझ्यावर फार प्रेम आहे ! तुझ्यावांचून मला करमत नाहीं ! सारखी तुझी आठवण होते ! मला लिहित जा. स्वेटर पाठविला त्याबद्दल आभार मानतों. खरोखरीचं जिवंत राज्यशास्त्र मी शिकतों आहे सध्यां. आम्हीं लवकरच आघाडीवर जाऊं. रविवारीं नियमानं चर्चमध्यें जात जा, व आमच्यासाठीं प्रार्थना करीत जा. मी मजेंत आहे. माझं तुझ्यावर फार प्रेम आहे.

नॉर्मन

टेक्षेनं तार लिहिली ती पुढीलप्रमाणें होती—

मिसेस् एडिथ अँथनी,

बिल्मिंग्टन स्ट्रीट,

जेर्सी,

प्रिय आई, तुझं कसं काय आहे ? माझी तब्बेत छान आहे. तुझं पत्र मिळालं. सुक्या अंजिरांचा डबा पाठविलास तोहि मिळाला. तूं माझी बिलकूल काळजी करूं नकोस. अच्छा तुझ्यावर प्रेम करणारा

बर्नार्ड

घोडेनंहि आपल्या आईलाच तार केली होती. त्यानं लिहिलं होतं—

मिसेस हार्वे गिल्फर्ड,

२११ शान्डीफोर्ड रस्ता,

सॅन ॲन्टोनिओ.

हॅलो आई ! कसं काय म्हणायसाठीं ही तार करतों आहे. जिथून ही तार करतों आहे त्या गांवाचं नांव इथाका. हें गांव सदा सूर्यप्रकाशांत न्हात असतं. आत्तां मात्र पाऊस पडतो आहे. हा हा ? सगळ्यांना माझा नमस्कार सांग. ज्योला म्हणावं तुला हवी तर माझी बंदुक अन् काडतुसं वापर. आठवणीनं पत्र धाडीत जा.

क्विन्टिन

तारा धाडण्याचा हा विधि एकदांचा संपला, तेव्हां बेस व मेरी यांना घेऊन तिघे सैनिक तार ऑफिसांतून बाहेर पडले.

ही मंडळी थिएटरांत शिरून रिकाम्या खुर्च्या शोधून बसूं लागलीं तेव्हां बातम्यांचा चित्रपट चालूं झाला होता. बसल्यावर लेटे मेरीला म्हणाला, "तुम्हीं आमच्याबरोबर आलांत याबद्दल तुमचे आभार मानावे तेवढे थोडेच होतील. बरोबर तरुण स्त्रिया असल्या कीं जरा बरं वाटतं. आपल्यासारख्याच धटिंगण सैनिकांच्या बरोबर बसण्यापेक्षां अशी संगत असली कीं जास्त ताजं-तवानं वाटतं. थँक्स थँक्स !"

मेरी म्हणाली, “ थँक्स कसले ? आम्ही नाहीं तरी येणारच होतों सिनेमाला. ”

इतक्यांत पडद्यावर अमेरिकेचं निशाण फडकलं, व तें पहातांच प्रेक्षकांनीं टाळ्या वाजविल्या.

ल्हे बेसला म्हणाला, “ कां कोण जाणे, पण मला वाटतं आपली मायभूमि संकटांत आहे असं समजलं, कीं माणसाला तिच्याविषयीं प्रीतीचा एकदम उमाळा येतो. एरवीं आपली जन्मभूमि म्हणून कांहीं आहे त्याची माणसाला दादहि नसते. तिचं अस्तित्व आपण गृहित धरून चालतों. आपलं घर आहे, कुटुंब आहे, त्याप्रमाणेंच आपला मायदेशहि आहे झालं, अशी आपली कल्पना असते. ”

बेस म्हणाली, “ हें निशाण दिसलं, कीं माझा गळाच दाटून येतो पहा. पूर्वी हें निशाण पाहिलं, कीं मला वॉशिंग्टन, लिंकन अशा थोर पुरुषांची आठवण होत असे. परंतु आतांशा माझा भाऊ मार्कस याची मला आठवण होते. तोहि तुमच्यासारखाच सैनिक आहे. ”

“ हं ? तुझा भाऊ सैन्यांत आहे तर ! ”

“ हो. त्याचं मागचं पत्र आलं तेव्हां तो ‘ नॉर्थ कॅरोलिनां ’त कुठें तरी होता. ”

“ मला वाटतं या निशाणाचा गुणच असा आहे, कीं तें दृष्टीस पडल्याबरोबर ज्याला त्याला जें जें म्हणून प्रिय त्याचं स्मरण व्हावं. हें निशाण मी जेव्हां जेव्हां पहातों तेव्हां तेव्हां एकदम मला माझ्या शिकागो शहराची आठवण होते. तिथल्या सगळ्या चांगल्या गोष्टींची आठवण अन् वाईट गोष्टींचीसुद्धां. ज्या पोरीवर माझं प्रेम आहे ती, आणखी माझ्या घरांतली मंडळी—तीं सारीं चांगलीं आहेत. उलट तिथल्या गरिबांच्या चाळी, तिथलं राजकारण—ही घाण आहे. परन्तु हें सारं ज्यांत आहे तें शिकागो शहर मला आवडतं. मला वाटतं लवकरच असा एक दिवस येईल, कीं गरिबांच्या चाळी आपल्याला दिसणार नाहींत, आणि ही राजकारणाची पीडाहि नष्ट झालेली असेल. ’

बेस त्याला सांगू लागली, " आमच्या इथाका गांवांत घाणेरड्या चाळी नाहींत बरं का ! गरीब माणसं आहेत पण चाळी नाहींत. त्याचप्रमाणें इथें आमच्या गांवाचा कारभार चालतो; परंतु राजकारणाचा बैदा नाहीं. शिवाय आमच्या घरांत राजकारणाच्या विषयाकडे कुणी लक्षहि देत नाहीं. आम्हां सर्वांना संगीताची फार आवड आहे. आमच्या मार्कस्ला 'अॅकॉर्डियन' फार छान वाजवितां येतं. आत्तां या क्षणाला तो जिथें असेल तिथें तो आपलं वाद्य वाजवीत असेल."

बेसचं म्हणणं कांहीं खोटं नव्हतं.

नॉर्थ कॅरोलिनांतील एका छोट्या शहरांतल्या एका मद्यपानगृहांत मार्कस आपलं अॅकॉर्डियन वाजवीत होता. त्याच्याबरोबर त्याचा मित्र 'टोबे' व आणखी तिघे सैनिक होते. त्यांच्याखेरीज आणखी दोघे सैनिक तिथें आले होते ते दोन तरुण मुलींच्याबरोबर नाचत होते. या मुली बेस व मेरीसारख्याच होत्या. 'एक स्वप्न' नांवाचं गीत मार्कस् वाजवीत होता आणि टोबे तें तोंडानं म्हणत होता. गाणं संपल्यावर टोबे मार्कस्जवळ येऊन बसला, व त्याला म्हणाला,

'हं सांग, आणखी सांग.'

आपला इथाका गांव व आपली आई, बहीण, दोघे भाऊ यांच्याविषयीं मार्कस्नं गोष्टी सांगाव्या व टोबेनं त्या अगदीं एकाग्र चित्तानं ऐकाव्या असं त्या दोघां मित्रांचं हितगुज नेहमीं चाले. तें एकदां सुरू झालं कीं गोष्टी सांगणाऱ्याला व त्या ऐकणाऱ्याला दोघांनाहि वेळेचं भान उरत नसे.

आत्ताहि असंच झालं.

# १४

होमर आपली फेरी आटपून येऊन तार ऑफिसपुढें सायकलवरून उतरला तेव्हां पावसांत भिजल्यामुळें त्याचं सर्वांग पाण्यानं निथळत होतं. आंत शिरून तो आधीं टेबलाजवळ गेला व कांहीं तारा येऊन पडल्या आहेत कीं काय तें पाहूं लागला. टेबलावर तारा नव्हत्या. परंतु एक तार त्याचवेळीं येत होती, ती टाईप करण्यांत ग्रॉगन गुंतला होता. ती तार संपली तेव्हां ग्रॉगन यंत्रापुढून उठला व होमरला म्हणाला,

" तुझी बहीण बेस आली होती. तिनं फराळाचा डबा आणून दिला आहे."

" होय ? तरी मी आईला सांगितलं होतं नको म्हणून. दुकानांतून दोन वाफोळे आणणार होतों मी " डबा उघडून पाहून तो म्हणाला, " अरे बापरे आईनं खूपच धाडलंय कीं ! तुम्हीं खातां थोडं माझ्याबरोबर ?"

ग्रॉगन म्हणाला, " थँक यू ! पण मला भूक नाहींरे."

" थोडं घेऊन पहा, म्हणजे भूक आहेसं वाटेल."

" नको नको. थँक यू. तूं अगदीं चिंब भिजला आहेस कीं रे. रेनकोट घालून कां गेला नाहींस ? आपल्याकडे आहेत."

" पावसाची सर येईल अशी कल्पना नव्हती माझी !" तोंडांत घांस घालतां घालतां तो पुढें म्हणाला, " थोडसं खातों आणि मग आतां आलेली तार घेऊन जातो." तो कांहीं वेळ तोंडांतला घांस चघळीत राहिला व मग म्हणाला, " आत्ता आलेली ही तार चांगली आहे कीं वाईट आहे ?"

ग्रॉगन स्तब्ध राहिला. होमरनं ओळखलं कीं ती तार कांहीं चांगली नव्हती. कुठें तरी कुणी तरी मेल्याची बातमी होती त्या तारेंत. त्याच्या तोंडाला एकदम कोरड पडली, घांस घशाखालीं उतरेना, तो एकदम आवेगानं ग्रॉगनला म्हणाला, " या असल्या मरणाच्या बातम्या पोंचविण्याची कामगिरी जिवावर येते माझ्या ! शीः !"

ग्रॅगन हलकेच म्हणाला, " तुझ्या मनाला काय वाटतं तें मी ओळखूं शकतों." मग तो क्षणभर अगदींच स्तब्ध राहिला. होमर हातांतला घांस तोंडांत न घालतां तसाच त्याच्याकडे बघत राहिला. एक उसासा टाकून ग्रॅगन पुढें म्हणाला, " जाऊं दे तें. तूं आपला फराळ कर, तुझ्या बहिणी-बरोबर दुसरी एक मुलगी आली होती. फार देखणी होती ती."

होमर म्हणाला, " हां हां, ती मेरी असली पाहिजे. माझा भाऊ मार्कस् सैन्यांत गेला आहे ना, त्याच्याशीं तिचं लग्न व्हायचं आहे ही लढाई आटपल्यावर."

" त्या दोघींच्या बरोबर तिघे सैनिक होते. त्या तिघांनीं तारा धाडल्या."

" होय ? कुठें आहेत त्या तारा ?"

ग्रॅगननं खुणेनं दाखविलं तेव्हां होमरनं उठून हुकांत अडकविलेल्या त्या तारा काढल्या. त्या तिन्ही तारा वाचल्यावर त्यानं ग्रॅगनकडे एकदम पाहून विचारलं, " आपल्या ओळखीचा म्हणा किंवा ज्याचं नांव गांवसुद्धां आपण कधीं ऐकलेलं नाहीं असा एखादा माणूस म्हणा आपल्या घरादारापासून दूर कुठें तरी अकस्मात् मृत्युमुखीं पडतो याचा अर्थ काय ? या हत्येंत कुणाचं कोणतं हित आहे ? आपलं इथाका गांव म्हणजे अमेरिकेंतलं एक लहानसं गांव झालं. मरणाच्या बातम्या इथें आपल्या गांवीं येतात त्याप्रमाणेंच इतर हजारों गांवीं जात असतील. श्रीमंतांना जात असतील गरीबांना जात असतील. हजारों कुटुंबांतले हजारों तरुण मरताहेत. कशासाठीं मरताहेत ते ? उगीचच्या उगीच ही हत्या चालावी ?"

ग्रॅगन कांहीं वेळ न बोलतां स्वस्थ राहिला. मग बोलण्यासाठीं म्हणून त्यानं हालचाल केली, परंतु त्याला जें बोलायचं होतं तें सहजासहजीं जमण्या-सारखं नव्हतं म्हणूनच कीं काय त्यानं आधीं टेबलाच्या खणांतली एक मोठी बाटली काढली, तिच्यांतला एक चांगला मोठा घोट घशाखालीं घातला, आणि नंतर व्यवस्थित बसून होमरकडे पहात तो बोलूं लागला. " हें बघ बेटा, या जगांत मी पुष्कळच उन्हाळे पावसाळे काढले आहेत. कदाचित् माझे दिवस

केव्हांच भरले असून मी उगीच रेंगाळतों आहे असंहि म्हणतां येईल. परंतु एक गोष्ट मी शिकलों ती तुला सांगतों. काळ लढाईचा असो अगर शांततेचा असो, या जगांत जें जें घडतं त्याला कांहीं तरी अर्थ असतो. उगीचच्या उगीच कोणतीहि गोष्ट घडत नाहीं" त्यानं बाटलींतला आणखीं एक घोट घेतला. "तूं किंवा मी म्हणजे एक व्यक्ति आहोंत. परंतु त्या प्रमाणेंच साऱ्या माणसांचं मिळून एक जीवित आहे. तुझ्या अंगीं ज्याप्रमाणें सत्प्रवृत्ती आहेत. व पापवासनाहि आहेत तशाच त्या इतर सर्व माणसांतहि आहेत. सर्व राष्ट्रांतल्या सर्व माणसांत सत्त्व, रज, तम या तीन गोष्टी मिसळल्या आहेत. आपलं राष्ट्र देखील याला अपवाद नाहीं. एका व्यक्तीच्या ठिकाणीं विवेकबुद्धिची आणि तमोविकारांची झटापट चाललेली असते, त्याप्रमाणेंच एकंदर मानव समाजाच्या ठिकाणीं ती वारंवार होत असते. ती सुरूं झाली, कीं आपण म्हणतों महायुद्ध सुरूं झालं. शरीरांत रोगजंतू निर्माण झाले कीं त्यांच्याशीं झगडणं शरीराला भाग असतं. महायुद्ध म्हणजे त्यांतलाच प्रकार होय. तें पाहून आपण चिंताग्रस्त होण्याचं कांहीं कारण नाहीं. कारण सत्त्वगुणाचा कधीं नाश होणं शक्य नाहीं, आणि तमोगुण जेव्हां जेव्हां बळावेल तेव्हां तेव्हां त्याचा अखेर नायनाट होत असतो. शरीराची अगर आत्म्याची प्रकृति नादुरुस्त झाली तरी ती पुन्हां दुरुस्त होतेच होते. ती वारंवार बिघडेल, परंतु दरवेळीं शरीराचं व आत्म्याचं सामर्थ्य वाढतच जाईल. आणि मानवजाति शरीरानं व मनानं अखेर इतकी निर्मळ, सात्त्विक आणि उदात्त होईल कीं पुन्हां म्हणून कोणतीहि विकृति उद्भवणार नाहीं. हें ध्येय गांठण्यासाठींच सारीं माणसं झटत आहेत. कुणाचे मार्ग बरोबर असतील, कुणाचे चुकीचे असतील, पण जो तो आपापल्या मार्गानं या ध्येयाकडे चाललेला आहे. चोर आणि मारेकरीसुद्धां! कोणतीच गोष्ट व्यर्थ घडत नाहीं. कुणी कशाहि प्रकारें मरो, मरणाला अर्थ आहे. कारण सगळ्यांच्या मरणांतूनच मनुष्याचं अमरत्व सिद्ध व्हायचं आहे. सत्य व न्याय यांची प्राप्ति माणसाला व्हायची आहे. आपण सर्व आपापल्या घरीं पोंचणार आहों. आपल्याला मोक्ष मिळणार आहे. जगांतल्या तमोगुणाचा अजिबात निःपात होणार आहे, आणि हें जग सज्जनांचं निवासस्थान होणार आहे..."

ग्रॅगननं फारच मोठा उसासा टाकला. तो एकदम गप्प झाला. त्यानं झटकन् कागदाच्या चिठोऱ्यावर कांहीं तरी खरडलं, व ती चिठ्ठी होमरच्या हातीं देत तो घाईनं म्हणाला "माझं एक काम करशील का ? झटकन् धांव, आणखी औषधी दुकानांतून या गोळ्या घेऊन ये."

"जातों" असं म्हणून होमरनं धूम ठोकली.

ग्रॅगन क्षणभर एकटाच उभा राहिला. त्यानं सभोंवार दृष्टि टाकली. त्या नजरेंत जगाबद्दलच्या प्रेमाचं मार्दव होतं, परंतु थोडासा त्वेषहि होता. ग्रॅगननं छातीपाशीं आपला कोट चुरमडून घट्ट धरला. जणूं हृदयविकाराचा हा झटका आतां त्याच्या संवयीचा झाला होता व त्याची तो वाट पहातच होता. जरा मागं होऊन तो खुर्चीत बसला, आणि त्या भयंकर झटक्याचा आवेग ओसरेपर्यंत त्यानं आपली सर्व सहनशक्ति एकवटण्यासाठीं अंग अगदीं ताठ केलं.

होमर धांवत परत आला, व गोळ्यांची डबी त्यानं पुढें केली.

ग्रॅगन म्हणाला, "पाणी !"

होमरनं झटकन् पाणी आणून त्याच्या पुढें धरलं.

ग्रॅगननं पेटींतल्या तीन गोळ्या काढल्या, तोंडांत टाकल्या व पाण्याच्या मोठ्या घोंटाबरोबर गिळून टाकल्या. सारं झाल्यावर तो होमरला म्हणाला, "थँक यू. बेटा, थँक यू !"

होमर कांहीं वेळ त्या वृद्धाकडे पहात राहिला. आतां भ्यायचं कांहीं कारण नाहीं अशी खात्री पटल्यावर तो टेबलापाशीं गेला आणि मघांशीं जी तार ग्रॅगननं लिफाफ्यांत घालून ठेवली होती ती त्यानं उचलून घेतली. तें पाकिट तसंच हातांत धरून तो क्षणभर वेड्यासारखा उभा राहिला. मग त्यानं तें उघडलं, आंतला कागद काढून वाचला, तो पुन्हां नव्या पाकिटांत घालून तें बंद केलं, आणि मग तो एकदम झटकन् वळला व ऑफिसच्या बाहेर पडला. बाहेर पाऊस जोरांत सुरू होता. म्हतारा ग्रॅगन उठला आणि ऑफिसच्या दारालगतच्या फरसबंद वाटेवर उभा राहिला. त्यानं पाहिलं; तो होमर पावसापाण्यांतून जोरजोरानं सायकल मारीत होता. आंत तारायंत्राचं कडकट्ट

चालू झालं पण प्रॅगनला तें ऐकूं आलं नाहीं, टेलीफोनहि वाजला परंतु प्रॅगनला तोहि ऐकूं आला नाहीं. तो खुळ्यासारखा रस्त्याकडे पहात राहिला !

# १५

एका खूप मोठ्या प्रशस्त जुन्या घरापुढें होमरनं सायकल उभी केली. आंतून संगीताचे स्वर आणि हंसण्याचा आवाज ऐकूं आला, त्यावरून त्यानं ओळखलं कीं आंत पार्टीसाठीं मंडळी जमली असावींत. एका खिडकीला डोकं टेकून त्यानं आंत नजर टाकली, तेव्हां चार पांच तरुण जोडपीं नृत्य करीत असतांना त्याला दिसलीं. आंतलीं सारीं माणसं आनदांत मग्न होतीं खास. होमरला एकदम शिसारी आली व भेदरल्यासारखं झालं. तो पायऱ्या चढून दारापाशीं गेला पण आंतलं संगीत ऐकत क्षणभर जागच्या जागीं उभा राहिला. त्यानं आपला हात दाराच्या घंटेकडे हळूच नेला परंतु पुन्हां खालीं केला.

तो स्वतःशीं म्हणाला, "परत तार ऑफिसाकडे धूम ठोकूं या, अन् सांगू या मला सोडा म्हणून. असली नोकरी करायची नाहीं मला."

परंतु धूम ठोकण्याऐवजीं तो तिथेंच पायरीवर बसला, पुष्कळ वेळानं तो उठला, पुन्हां दारापाशीं गेला, व या खेपेस मात्र त्यानं घंटेवर आपलं बोट दाबलं. दार उघडलं गेलं. त्यानं नजर वर केली तो एक तरुण स्त्री त्याच्या-पुढें उभी होती. आपण काय करतों हें त्याच्या स्वतःच्याच लक्षांत येण्या-पूर्वींच त्यानं तोंड फिरविलं, व पायऱ्या उतरून आपली सायकल गांठली. ती तरुण स्त्री बाहेरच्या आगाशींत आली आणि ओरडली "ए छोकरा ? हें रे काय?'

होमरनं सायकल ठेवली, हलकेच पायऱ्या चढून तो वर आला, व म्हणाला, "माफ करा, मिसेस् क्लॉडीया यांची एक तार आणली आहे मी."

ती तरुण स्त्री आनंदानं म्हणाली, " आमच्या आईचा वाढदिवस आहे आज." ती वळली आणि आंतल्या हॉलमध्यें पाऊल टाकून हांका मारूं लागली, " आई ! आई ! तुझी तार आली आहे बघ ! "

तिची आई दाराशीं येऊन म्हणाली, " ॲलनची असणार तार, शंकाच नको ! "

होमरकडे वळून तिनं म्हटलं, " ये, बाळ. आंत ये. आज माझा वाढदिवस आहे. तुला थोडी केक देतें ती खा. "

" नको नको हो, मला परत कामावर गेलं पाहिजे ! " असं म्हणत होमरनं तारेचा लिफाफा पुढें केला. तिनं तो हातीं घेतला. तो त्यांत अभिनंदनाचा मजकूर असणार अशी तिची खात्री असल्याप्रमाणें.

ती हंसत हंसत होमरला म्हणाली, " काम नाहीं अन् कांहीं नाहीं. मी नाहीं ऐकणार. आधीं तुला आंत आलंच पाहिजे, केक खाल्ली पाहिजे. थोडंसं मद्य देतें तें घेतलंच पाहिजे. " तिनं त्याचा हात धरला आणि त्याला ओढून आंत नेऊन एका टेबलापाशीं उभं केलं. त्या टेबलावर फराळाचे जिन्नस मांडलेले होते, व ' पंच ' नांवाचं मद्य ठेवलेलं होतं. संगीत चालू होतं. जोडपीं नाचत होतीं. ती स्त्री होमरला म्हणाली, " बाळ, आज माझा वाढदिवस आहे. माझ्यासारख्या म्हातारीचा वाढदिवस म्हणून हंसूं येईल." ती स्वतःच हंसली. " पण आहे खरा. आणि तूं माझं अभिनंदन केलं पाहिजेस." तिनं ' पंच ' चा एक पेला भरला व तो होमरपुढें धरला.

" अहो पण माझं ऐका—" " अहो पण—" होमर सांगूं लागला. परंतु त्याच्या तोंडांतून धड शब्दच फुटेना. त्यानं मद्याचा पेला टेबलावर टाकला आणि दाराकडे धांव घेतली. मागून कोणीतरी आपल्याला बोलावील या भीतीनं तो पावसाला न जुमानतां सायकल जोरजोरानं मारूं लागला.

इकडे त्या वृद्ध स्त्रीनं आजूबाजूला नजर टाकली व जिथें आपण कुणाच्याहि दृष्टीस पडणार नाहीं अशा जागीं ती हळूंच गेली. तिची लेक मात्र तिच्याकडे सारखी पहात होती, ज्या जागीं ती वृद्ध स्त्री उभी राहिली तिथें वरच्या बाजूस भिंतीवर एका देखण्या तरुण मुलाचा फोटोग्राफ होता. फोटोवर हातानं

लिहिलेलं होतं, "ॲलन यांजकडून बाराव्या वाढदिवसाची आईला भेट" तारेचा लिफाफा उघडून आंतला मजकूर वाचल्यावर ती स्त्री कुणाला ऐकूं न जाईल अशा बेतानं पण अगदीं ओक्साबोक्शी रडूं लागली. फोनोग्राफवरचं गाणं चालूच होतं. जोडपीं आनंदानं नाचत होतीं. लेकीनं आईकडे बघितलं. मग एखाद्या वेड्यापिशा माणसाप्रमाणें ती फोनोग्राफकडे धांवली व तिनं तो बंद करून टाकला !

आणि "आई !" अशी किंकाळी फोडून तिनं त्या वृद्ध स्त्रीकडे धांव घेतली !

# १६

सिनेमा संपला. प्रेक्षक बाहेर पडूं लागले. रस्त्यांत पोचल्यावर बेस लढ्ढेला म्हणाली, "आतां आम्हाला घरीं गेलं पाहिजे."

लढ्ढे म्हणाला, "होय, थँक यू." आतां त्यांनीं वास्तविक एकमेकांचा निरोप घेऊन जायला हवं होतं. परंतु ते तिघे सैनिक रस्त्यांत उभे राहिले ते राहिलेच. तें पुढें पाऊल टाकीनात. जणूं कांहीं तरी अद्भुत आतां घडणार होतं. व त्याची ते वाट पहात होते. लढ्ढेनं एकदां बेसकडे व एकदां मेरीकडे पाहिलं, आणि मग त्यानं एकदम अगदीं मुग्धपणानं व सहज घेतल्याप्रमाणें त्या दोघींचं चुंबन घेतलं.

ते पहातांच घोडे म्हणाला, "आम्हाला कांहीं नाहींच कां ? मी आणि टेक्षे—आमच्या दोघांकडे बघा कीं जरा. आम्ही देखील सैन्यांत कोणीतरी आहोंत म्हटलं. आम्हीं देखील सैन्यांत आहोंत !" तें त्यांचं बोलणं ऐकून बेस व मेरी हंसल्या. घोडेनं त्या दोघींचं चुंबन घेतलं. आणि मग टेक्षेनंहि. जरा अंतरावर उभी राहिलेली एक बाई हें सारं पहात होती, तिनं तोंडावर

तीव्र नापसंति दाखविली. बेस व मेरी झटकन् वळल्या व घराकडे निघाल्या घोडेनं हर्षभरानं उडी मारल्यासारखं केलं व टेक्षेला जोराचा धक्का दिला. टेक्षेनं तोंड वळविलं आणि लठ्ठेला ढकलून दिलं.

घोडे खिंकाळला, "वा ऽ ऽ हू ऽ ऽ! ए टेक्ष्या ! ए लठ्ठ्या !" टेक्षे ओरडला, "आमच्या लठ्ठ्या बोलण्यांत मोठा पटाईत रे! लठ्ठ्या बोलण्यांत मोठा फाकडा रे ! शिकागोचा नामदार आमचा लठ्ठ्या !"

लठ्ठ्यानं हंसण्याचा खद्‌खद् आवाज केला. ते तिघे एकमेकाला ढकलत, हंसत, खिदळत रस्त्यानं जाऊं लागले.

लठ्ठे ओरडला, " काय सांगूं! मला कॉंग्रेसमध्यें निवडून द्यारे ! म्हणजे बघा कसा फडाफड बोलतों तें !"

घोडे खिंकाळला, "हो हो हो हो ! बघे लोक ! आगे कदम !" त्यानं एक गाणं म्हणावयास सुरवात केली. त्या तिघांनीं मग बेडूकउडीचा खेळ सुरू केला. एकानं वाकावं, दुसऱ्यानं त्याच्यावरून उडी मारावी. तिसऱ्यानं दोघांवरूनहि उड्या माराव्या, असं करीत ते जाऊं लागले. अंधाऱ्या व कधीं न संपणाऱ्या अशा वाटेनं ते रणांगणाकडे निघाले होते.

# १७

मनांतल्या मनांत अगदीं दुःखीकष्टी झालेला होमर तार ऑफिसांत परत आला तेव्हां पाऊस थांबला होता, चंद्र स्वच्छ दिसत होता, आणि पांढऱ्या ढगांचे लहान लहान तुकडे आकाशांतून वाऱ्यावर मोकळे सुटल्याप्रमाणें तरंगत चालले होते.

ग्रोगननं होमरला विचारलं, " बेटा, तुझ्या पायाला काय झालं आहे ? आज दिवसभर तूं लंगडतो आहेस. काय झालं आहे ?"

" कांहीं नाहीं ! आणखी तारा पोंचवायच्या आहेत ?"

" नाहीं ! आतां तुला खुशाल घरीं जाऊन निजतां येईल. पण मला सांग तुझ्या पायाला काय झालं आहे ? "

" एखादी शीर दुखावली कीं हाड दुखावलं कुणास ठाऊक ! " त्यानं आपल्या पायाला हिसका देऊन पाहिला, व " आज आमच्या शाळेंत शर्यत होती " असा आरंभ करून इत्थंभूत सारी हकिकत सांगावयास प्रारंभ केला. आपल्याला हेलन किती आवडते, ती आपल्याकडे विशेष लक्ष देत नाहीं म्हणून आपल्याला चीड कशी येते, ह्यूबर्ट केवळ श्रीमंताचा मुलगा म्हणून मोठी मिजास करतो या कारणानं त्याचा पाणउतारा करण्यासाठीं आपण कसे टपलेले असतों, इत्यादि सर्व गोष्टी सांगून त्यानं अखेर शर्यतीचें वर्णन केलं. मग तो म्हणाला, " आपले स्पँग्लरसाहेब मोठ्या खुल्या शर्यतींत चँपियन आले होते, नाहीं ? मलासुद्धां चँपियन व्हायचं आहे. परंतु या वर्षी ते ज़मेलसं दिसत नाहीं. " त्यानं आपला पाय पुन्हां दोन वेळां झाडला, व मग तो म्हणाला, " रात्रीं चोळून घेतला पाहिजे पाय. लोकांच्या लक्षांत यावं इतका लंगडतो आहे का हो मी ? "

ग्रॅागन म्हणाला, " फारसं लक्षांत येण्यासारखं नाहीं. पण थोडंसं आहे. सायकलवर बसतांना त्रास नाहीं होत तुला ? "

" होतो तर. पॅडल मारायसाठीं डावा पाय उचलला, कीं चांगलीच शिणीक येते. पण मी काय करतों माहीत आहे ? शक्यतों उजव्या पायानेंच पॅडल मारतो. मध्येंच डावा पाय पॅडलवरून काढून नुसता लोंबत ठेवतों असं केलं कीं त्याला विश्रांति मिळते. मला वाटतं शीर दुखावली आहे. चोळून घ्यायला पाहिजे. "

ग्रॅागन क्षणभर कांहीं न बोलतां त्याच्याकडे पहात राहिला. मग तो म्हणाला, " इथें काम करूं लागल्यापासून तूं थोडासा बदलला आहेस नाहीं ? "

" तुम्हाला असं वाटतं ? हो, मी बदललों आहे खास. माझी वाढ झाली आहे. मला वाटतं ती व्हायला हवीच होती. या कामावर येण्यापूर्वी मला कांहीं कळत नव्हतं. म्हणजे पुष्कळ गोष्टींचं ज्ञान होतं मला; पण जगाची ओळख नव्हती. आमच्या शाळेंत माझ्याइतका हुशार मुलगा दुसरा कोणी

नाहीं. ज्यानां मी आवडत नाहीं ते सुद्धां असं म्हणतात. परंतु खरं म्हणजे मी तितकासा हुशार नाहीं. किती तरी गोष्टी मला अजून समजत नाहींत, मी मागासलेला आहे. मात्र जें समजत नाहीं तें समजून घेण्याची माझी इच्छा आहे, आणि त्यासाठीं मी सतत धडपड करणार आहे. परंतु जगांत जें जें घडतं त्याचा नीट अर्थ कळण्याइतकं शहाणपण अंगीं कसं आणावं कुणास ठाऊक ? तुम्हीं तरी सांगा मला. कसं आणावं ?"

ग्रॅगन म्हणाला, " तें कांहीं मला सांगतां येणार नाहीं. परंतु तूं मनापासून प्रयत्न करणार आहेस ही आनंदाची गोष्ट आहे.

" प्रयत्न केलाच पाहिजे मला. कारण इतरांची गोष्ट मला माहीत नाहीं, आणि माझं स्वतःपुरतं मला काय वाटतं तें सुद्धां तुम्हाला स्पष्ट करून मला सांगतां येईल किंवा नाहीं कुणास ठाऊक. परंतु माझ्या मनांत नेहमीं येतं, कीं लोकांना जसा मी दिसतों तसा नाहीं त्यापेक्षां किती तरी अधिक चांगला असा कुणी तरी निराळाच मी आहे. माझ्या मनांत हजार तऱ्हेच्या कल्पना येतात व त्या सर्वांची मिळून संगति कशी लावायची हें मात्र मला कळत नाहीं." होमर थकलेला होता, त्याचा पाय शिणकत होता, आणि आनंदानं भरलेल्या एका घरांत मृत्यूची बातमी देऊन तो आला होता त्यामुळें त्याची वृत्ति एकदम भलतीच गंभीर झाली होती कीं काय कोण जाणे. " मला वारंवार वाटतं, कीं हें आपलं जग अधिक चांगलं झालं पाहिजे, लोक अधिक चांगले झाले पाहिजेत, लोकांच्या रीतिभाती व वागण्याच्या तऱ्हा अधिक सुखाच्या झाल्या पाहिजेत. हें सारं कसं होणार आहे तें मला कळत नाहीं. परंतु झालं पाहिजे असं वाटतं, आणि तें व्हावं यासाठीं मला कांहीं तरी करतां येण्यासारखं असलं पाहिजे असंहि वाटतं. तुमच्याजवळ म्हणूनच मी बोलतों. इतर कुणाशीं असं बोलायची लाज वाटेल मला. परंतु माझी आपली एक भावना आहे, कीं माझ्या हातून चांगलं अन् उपयुक्त असं कांहीं तरी घडणार आहे. काय तें मला सांगता येणार नाहीं, पण घडणार आहे खास. आजपर्यंत मला जगाची ओळख नव्हती. एखादं माणूस स्वप्नांत रमलेलं असावं तसा होतों मी. माझ्या कुटुंबांतलीं सारीं माणसं आनंदांत असलेलीं मला दिसत होतीं. त्यामुळें

मी देखील आनदांत असे, आणि जगाची खरी कल्पना यावी अशी गरजच मला कधीं वाटत नसे. परंतु आतां मात्र मला कळूं लागलं आहे. अगदीं थोडं थोडं कां होईना, परंतु रोजच्या रोज माझ्या लक्षांत एकेक गोष्टी येऊं लागल्या आहेत. ''

होमर किंचित् थांबला. बोलतां बोलतां तो आपला पाय चोळीत राहिला होता. त्या चोळण्यानं पाय थोडासा सुधारला कीं नाहीं हें पाहण्यासाठीं त्यानं पाय झटकून पाहिला. छे! पूर्वीसारखीच शिणीक येत होती! तो पुढें बोलूं लागला, " ग्रॅागन, भोंवतीं जिकडे तिकडे जें चाललं आहे तें फार खराब आहे असं मला वाटतं. असं असून भागयचं नाहीं. जगाची विस्कटलेली घडी नीट बसायलाच हवी. ती कशी बसणार देव जाणे. परंतु आजूबाजूस जें घडतं आहे तें आपण नीट समजून घेतलं पाहिजे एवढं मला कळूं लागलं आहे, हें कळूं लागलं हें एका दृष्टींनं वाईट. कारण त्यामुळें मन खिन्न होतं. एकटं एकटं वाटूं लागतं. माझ्या घरातलीं सारीं माणसं हंसतमुख आहेत. परंतु दुःख कसं सोसावं हें देखील आम्हांला कळतं. म्हणून माझ्या स्वतःच्या दुःखाचं मला एवढं कांहीं नाहीं वाटत. परंतु ज्यांना दुःख सोसण्याचा धीर नाहीं परंतु ज्यांच्या-वर संकट कोसळलं आहे अशीं जीं हजारों माणसं या जगांत आहेत त्यांचं काय? त्यांच्यासाठीं कांहीं करायला नको काय, असा प्रश्न मनांत बारंवार उभा रहातो. माझं हेलनवर फार प्रेम आहे. हें मी तुम्हांला सांगितलेलं आठवतं कां? परंतु माझ्या या बदलेल्या मनःस्थितींत हेलनबद्दलचीसुद्धां माझी पहिली भावना राहिलेली नाहीं. तिला मी आवडावा अशी माझी इच्छा आहे. परंतु जर आवडत नसेन तर न आवडेना. माझं तिच्यावर अगदीं अंतःकरणा-पासून प्रेम आहे. परंतु तिला जर माझ्यापेक्षां ह्यूबर्टच अधिक चांगला वाटत असेल तर वाटो बिचारा?...''

होमरनं पुन्हां एकदां आपल्या पायाची हालचाल करून पाहिली, आणि मग जणूं तो पाय त्याचा नव्हताच तर दुसऱ्या कुणाचा तरी होता अशा अभि-प्रायानं तो उद्गारला, " कांहीं तरी झालंय् याला. " मग ग्रॅागनकडे वळून तो म्हणाला, " हं, ठीक आहे! बारा वाजून गेले. जातों घरीं. झोंप आली

नाहीं अजून. पण जाऊं या. उद्यां शनिवार, नाहीं का? पूर्वी शनिवार म्हणजे आठवड्यांतला सगळ्यांत गमतीचा दिवस वाटत असे मला. पण आतां तसं नाहीं. हें काम पत्करलं आहे ना!" त्यानं फराळाचा डबा पुढें ओढला व विचारलं, "आतां तरी खातां का थोडसं?"

"हं, खाऊं या. आतां लागली आहे जराशी भूक." ग्रॅगननं डब्यांतला घांस घेतला व तोंडांत घातला. "मी फार आभार मानले आहेत असं तुझ्या आईला सांग हं!"

"छे छे! यांत आभार मानण्यासारखं काय आहे?"

"फार आहे! तुझ्या आईला सांग—"

"बरं बरं!"

कांहीं वेळानं होमर तार ऑफिसांतून बाहेर पडला.

## १८

ग्रॅगन ऑफिसांत एकटाच राहिला होता. तो एकेकाळीं तरुण होता व जगांतील सर्वांत जलद तार मास्तर म्हणून एके काळीं त्याची कीर्ति होती. पण आतां तो म्हातारा झाला होता, थकला होता, टेबलावरचे कागद नीट आवरून ठेवायला देखील त्याला किती वेळ लागत होता. तें करतांना अगदीं लहानपणापासून त्याच्या आठवणींत खोल कुठें तरी राहिलेलं एक गाणं तो गुणगुणत होता. टॉमस स्पॅंग्लर ऑफिसांत आला, व आपल्या टेबलापाशीं गेला. स्वारी कॉर्बेटच्या हॉटेलमध्यें जाऊन आली होती त्यामुळें थोडीशी मद्याच्या धुंदींत होती, आणि शिवाय कसल्या तरी अवर्णनीय सुखाच्या नशेंत असल्यासारखी दिसत होती. त्यानं ग्रॅगनकडे फक्त नजर टाकली परंतु तो कांहीं एक बोलला नाहीं. त्या दोघांना एकमेकांचीं मनं पूर्ण

समजलीं होतीं. कितीदां तरी एकमेकांशीं एक अक्षर देखील न बोलतां ते आपापल्या कामांत गढलेले असत. तारांच्या एका जुडग्यावर ठेवलेलं शकुनाचं अंडं स्पॅंग्लरनं उचलून हातांत धरलं, व त्याकडे तो क्षणभर निरखून पहात राहिला. त्या वस्तूची कमालीची प्रमाणबद्धता त्याला एखाद्या अद्‌भुत चमत्कारासारखी वाटली. जरा वेळानं त्यानं अंडं परत ठेवलं, त्याला एकदम ज्यानाची आठवण झाली. तो स्वतःशींच हंसला, व लाडांत बोलतांना ती जसे ओठ जुळवित असे तसे जुळवून तिची नक्कल करून तो म्हणाला,

"माझ्यावर तुमचं प्रेम आहे. आहे ना ? हो हो, आहेच मुळीं!"

ग्रॉगननं मान वर करून विचारलं, "हें काय ?"

स्पॅंग्लर म्हणाला, "काय रे विली, एखादी मुलगी 'माझ्यावर तुमचं प्रेम आहे. आहे ना ? हो हो, आहेच मुळीं !' असं लाडीकपणानें वरचेवर म्हणूं लागली तर तुला काय वाटेल ?"

"काय, सांगतां येत नाहीं बुवा !"

"तुला ती आवडेल कीं नाहीं सांग रे ?" असं विचारून स्पॅंग्लरनं ओठ जुळविले व नक्कल केली. "तुमचं प्रेम आहे ना ? हो हो, आहेच मुळीं !" मग जणूं आपल्यावर चढलेली सुखाची धुंदी दूर करण्यासाठीं त्यानं आपलं तोंड दोन्हीं हातांनीं खसाखसा चोळलं, आणि विचारलं, "हं, काय विली, कांहीं विशेष ?"

"कांऽहीं नाहीं. फक्त पाऊस पडला येवढंच !"

"आपला नवा छोकरा कसा आहे ? ठीक आहे ?"

"ठीक म्हणजे काय, इतका हुशार पोरगा मी दुसरा पहिलाच नाहीं."

"तो प्रथम आला अन् कामावर रहातों म्हणाला त्या क्षणींच मला तो फार आवडला." तितक्यांत त्याला पुन्हां ज्यानाची आठवण झाली. चटकन् ओंठ जुळवून 'तुमचं प्रेम आहे ना ? हो हो, आहेच मुळीं ! हे तिचे लाडके शब्द त्यांनं उच्चारून घेतले. मग तो स्पॅंग्लरशीं बोलूं लागला, "तुला तो छोकरा आवडला हें फार छान झालं. विली, हें बघ, ऑफिस बंद करण्याच्या भानगडींत तूं पडूं नकोस. मी करीन तें. मला आणखी थोडा वेळ काम करीत

बसलं पाहिजे. त्या छोकऱ्याचं नांव मोठं रुबाबदार आहे नाहीं ? होमर मकॉले ! त्याच्या बापानं टॉमस, विल्यम, हेन्री असं एखादं नांव ठेवण्याऐवजीं होमर हें नांव कां ठेवलं असावं ? अं ? " पण ग्रॅागनच्या उत्तराची वाट पहाण्याऐवजीं स्पॅंग्लरनं ओठ जुळविले व ज्यानाचा आवाज काढून म्हटलं, " हो हो, आहेच मुळीं ! "

ग्रॉगन म्हणाला, " त्याच्या धाकट्या भावाचंहि नांव मोठं गंमतीदार आहे. युलिसेस ! बहिणीचं मात्र साधं आहे. बेस ! "

" होमर, युलिसेस आणि बेस. "

" होमरच्या थोरल्या भावाचं नांव आहे मार्कस तो सैन्यांत आहे. "

" मार्कस, होमर, युलिसेस आणि बेस. छान ! पण विली, तूं आतां घरीं कां जात नाहींस ? "

" घरीं ? हुं: ! " ग्रॉगन हसला. " मला इथेंच बसावंसं वाटतं ! जिथें जावंसं वाटावं असं मला ठिकाण नाहीं, आणि काम संपल्यावर निजण्याशिवाय उद्योग नाहीं. निजावंसं तर मला वाटत नाहीं. "

एखाद्या लहान मुलाची समजूत काढण्यासाठीं बोलावं त्याप्रमाणें स्पॅंग्लर म्हणाला, " हें बघ, विली, तूं सदा चिंता करावीस हें मला आवडत नाहीं. तूं काळजींत असतोस मला माहीत आहे. परंतु काळजीचं कारण नाहीं. आपण म्हातारे झालों व आपल्याला पेन्शनींत निघावं लागणार ही कल्पना नेहमीं मनांत कां ठेवतोस तूं ? तुझ्यावांचून या ऑफिसांतलं पानसुद्धां हलणार नाहीं हें माहीत आहे तुला. अगदीं शंभर वर्षांचा झालास तरी तुला कुणी 'जा' म्हणणार नाहीं. तूं आणखी तुझं काम यांत कधीं अंतर पडणार नाहीं. "

" Thanks " ग्रॉगन क्षणभर थांबला व मग हलकेच म्हणाला, " माझ्या छातींत फार मोठी कळ आली. विशेष घाबरण्यासारखी नाहीं. पण आली खरी. येणार येणार असं मला वाटतच होतं. होमर इथें होता त्याच्याकडून मी औषधाच्या गोळ्या आणावल्या. खरं म्हणजे त्या घ्यायची मला परवानगी नाहीं. डॉक्टरकडे जायला पाहिजे आणि विश्रांति घेतली पाहिजे. डॉक्टरानं मला वारंवार बजावलं आहे कीं बाबा तूं पूर्ण विश्रांति घे. "

स्पँग्लर म्हणाला, " विली, हे सारे डॉक्टर महामूर्ख आहेत. त्यांना फक्त वरची शरीराची व्याधि कळते. मन कळत नाहीं. अन् तुझ्यामाझ्यासारखीं माणसं असतात तीं शरीरानं जगत नाहींत मनानं जगतात. " मग मधेंच त्यानं त्याच्या मनांत अजूनहि घोळणारे ज्यानाचे गोड शब्द उच्चारले. " माझ्यावर तुमचं प्रेम आहे. आहे ना ? हो हो, आहेच मुळीं !" आणि नंतर त्यानं म्हटलं, "या डॉक्टर लोकांना जड शरीरधर्माखेरीज कांहीं कळत नाहीं. तुला थोडी विश्रांति पाहिजे हें मात्र खरं."

"विश्रांति ! आतां कायमचीच विश्रांति घेईन."

"हां हां असलं बोलायचं नाहीं ! विली, कोपऱ्यावरच्या कॉर्बेटच्या विश्रांतिगृहांत जा आणखी थोडंसं मद्य घे, गाणं ऐक, आणि परत ये. मग आपण जुन्या आठवणी काढून बोलत बसूं. ऊठ, जा पाहूं."

ग्रॅगन म्हणाला, " मला मद्य घ्यायची परवानगी नाहीं."

"तुला परवानगी नाहीं हें मला सांगतोस होय ? अरे तें मला माहीत आहे. पण तुला मद्य घ्यावसं वाटतं हेंहि मला माहीत आहे ना ? मनुष्याला काय करायची परवानगी आहे या गोष्टीपेक्षां त्याला काय करणं आवडतं, याचं कधीं कधीं अधिक महत्व असतं. तेव्हां ऊठ आणि जा. थोडं मद्य घेऊन ये."

"बरं जातों !" असं म्हणून ग्रॅगन उठला आणि ऑफिसांतून बाहेर पडला.

त्या दोघांचा हा संवाद चाललेला असतांना एक पोरसवदा तरुण ऑफिसपुढच्या वाटेवरून येरझारा घालीत होता, व पुन्हां पुन्हां आंत नजर टाकीत होता. ग्रॅगन गेलेला पाहून तो आंत आला आणि कठड्यापाशीं उभा राहिला. तो दृष्टीस पडतांच स्पँग्लर त्याच्याजवळ गेला. त्या तरुणाला त्यानं ताबडतोब ओळखलं होतं. त्यानं त्याला विचारलं,

"काय रे ठीक आहे ना ? मला वाटलं होतं तूं पेन्सिलव्हानिआला आपल्या घरीं केव्हांच गेला असशील. तुझ्या आईनं पैसे पाठविले ते मला माहीत आहे. माझे पैसे परत द्यायसाठीं आलास होय ? तसं करण्याची कांहीं गरज नव्हती."

तो तरुण मुलगा म्हणाला, " तुमचे पैसे परत द्यायसाठीं आलों नाहीं. आणखी घ्यायसाठीं आलों आहे." मधेंच तो खोकला व पुढें म्हणाला, " आणि या खेपेस मी पैसे मागणार नाहीं, घेणार आहे."

स्पॅंग्लर आश्चर्यानं म्हणाला, " तुझ्या बोलण्याचा अर्थच कळत नाहीं मला."

त्या तरुण मुलानं झटकन आपल्या कोटाच्या खिशांतून पिस्तुल बाहेर काढून रोखलं व म्हटलं, " आतां कळेल अर्थ तुम्हांला."

त्यानं पिस्तुल रोखलं होतं खरं पण त्याचा हात कांपत होता.

दारूची नशा आणि ज्यानाबरोबर मजेंत घालवलेल्या वेळाच्या आठवणींची धुंदी स्पॅंग्लरवर अजूनहि थोडीशी होती. त्याला या चमत्कारिक प्रकाराचा बोधच होईना.

तो तरुण मुलगा म्हणाला, " चलाव. निकालो पैसा. इथें असतील नसतील तेवढे सारे पैसे माझ्या स्वाधीन करा पाहूं. युद्ध चालूं आहे. कुणींहि कुणाला ठार करावं असा प्रकार जिकडे तिकडे चालला आहे. तुमचा जीव मी घेतला तर त्यांत काय मोठंसं बिघडलं ? अन् माझाहि जीव गेला तर जाईना का. मला उगीच धमाधम माजवायची नाहीं. पण सारे पैसे माझ्या स्वाधीन केले नाहींत तर मी गोळी घालीन तुम्हाला. चला आटपा. काढा पैसे. जलदी !"

स्पॅंग्लरनं खण उघडला, व त्यांतून नोटा, नाणीं बाहेर काढून त्या तरुणापुढें टेबलावर ठेऊन म्हटलं,

" तूं माझ्यावर पिस्तुल रोखलं आहेस म्हणून मी तुला हे पैसे देतों आहे असं मात्र समजूं नकोस. तुला पैशांची गरज असेल म्हणून मी देतों आहे. घे. आहेत तेवढे सगळे दिले आहेत. सुमारें पाऊणशें डॉलर आहेत. उचल. मी पोलिसांत वर्दी देणार नाहीं. या रकमेची भरपाई मी माझ्या खिशांतल्या पैशांनीं करीन. घे. घे अन् जा."

तो तरुण टेबलावरचे पैसे गोळा करील म्हणून स्पॅंग्लर थांबला. परंतु तो हात लावीना. तें पाहून स्पॅंग्लर म्हणाला,

"अरे खरंच सांगतों घे ते पैसे अन् जा. तुला गरज आहे. तूं कांहीं कोणी चोर भामटा नाहींस. तिकडे तुझी आई वाट पहात असेल. हे पैसे मी तिलाच भावाची भेट म्हणून देतों आहे. हे घेतलेस तर ती कांहीं चोरी व्हायची नाहीं. उचल ते पैसे, पिस्तुल दूर कर, अन् घरीं जा! टाकून दे तें पिस्तुल म्हणजे तुला जरा बरं वाटेल."

त्या तरुणानं पिस्तुल कोटाच्या खिशांत परत ठेवलं. त्याचे ओठ थरथरत होते. ज्या हातांत त्यानं पिस्तुल धरलं होतं त्याच हातानं तोंड झांकीत तो म्हणाला, "बाहेर जावं अन् स्वत:लाच गोळी घालून घ्यावी असं वाटतयं मला!"

"वेड्यासारखं बरळूं नकोस," असं म्हणून टेबलावरचे पैसे गोळा करून ते स्पॅंग्लरनं त्या तरुणापुढें धरले. "धर. होते तेवढे सगळे पैसे देतों आहे मी तुला. घे अन् घरीं जा म्हणजे झालं. तुला वाटलं तर तें पिस्तुल इथें ठेवून जा. घे हे पैसे. ते माझे नाहींत. तुझे आहेत असं समज. हे हवेत म्हणून पिस्तुल रोखण्यापर्यंत ज्या अर्थी तुझी मजल गेली त्या अर्थी ते तुझेच आहेत असं समज. तुझ्या मनाची स्थिति मी ओळखूं शकतों. कारण तिचा मला अनुभव आहे, साऱ्याच माणसांना आहे. जीं वास्तविक मनानं शुद्ध आहेत पण केवळ विपरीत योगायोगानं अन् प्रतिकूल परिस्थितीमुळें वाममार्गाला लागलीं अशीं कितीतरी अमेरिकन तरुण मुलं तुरुंगांत जातात अगर प्राण गमावतात. तीं मुलं कांहीं जात्या डाकू अगर दुष्ट नसतात. हं. आटप. घे हे पैसे अन् घरीं जा."

त्या मुलानं खिशांतून पिस्तुल काढलं अन् टेबलावर स्पॅंग्लरपुढें सरकविलं. स्पॅंग्लरनं तें उचललं अन् ज्या खणांतून पैसे काढले होते त्यांत टाकून दिलं.

तो मुलगा म्हणाला, "तुम्ही कोण आहांत कुणास ठाऊक. पण आजपर्यंत माझ्याशीं कुणीच असं बोललं नव्हतं. मला तें पिस्तुलहि नको, अन् हे पैसेहि नकोत. मी घरीं मात्र नक्की जाणार. घर सोडून इकडे भटकत आलों. आतां पुन्हां घरीं जाईन." तो एक दोनदां खोकला, व पुढें म्हणाला, "माझ्या आईनं मला तीस डॉलर पाठविले ते तिनं कुठनं आणले देव जाणे. तिच्या-

जवळ असणं शक्य नाहीं हें मला माहीत आहे. त्यांतले मी कांहीं दारूंत नासले, कांहीं जुगारांत उडविले, आणखी—"

" इकडे ये, इथें बैस पाहूं." स्पँग्लर म्हणाला.

तो मुलगा क्षणभर घोटाळला, पण मग स्पँग्लरच्या टेबलाजवळच्या खुर्चीवर बसला. स्पँग्लर उठून टेबलावर बसला व त्याला म्हणाला, " काय झालं आहे काय तुला ? "

" कुणास ठाऊक काय झालं आहे ? माझी प्रकृति खराब झाली आहे. येवढं खरं. कदाचित् क्षय झाला असेल. मला नक्की सांगतां येत नाहीं. पण झाला असेल. झाला नसला तरी होणार खास. मी ज्या तऱ्हेनं आयुष्य काढतों आहे तिचा तोच परिणाम व्हायचा. मला तक्रार सांगायची नाहीं. दुर्दैव माझ्या वांट्याला आलं आहे. पण तें देखील माझ्याच कर्मामुळें. आतां जातों मी. तुमचे फार आभार मानले पाहिजेत मला. तुमची मला आठवण राहील" तो उठला व जाऊं लागला.

स्पँग्लर म्हणाला, " जाऊ नकोस. थांब जरा. बैस. मन आवर. आतां तर तुला कसलीच घाई नाहीं. धांव धांव करायचं कारण नाहीं. या क्षणापासून एक गोष्ट लक्षांत ठेव. मन मोकळं सुटूं देऊं नकोस. काय करायचं तें विचारपूर्वक करीत जा. तुला कोणत्या गोष्टींची आवड आहे ? "

" कुणास ठाऊक ? कोणत्या रस्त्यानं जावं, काय करवं, कशावर विश्वास ठेवावा—कांहींच समजत नाहीं मला. माझा बाप धर्मोपदेशक होता. पण मी तीन वर्षांचा असतांनाच तो वारला." त्यानं झटकन मान वर करून स्पँग्लरकडे पाहिलं व विचारलं, " मी काय करूं ? काय करूं, सांगा ? "

स्पँग्लर म्हणाला, " अमुकच कर असं नाहीं. कांहींहि कर. माणूस काय काम करतो याचं महत्त्व नाहीं. प्रामाणिकपणानं तें केलं म्हणजे झालं."

" माझ्या मनाला कधीं स्वस्थता लाभली नाहीं. कधीं संतोष वाटला नाहीं. कशामुळें मन असं भिरिभिरी धांवतं तें माझं मला कधीं कळलं नाहीं. कुठल्याहि गोष्टींचं महत्त्वच मला वाटत नाहीं. माणसं मला आवडत नाहींत. त्यांच्याजवळ जावसं मला वाटत नाहीं. त्यांचा भरंवसा मला वाटत नाहीं. ज्या

तऱ्हेनं तीं बोलतात चालतात, जगावयासाठीं एकमेकांना ढकलतात त्या तऱ्हेची मला किळस येते."

"प्रत्येक माणसाच्या मनांत असले विचार केव्हां केव्हां येतात."

तो मुलगा म्हणाला, "मी कोणत्या वाटेनं चाललों आहे तें माझं मला समजत नाहीं असं नाहीं. समजतं. मी डोळे मिटून चाललों आहे अशांतला भाग नाहीं, माझे डोळे उघडे आहेत. माझ्या हातून जें जें घडलं त्या सगळ्याची जबाबदारी माझ्यावर आहे. परंतु आतां असं झालं आहे कीं माझ्यांत तकवाच उरला नाहीं. अगदीं थकून गेलों आहे मी. शरीरानं आणखी मनानंहि. मला कशांत गोडीच उरली नाहीं. सारं जग वेडं झालेलं दिसतं मला. ज्या तऱ्हेचं आयुष्य घालवावंसं मला वाटतं तसं घालविणं शक्य राहिलं नाहीं. आणि दुसऱ्या कोठल्या तऱ्हेनं जगावसं मला वाटत नाहीं. मला पैसे हवे आहेत, त्यावांचून माझं अडलं आहे अशांतला भाग मुळींच नाहीं. मला नोकरी मिळायची नाहीं का ? सध्यां तर काय पैशा पासरीं चालल्या आहेत नोकऱ्या. परंतु मला नोकरी नकोशी वाटते. कारण ज्यांच्या हातीं नोकऱ्या आहेत ते सारे नालायक आहेत. त्यांचं तोंड पहावसं मला वाटत नाहीं. त्यांच्यापुढें उभं रहायचं, तोंड वेंगाडायचं ह्या गोष्टी माझ्याच्यानं होणार नाहींत. शिवाय नोकरी धरायची आणि इतरांशीं धक्काबुक्की करून ती टिकावयाची हें देखील मला किळसवाणं वाटतं. यॉर्कमध्यें, पेन्‌सिलव्हानियामध्यें मी नोकरी करून पाहिली. परंतु प्रत्येक ठिकाणीं माझं पटूं नये अन् माझी हकालपट्टी व्हावी. चार आठ दिवस काम करायचं, पुन्हा बेकार व्हायचं असा प्रकार चालायचा. शेवटीं वाटलं आपण सैन्यांत दाखल व्हावं. मनाशीं विचार केला कुठल्या तरी आघाडीवर जायचं आणि मरायचं हें काम कांहीं वाईट नाहीं. अर्थात् सैन्यांतसुद्धां वरिष्ठांची अरेरावी सहन करावी लागतेच. पण एक समाधान असतं कीं लोक ज्याला सत्कार्य समजतात त्यासाठीं आपण ती सहन करीत आहोंत तें सत्कार्य म्हणायचं कीं नाहीं कोण जाणे ! परंतु लोकांची तशी समजूत आहे येवढं तरी खरं. परंतु मला सैन्यांत घेईनात. वैद्यकीय तपासणींत त्यांनी मला नालायक ठरविलं. माझी फुप्फुसं दूषित आहेत म्हणे. आणखीहि कांहीं सांगितलं.

काय तें समजून घेण्याची मी फिकीरच केली नाहीं." बोलतां बोलतां तो खोकूं लागला व त्याची ढास कांहीं केल्या थांबेना.

स्पँगलरनं टेबलाच्या खणांतून एक छोटी बाटली काढली व म्हटलं, "यांतला एक घोट घे."

"थँक्स. मी वाजवीपेक्षां जास्ती घेतों मला माहीत आहे, परंतु या घटकेला मला खरंच दारू हवी आहे." त्यानं एक घोट घेतला व बाटली स्पँगलरच्या हातांत देत म्हटलं "थँक्स"

त्याला आणखी बोलत ठेवण्याच्या हेतूनं स्पँगलरनं विचारलं, "तूं काय वाचतोस?"

"हातीं येईल तें वाचतों. म्हणजे घरीं होतों तेव्हां वाचीत असें. माझ्या बापाजवळ पुष्कळ पुस्तकं होतीं. केवळ धर्मिकच नव्हे, तर चांगल्या लेखकांची चांगलीं पुस्तकं पुष्कळ होतीं आमच्या घरांत. विल्यम ब्लेक हा लेखक माझ्या फार आवडीचा. त्याचीं पुस्तकं तुम्ही वाचलीं असतील. शेक्सपीअर, मिल्टन, पोप, डॉन, डिकन्स, थॅकरे—अशांचीं जेवढीं पुस्तकं मिळालीं तेवढीं मी वाचून काढलीं. त्यापैकीं कांहीं दोनदोनदां तीनतीनदां. वाचनाची फार गोडी होती मला. पण आतां ती अगदीं उरली नाहीं. वर्तमानपत्राकडे सुद्धां पहावंसं मला वाटत नाहीं. कारण त्यांत काय बातमी असणार हें मला माहीत झालं आहे. खून, मारामाऱ्या, आत्महत्त्या, लाचलुचपत हे प्रकार अष्टौप्रहर सगळीकडे चालले आहेत. आणि एक देखील मनुष्य शिरशिरून असं म्हणत नाहीं कीं अरेरे हें काय चाललं आहे काय?"

त्यानं आपल्या दोन्हीं हातांनीं डोकं गच्च धरून ठेवलं होतं व खालीं पहातच तो बोलत होता. "तुमच्या चांगुलपणाबद्दल आणि तुमच्या बोलण्याचा माझ्यावर जो परिणाम झाला त्याबद्दल तुमचे पुरेसे आभार मानतां येत नाहींत मला. मी तुमच्यावर पिस्तुल रोखलं त्यावेळीं तुम्ही भ्यायला असतींत अगर दुष्टपणानं माझ्याशीं वागला असतां तर मी तुम्हाला खचित गोळी घातली असती. जगांत जिकडे तिकडे भेकड अथवा दुष्ट लोक भरलेले मला दिसतात. आतां माझ्या लक्षांत आलं कीं मी इथें तुमच्याकडे आलों तो कांहीं

पैशासाठीं नव्हे. निराळ्याचं हेतूनं आलों. तुम्हांस खरं वाटेल की नाहीं कुणास ठाऊक. पण सांगतों माझा काय हेतु होता तो. तुम्ही त्या दिवशीं मला पैसे दिलेत. आठवतं तुम्हाला ? केवळ भलेपणासाठीं भलेपणा करणारा जो एकच मनुष्य मला साऱ्या जगांत भेटला तो तरी खरोखरच भला आहे कां याची मला शहानिशा करून घ्यायची होती. असा भलेपणा मनुष्य दाखवूं शकतो यावर विश्वास ठेवायला मी तयार नव्हतों. कारण जगांतल्या माणसाविषयीं अन् साऱ्या गोष्टींविषयीं माझ्या मनांत जी तिरस्काराची भावना मी ठेवली ती मग चुकीची ठरत होती. मनुष्यजात तेवढी हरामखोर अन् पाजी आहे, इतरांच्या आदाराला जो पात्र व्हावा असा एकहि माणूस नाहीं, सारे नुसते माणसांचे सांगाडे, माणुसकी एकांतहि नाहीं अशी माझी समजूत होत गेली होती. लोकांची दुःखं अन् लोकांचे पराक्रम या दोन्ही गोष्टींबद्दल तुच्छतेची भावना माझ्या मनांत दृढ होत गेली होती. अन् अशा स्थितींत एक दिवस अकस्मात् तुम्ही भेटलांत. घरादारापासून हजारों मैल दूर एका अनोळखी शहरांत मला एक भला माणूस भेटला. हें असं कसं मला कळेना. खूप दिवस मी विचार केला याबद्दल. माझा विश्वास बसेना. खरं काय तें समजून घ्यावं अशी तीव्र हुरहुर वाटूं लागली. जो भलेपणा तुमच्या बाबतींत माझ्या अनुभवाला आला तो खरा ठरला तर मला हवा होता. कारण कित्येक वर्षं मी मनाशीं म्हणत होतों, कीं दुनियेच्या घाणीनं जो बिघडला नाहीं असा एक तरी निर्मळ मनुष्य मला भेटूं दे, म्हणजे मी स्वतः निर्मळ होईन, माणुसकीवर माझा विश्वास बसेल, अन् त्या विश्वासावर जगेन. तुम्ही प्रथम भेटलांत तेव्हां तुमच्या भलेपणाबद्दल माझी खात्री पटली नाहीं. पण आतां पुरती पटली. तुमच्यापासून मला आणखी कांहीं नको. मला हवं तें सारं तुम्ही दिलं आहे. अधिक कांहीं देतां येण्यासारखं नाहीं. समजलं ना ? आतां मी उठलों कीं तुमचा निरोप घेणार. माझ्याबद्दल चिंता करूं नका. मी सरळ घरीं जाणार आहे. तीच माझी खरी जागा. या दुखण्यानं मरणार नाहीं मी. खात्रीनं जगणार आहे, अन् जगायचं कशासाठीं अन् कसं तें मला समजूं लागणार आहे."

तो बोलायचा थांबला, पण त्यानं मान खालीं घातली होती ती उचलली नाहीं. थोड्या वेळानं तो उठला अन् मग मात्र स्पॅंग्लरकडे बघून तो म्हणाला, "फार फार आभारी आहे मी तुमचा." तो ऑफिसच्या बाहेर पडला.

स्पँग्लर त्याच्याकडे पहात राहिला. त्यानं खण उघडून पैसे परत ठेवले. पिस्तुलांतल्या गोळ्या काढल्या. पिस्तुल खणांत ठेवलं अन् गोळ्या खिशांत टाकल्या. मग जुन्या तारांची फाइल घेऊन त्या मुलानं आपल्या आईला त्या दिवशीं जी तार केली होती ती त्यानं काढली. एक कोरा फॉर्म घेऊन तो तार लिहूं लागला.

"मिसेस मार्गारेट स्टिकमन
१८७४ बिडल स्ट्रीट
यॉर्क पेन्सिल्व्हानिआ
प्रिय आई, पैसे पाठविलेस त्याबद्दल
फार आभारी आहे, लवकरच घरीं
येत आहे, मी मजेंत आहे."

त्यानं मजकूर वाचून पाहिला, "मजेंत" या शब्दाऐवजीं "खुशाल" शब्द घालायचं ठरविलं. त्याच्या डोळ्यापुढें तो तरुण मुलगा अगदीं स्पष्ट उभा राहिला. तारेच्या शेवटीं "तुझ्यावर प्रेम करणारा एक जॉन" असे शब्द त्यानं लिहिले,

ओठ जुळवून ज्यानाचा आवाज काढून तो म्हणाला, "माझ्यावर तुमचं प्रेम आहे. आहे ना ? हो हो, आहेच मुळीं !"

तिच्याशीं लग्न करण्याचा त्याचा निश्चय झाला होता.

# १९

होमर अंथरुणांत पडला होता. पण त्याला शांत गाढ झोंप लागत नव्हती. सारखीं स्वप्नं पडत होतीं. पुन्हां ताऱ्यांच्या शर्यतींत आपण पळत आहोंत असं त्याला स्वप्न पडूं लागलं. प्रत्येक ताटीजवळ तो गेला कीं तिथें

बायफील्ड प्रगट होई व त्याला अडथळा करी. मात्र त्याला न जुमानतां तो ताटीवरून उडी घेई, व तसं करतांना आपटे. शेवटीं त्याचा पाय इतका दुखूं लागला कीं धांवतां धांवतां तो खालीं जमिनीवर कोसळला. तो उठला. बायफिल्डच्या एक श्रीमुखांत लगावून तो ओरडला, " मला आडवतोस? हट दूर हो! या शर्यतींत काय किंवा दुसऱ्या कुठल्याहि गोष्टींत काय माझी वाट अडवायची तुझी काय माय व्याली आहे! हो बाजूला!"

तो पुढें पळूं लागला. प्रथम लंगडत लंगडत, पण नंतर साफ. पण मग जी ताटी त्याला समोर दिसली ती भलतीच उंच होती. आठ फूट! पण होमर काय कमी होता. साऱ्या इथाका गावांत त्याच्यासारखा पटाईत जवान नसेल दुसरा. त्यानं त्या आठ फूट उंचीच्या ताटीवरून अशा सफाईनं झेप टाकली कीं पहातच रहावं.

मग दुसरं स्वप्न सुरूं झालं...

त्यानं आपला नोकरीवरचा गणवेश चढविला होता, व एका अरूंद रस्त्यानं तो आपल्या सायकलवरून भरवेगानं निघाला होता. पण इथेंहि पुन्हा आपला बायफिल्ड त्याच्यापुढें उभा. होमरनं सरळ त्याच्या अंगावर सायकल घातली व ओरडून म्हटलं, "मी एकदां सांगितलंना तुला माझी वाट अडवायची तुझी छाती नाहीं म्हणून!" सायकच्या हँडलची दोन्ही टोकं दोन्ही हातांनीं धरून त्यानं सायकलीचं चाक उचलल्यासारखं केलं, त्याबरोबर सायकलनं बायफिल्डच्या अंगावरून उडी घेतली. बायफिल्ड उठून पुन्हां वाटेंत उभा राहिला. होमरच्या सायकलनं पुन्हां त्याच्यावरून उडी घेतली. आणि या खेपेस सायकल पुन्हां खालीं रस्त्यावर टेकलीच नाहीं. बायफिल्डच्या डोक्यावर तीन पुरुष ती अंतराळांतच चालूं राहिली. तें पाहून बायफिल्ड चाटच झाला. रस्त्यांत उभं राहून तो ओरडला, "ए! हें बरं नाहीं! संभाळ! गुरुत्वाकर्षणाचा कायदा मोडतो आहेस तूं!"

खालीं बघत होमर ओरडून म्हणाला, "गुरुत्वाकर्षणाचाच काय, शास्त्रांत असतील नसतील तेवढे सारे कायदे मोडीन मी! तूं माझी वाट आडवूं शकत नाहींस! तुझी ताकद नाहीं. बास! किडा लेकाचा! मर. धुळींत पड.

तुझ्याकडे पाहायलासुद्धां मला सवड नाहीं." होमर वेगानं पुढें निघाला. रस्त्यांत उभा राहिलेला बायफील्ड म्हणजे त्याच्या दृष्टीनं क्षुद्रांतली क्षुद्र गोष्ट होती.

थोड्याच वेळांत होमरच्या सायकलीनं उंच उंच भरारी घेतली. काळ्या सांवळ्या ढगांतून तो निघाला. त्यानं पाहिलं तों दुसरी एक सायकल मेघमालेंतून सपाट्यानं चालली होती. तिच्यावर स्वार झालेल्या संदेशवाहकाच्या अंगावर त्याच्यासारखाच गणवेष होता. मात्र तो त्याच्याहून अधिक वेगानं जात होता. अगदीं हुबेहुब होमरसारखा किंबहुना दुसरा होमरच दिसत होता तो. परंतु होमरला वाटलं, नव्हें, हा यमदूत आहे ! तो खरा कोण आहे तें पाहण्यासाठीं होमर त्याच्या पाठोपाठ खूप वेगानं जाऊं लागला.

ही शर्यत खूप वेळ चालूं राहिली. मग होमरनं त्याला गांठायला सुरुवात केली. त्यानं एकदम मान वळविली तेव्हां होमर आश्चर्यानं थक्कच झाला. आपल्यांत व त्याच्यांत भयंकर साम्य आहे ही गोष्ट होमरच्या लक्षांत आली. मात्र त्याच्या मुद्रेवरील आवेश अगदीं वेगळा होता. तो यमदूत होता खास ! तो इथाका गांवाकडे जात होता. होमर त्याच्या मागोमाग भयंकर वेगानं निघाला. त्यानं खालीं नजर टाकली. दूर खोल अंतरावर गावांतले तुरळक दिवे बारीक ठिपक्यासारखे दिसत होते. सुंदर रस्ते व घरं अगदीं स्तब्ध सोबतीवांचून एकटींच राहिल्यासारखीं दिसत होतीं. त्या यमदूताच्या पुढें झटकून त्याला अडविलंच पाहिजे, इथाकाकडे त्याला जाऊं देतां कामा नये असा होमरनं निश्चय केला. त्याची वाट रोखण्याइतकं या क्षणीं दुसऱ्या कोणत्याच गोष्टीला महत्त्व नव्हतं.

त्या दोघांची बेफाम शर्यत सुरूं झाली. मात्र ती अगदीं सारे नियम संभाळून सरळ न्यायानं. दोघेहि आतां थकूं लागले. पण होमर पुढें सटकला अन् त्यानं त्या यमदूताला परत फिरायला लावलं. होमरला वाटलं जिंकली. परंतु तितक्यांत त्या यमदूतानं गिरकी मारली व खालच्या बाजूनं होमरच्या पुढें निसटून तो इथाकाकडे निघाला. होमरची निराशा झाली. तो यमदूताचा पाठलाग करीतच होता. पण आतां त्यांत कांहीं अर्थ उरला नव्हता. तो

कोठच्या कोठें पुढें निघून गेला होता. होमरच्या अंगातलं बळच आतां सरलं होतं. सायकल गिरक्या घेत खालीं कोसळूं लागली. हुंदके आवरतां आवरतां होमर त्या यमदूताला ओरडून विनवीत होता, "परत फीर ! इथाकाला जाऊं नकोस ! त्यांच्यावर झडप घालूं नकोस ! ये. मागं फीर ! ..."

होमरचा ऊर असह्य दुःखानं भरून आला. त्याला हुंदके अनावर झाले.

युलिसेस त्याच्या उशाजवळ येऊन उभा राहिला होता. त्याचे हुंदके ऐकत तो कांहीं वेळ उभा राहिला. मग अंधारांतून चालत तो आपल्या आईच्या बिछान्याकडे गेला व त्यानं तिला हालविलं. ती उठून बसली तेव्हां त्यानं तिचा हात धरला. एकमेकाशीं एक शब्ददेखील न बोलतां तीं दोघं होमरच्या अंथरूणापाशीं आलीं. होमरची आई त्याचं रडणं ऐकत क्षणभर उभी राहिली. मग तिनं आधीं यूलिसेसला परत नेऊन निजविलं अन् नंतर ती होमरजवळ येऊन बसली. त्याला थोपटीत ती अगदीं हलक्या आवाजांत म्हणाली,

"उगी उगी. शांत हो. तूं फार थकला आहेस. नीज पाहूं. अगदीं शांत नीज." होमरचे हुंदके हलके हलके बंद झाले. त्याच्या चेहऱ्यावरची वेदनेची छायादेखील गेली. त्याची आई पुन्हां म्हणाली, "आतां झोप घे. नीज. शांत निज."

होमर झोंपीं जाऊं लागला. त्याच्या आईनं पलीकडच्या छोट्या युलिसेसकडे पाहिलं ता त्यालाहि झोंप लागली होती. कोपऱ्याकडे तिची नजर वळली. युलिसेसचे वडील तिथें उभे असलेले तिला दिसले. जणूं सर्व गोष्टींकडे त्याचं लक्ष असल्याप्रमाणें त्यांची दृष्टि होती व त्यांच्या चेहऱ्यावर हास्य होतं. होमरची आई हलकेच उठली, उशागतीं गजराचं घड्याळ होतं तें तिनं उचलून घेतलं, व ती परत आपल्या खोलीकडे गेली.

होमरच्या निद्रेवर आतां भीतीची सावली राहिली नव्हती, समाधानाचीं अन् सुखाचीं कोवळीं ऊन्हं अलगद पसरूं लागलीं होतीं. त्याला स्वप्न पडत होतं कीं एका ओढ्याच्या कांठीं एका अंजिराच्या झाडाखालीं आपण उताणे पडलों आहोंत. स्वप्नांतच तो म्हणत होता, "हें ठिकाण मला आठवतं आहे. गेल्या उन्हाळ्यांत मी अन् मार्कस् इथें आलों होतों. आम्ही पोहलों, मग इथें या

झाडाखालीं बसलों, अन् मोठेपणीं काय काय करायचं त्याचे किती बेत केले!" आतां तो परत त्या स्थळीं आला होता. त्या स्थळाची रमणीयता त्याच्या परिचयाची होती, अन् पूर्वीच्या आठवणींनीं त्याचं मन आणखीच बहरून आलं. हर्षाच्या भरांत झाडाखालच्या गवतावर त्यानं अंग टाकलं व हातपाय पसरले. आपण झोपेंत आहोंत—स्वप्नांत आहोत—याचं भान त्याला उरलं नाहीं.

समोरच्या तृणराजी व वृक्षशाखा तो पहात राहिला. आणि काय आश्चर्य! थोड्याच वेळानं दूर अंतरावरून एका अरुंद पायवाटेनं हेलन आपल्याकडे येत आहे असं त्याला दिसलं. तिची शोभा केवळ स्वर्गीय होती. होमर स्वतःशीं म्हणाला, "माझं जिच्यावर मन जडलं आहे ती हीच हेलन! माझी लाडकी!" तो हंसत हंसत उठून बसला, कांहीं वेळ तिच्या सुंदर आकृतीकडे निरखून बघत राहिला, अन् मग तिला सामोरा गेला. तो तिच्याशीं कांहीं बोलला नाहीं. उलट कांहींशा गांभीर्यानंच त्यानं तिचा हात धरला व तीं दोघं मिळून झाडाजवळ आलीं. त्यानं आपला शर्ट काढला, विजार काढून टाकली अन् झटकन पाण्यांत सूर मारला. हेलन एका झुडपामागे झाली व तिनंहि आपलीं वस्त्रं उतरलीं. होमर तिच्याकडे पहात होता. ती हलकेच ओढ्याच्या कांठाशीं आली, क्षणभर थबकली, व मग तिनंहि प्रवाहांत उडी घेतली. अजूनहि त्या दोघांच्या वृत्तींतलं गांभीर्य गेलं नव्हतं. बराच वेळ पोहल्यानंतर तीं दोघं कांठावर आलीं व अंग वाळविण्यासाठीं ऊन्हांत पडून राहिलीं. लवकरच दोघांनाहि झोप लागली...

## २०

युलिसेस सकाळीं फार लवकर उठला होता. शेजारीं एका माणसानं गाय पाळली होती, त्या माणसाच्या घराकडे स्वारी सकाळच्या कोवळ्या उन्हांतून उड्या मारीत निघाली होती. गोठ्यापाशीं गेल्यावर त्याला गाय दिसली.

तिच्याकडे पाहात तों किती वेळ तरी उभा राहिला. शेवटी गाईचा मालक आपल्या चंद्रमौळी घरांतून बाहेर आला. त्यच्या एका हातांत छोटं स्टूल अन् एका हातांत बादली होती. तो आला तो सरळ गाईपुढें बसला. अन् धार काढूं लागला. नीट पाहतां यावं म्हणून युलिसेस पुढें पुढें सरकूं लागला. व अखेर त्या माणसाच्या पाठीला भिडला. तरी त्याला मनाजोगं दिसेना. म्हणून तो गुडघ्यांवर टेकून पालथाच पडला. गाईच्या मालकानं त्याला पाहिलं, पण तो कांहीं बोलला नाहीं. तो आपला धार काढीत राहिला. गाय मात्र मान वळवून युलिसेसकडे बघूं लागली. युलिसेसहि तिच्याकडे बघत राहिला. त्याला वाटलं आपण तिच्या इतकं जवळ यावं हें कांहीं तिला पसंत पडलेलं नाहीं. मग तो उठला, दोन पावलं मागं सरकला, अन् तिथून बघूं लागला. गायहि त्याच्याकडे बघत राहिली. तिची आपली दोस्ती जमली याबद्दल युलिसेसची खात्री पटली.

घरीं जातांना तो वाटेंत पुन्हां थांबला. एके ठिकाणीं एक माणूस धान्यासाठीं कोठार तयार करीत होता. त्याचा स्वभाव संतापी, तापट असावा, कारण काम करतांना त्याची धुसफुस चालली होती, अन् त्याच्या हातून हजार चुका होत होत्या. युलिसेस त्याची ती खटपट पहात उभा राहिला. मात्र तो काय करीत असावा तें कांहीं त्याच्या लक्षांत आलं नाहीं.

अखेर युलिसेस आपल्या घराच्या रस्त्याला लागला. त्यानं कोपऱ्याचं वळण घ्यायला अन् मेरीचे वडील कामावर जायसाठीं घरांतून निघून सायकलवर बसायला एक गांठ पडली. पण मेरीनं वडिलांना हात उंच करून दाखविला व हालविला, व मग ती घरांत परत गेली हें सारं त्याला पहायला मिळालं.

शनिवारचा दिवस होता आज. शाळकरी पोरांची आज आनंदाची धांदल उडालेली असायची. एका घरांतून आठ नऊ वर्षांचा एक मुलगा बाहेर पडला. युलिसेसनं त्याला हात दाखवून हालवला, अन् लगेच त्या मुलानंहि आपला हात हालविला. या मुलाचं नांव लायनेल. हा बुद्धीनं जरा मंद होता व सारीजणं त्याला खुळा समजत. पण खरं म्हणजे मोठ्या मायाळू स्वभावाचा, उदार, इमानी असा एक उमदा जीव होता तो. जरा वेळानं लायनेलनं पुन्हां हात दाखवून हालविला, अन् युलिसेसनं उलट तसं केलं, आणि जणूं दुसरं काय

करायचं म्हणून त्या दोघांनीं आणखी एकदां हात हालविले. ही हस्तपल्लवी आणखी किती वेळ चालली असती कुणास ठाऊक, पण तितक्यांत ऑगी नांवाचा मुलगा आपल्या घरांतून बाहेर पडलेला त्यांना दिसला, व ऑगीला पाहिल्याबरोबर त्यांनीं हातांचा चाळा थांबविला.

ऑगी म्हणजे आळींतल्या साऱ्या पोरांचा म्होरक्या होता. वयाच्या बाराव्या वर्षी होमरनं या पोरांचं पुढारीपण सोडलं, व त्याच्या गादीवर ऑगीची स्वारी तेव्हांपासून विराजमान झाली होती. रस्त्यावर पाऊल टाकतांच या नायकानं आपल्या टोळीचे कुणी सभासद आजूबाजूस दिसतात कां म्हणून नजर टाकून पाहिलं. लायनेल व युलिसेस त्याला दिसले. पण एक खुळा व दुसरा अगदीं बच्चा मिळून दोघांचाहि त्याला कांहीं उपयोग नव्हता. मात्र त्यांना हात दाखवून हालविल्याशिवाय तो राहिला नाहीं. मग तो रस्त्याच्या मधोमध जाऊन उभा राहिला व तोंडांत बोट घालून त्यानं शीळ घातली. ती खणखणीत कर्कश शीळ म्हणजे लष्करी हुकुमाची सादच होती. शीळ घातल्यावर ऑगी थांबला. आतां काय होणार याची त्याला खात्री असल्यासारख्या मुद्रेनं त्यानं सभोंवार दृष्टि टाकली. घराघराच्या खिडक्या उघडल्या गेल्या. उलट शिट्या ऐकूं आल्या. थोड्याच वेळांत नेहमींचं टोळकं जमा झालं. निकी, आल्फ, शॅग, झाडून सगळे आपल्या पुढाऱ्याभोंवतीं गोळा झाले.

निकीनं विचारलं, "ऑगी, कुठें जायचं रे ?"

"बुढ्या हेंडर्सनच्या बागेंतले अलूबुखार पिकले आहेत कां बघायला जाऊं या."

लायनेलनं विचारलं, "ऑगी, मी येऊं ?"

"ठिक, ये. पण अलूबुखार पिकले असले तर चोरून तोडशील ?"

"चोरी पाप आहे..."

"अलूबुखारची चोरी आहे ही. यांत पाप नाहीं" धर्मशास्त्रांतला सूक्ष्म निर्णय सांगितल्याप्रमाणें ऑगीनं चर्या केली होती. मग तो युलिसेसकडे वळून

म्हणाला, " तूं घरीं जा युलिसेस. लहान मुलं उपयोगी नाहींत या कामांत. बोलूनचालून धाडस आहे हें. "

युलिसेस चार पावलं माग सरकला, पण तिथें उभं राहून बघत राहिला. ऑगीनं त्याला जायला सांगितलं याचा त्याला राग आला नाहीं. टोळक्यांत कुणाला घेतात कोणाला नाहीं हें त्याला माहीत होतं. तो अजून पुरेसा मोठा नव्हता त्याला काय करायचं ? मात्र टोळक्याचा कायदा त्यानं मानला खरा, पण टोळक्यांत आपल्याला सामील होता आलं तर काय बहार होईल असा मोह कांहीं त्याला आवरेना.

हेंडर्सनच्या बागेकडे पोरांचा मोर्चा निघाला. मोठ्या रस्त्यानं जाण्या-ऐवजीं आड वाटेनं गल्लीकुचींतून, कुंपणावरून उड्या मारीत तीं मुलं चाललीं. राजरस्त्यानं जाण्यांत काय मजा, धाडस करायला जायचं तर वाट्हि तशीच पाहिजे, असा त्यांच्या मनांतला हिशोब असावा. युलिसेस टोळक्यापासून जरा अंतरावर राहून पण मागोमाग चालला होता.

वाट चालतां चालतां ऑगी आपल्या अनुयायांशीं बोलत होता. मधेंच तो म्हणाला, " पिकलेल्या अलूबुखारसारखं दुसरं चवदार फळ नाहीं जगांत. "

निकीनं शंका काढली, " पण मार्च महिन्यांत अलूबुखार पिकतात कुठें ? "

ऑगीनं त्याची शंका उडवून लावली, " अरे एप्रिल महिन्याला आतां काय शिंगं उरलीं आहेत ? शिवाय कांहीं झाडांना लवकर बहर येतो ऊन्हं रखरखून पडलीं तर ! "

आल्फ म्हणाला, " पण आतांशा तर पाऊस पडतो आहे ! "

परंतु ऑगीनं या शंकेचंहि लगेच निराकरण केलं. तो म्हणाला, " लेका, अलूबुखारमधें रस येतो तो कुठून ? पाण्यापासून. पावसामुळें. ऊन्हाइतकीच पावसाची देखील गरज असते ! हुंः ! "

शॅगनं आपल्या पुढाऱ्याची री ओढली, " तर काय. दिवसा उन्ह व रात्रीं पाऊस असंच पाहिजे. झाडं उन्हानं तापलीं अन् पावसानं भिजलीं म्हणजेच

त्यांना बहार येतो. वेडाच आहे आल्फ. माझी खात्री आहे कीं हेंडर्सनच्या झाडावर रगड पिकलेले अलूबुखार सांपडणार आपल्याला."

आल्फ म्हणाला, "सांपडले तर बरंच झालं रे."

निकीनं पुन्हां शंका काढली. "छे! अलूबुखारचा मोसम अजून फार दूर आहे. मागच्या वर्षी जून महिन्यापर्यंत पिकले नव्हते, आठवत नाहीं तुम्हांला ?

पण ऑगी म्हणाला, "तीं मागच्या वर्षीची गोष्ट झाली. हें वर्ष यंदाचं वर्ष आहे."

सुमारें दोन अडीचशें कदम राहिले तेव्हां हें पोरांचं टोळकं थबकलं, अन् दुरूनच अलूबुखारच्या त्या खूप जून्या वृक्षाची शोभा सगळीजणं बघूं लागलीं. त्या जीर्ण विस्तीर्ण वृक्षाच्या फांद्यांवरची पर्णराजी हिरवी गार सुंदर दिसत होती! हेंडर्सनच्या परड्यांतल्या एका कोपऱ्यांत होतं हें झाड. गांवांतल्या चोरट्या पोरांनीं या झाडावर कित्येक वर्षे हल्ले केले होते, अन् या वृक्षानं त्यांना आपलीं कच्चीं पक्कीं फळं अर्पण केलीं होतीं. वसंतऋतु जवळ आला कीं पोरांची टोळधाड येणार हें ओळखून हेंडर्सन मनांतल्या मनांत हंसत पोरांची वाट पहात खिडकीच्या पडद्याआड बसत असे, तो पोरांना फळं तोडूं देई, अन् मग एकदम दारांत प्रगट होऊन त्यांना पिटाळून लावी. असं झालं म्हणजे पोरंहि खुष असत.

आत्तांसुद्धां हेंडर्सन खिडकीजवळ पडद्याआड पुस्तक वाचीत बसला होता. ऑगी व त्याची टोळी दिसल्याबरोबर तो स्वतःशींच हंसला व म्हणाला, "वा! आहेत कीं नाहीं विद्वान! अलूबुखार चोरायला यायचे का हे दिवस! गाढव कारटीं कुठलीं!"

तो त्यांच्याकडे बघत राहिला, व पुन्हां स्वतःशींच बोलूं लागला, "आमच्या झाडावरचे अलूबुखार हवेत काय? या. आस्ते कदम. कशीं लपत छपत येताहेत बघा. हाः हाः! बघा, बघा! अरे अन् ती छोटी स्वारी पहा. पुरतं पांच वर्षांचंसुद्धां नसेल हें पोर. नवं दिसतं आहे. या, बेट्यांनो या! परिस्तानांतल्या या झाडाकडे या! तुम्हांला चोरतां यावेत म्हणून झाडावर

पिकलेले अलूबुखार उत्पन्न करण्याची कांहीं जादू असती तर मी तुमच्यासाठीं अवश्य केली असती बेट्यांनो !"

अशा प्रकारें स्वतःशीं बडबडत हेंडर्सन त्या टोळक्याच्या हालचाली बघत राहिला.

त्या चोरट्या हल्ल्याचीं सूत्रं ऑगीच्या हातीं होतीं. एखाद्या सेनापति-प्रमाणें तो आपलं सैन्य हालवीत होता, हुकूम सोडीत होता. साऱ्यांनीं मिळून अलूबुखाराच्या वृक्षाला गराडा दिला. त्यासाठीं अवाज न करतां चोरटीं पावलं टाकतानां त्यांच्या छातींत धडधडत होतं. कारण मनांत यशाची आशा होती तसीच अपयशाची भीतिहि होती. अलूबुखार पिकलेले नसले तरी झाड हेंडर्सनच्या मालकीचं होतं, अन् कच्चे अलूबुखार तोडले तरी चोरी ती चोरीच ठरत होती. एवींतेवीं आपण चोर ठरलों तर पिकलेले अलूबुखार तरी मिळूं देत असा त्या पोरांच्या मनांत विचार येत होता. मात्र एकीकडे हा विचार येत होता तर दुसरीकडे भय वाटत होतं. हेंडर्सन येऊन पकडील याचं भय, आपण पाप करतों आहोंत याचं भय, आणि सगळ्यांत मोठं तापदायक भय अशा शंकेचं कीं आपण भलत्याच दिवसांत आलों असं तर ठरणार नाहीं. अलूबुखर पिकलेले नसले म्हणजे !...

अगदीं झाडाच्या जवळ पोचल्यावर निकी हलकेच कुजबुजला, "म्हातारा घरांत नाहीं असं दिसतंय् ऑगी."

"छट् ! तो घरांत असणार. सदा असतो. लपला असेल, इतकंच. हा डाव आहे त्याचा. आपल्याला पकडायसाठीं. स्! सारींजणं अगदीं जपून रे. बुड्ढा केव्हां उपटेल नियम नाहीं लेकाच्यानों ! आस्ते. संभाळून. युलिसेस, तूं घरीं जा पाहूं."

युलिसेसनं आज्ञाधारकपणानं चार पावलं माघार घेतली. आणि त्या शोभिवंत मोठ्या वृक्षावर आतां मोठा प्रेक्षणीय हल्ला चढविला जाणार तो पहावा म्हणून तो उभा राहिला.

शॅगनं विचारलं, "ऑगी, पिकले आहेत कां रे ? रंग दिसतो आहे कां कुठें ?"

"उ सारं हिरवं दिसत आहे. पण ती पानं आहेत. फळं त्यांच्याखालीं असणार. ठीक आहे. सारे हुश्शार हं. लायनेल कुठें आहे ?"

लायनेल अगदीं हलक्या आवाजांत म्हणाला, "हा इथें." तो अगदीं टरकून गेला होता.

ऑगी त्याला म्हणाला, "आहेस ना ? ठीक. सावध रहायचं बरं कां ? अन् म्हातारा दिसला कीं सूंबाल्या करायचा..."

"तो कुठें आहे ?" आजुबाजूला, खालीं, वर बघत ऑगीनं विचारलं. त्याची कल्पना अशी कीं हेंडर्सन म्हणजे अगोचर असा एखादा प्राणी असेल, किंवा सशायेवढा बारीक असेल अन् तो एकदम गवतांतून टुणादिशीं उडी मारील तें कळायचं देखील नाहीं.

"कुठें आहे काय खुळचटा ?" ऑगी म्हणाला, "घरांत आहे. पण हेंडर्सनचा कांहीं नियम सांगतां येत नाहीं. तो इकडे बाहेरहि कुठें तरी दबा धरून बसला असेल, अन् आपल्यावर एकदम झडप घालील."

आल्फनं विचारलं, "झाडावर कोण चढणार ? ऑगी, तूंच कां ?"

"मग दुसरं कोण !" ऑगी म्हणाला, "मीच चढणार. नक्की. पण आधीं अलूबुखार पिकले आहेत कीं नाहीं बघूं या."

शॅग म्हणाला, "पिकलेले असोत नसोत, थोडेतरी तोडायचेच बाबा."

ऑगी म्हणाला, "तें तर झालंच रे. पण पिकले असले तर खूप तोडूं, नाहीं कां ?"

लायनेल म्हणाला, "उद्यां चर्चमधें गेल्यावर कोणत्या तोंडानं प्रार्थना करायची रे ?"

ऑगी म्हणाला, "हं: ! काय वेडा आहे. अरे बायबल मधली चोरी निराळी, ही निराळी ! अलूबुखार चोरणं म्हणजे चोरी नव्हेच मुळीं."

"मग आपल्याला भय कां वाटतं आहे ?"

"कुणाला भय वाटतं आहे. ? जरा सावधगिरी ठेवायला हवी येवढंच. पळून जाणं शक्य असतांना पकडलं जाण्यांत काय अर्थ आहे ? तेव्हां जपून काय तें करायचं. हुं : ! म्हणे भय ?"

" पिकलेले अलूबुखार मला तर कांहीं दिसत नाहींत."

" झाड तरी दिसतं आहे कां तुला ?"

" हां, झाड दिसतं आहे. हिरवंगार, जंगी. पण तेवढंच..."

येवढ्यांत सारं टोळकं झाडाच्या अगदीं खालींच येऊन पोचलं होतं. युलिसेस त्याच्या मागोमाग सरकून जरा अंतरावर उभा होता. त्याला मुलीं· देखील भीति वाटत नव्हती. त्या टोळक्याचीं बोलणींहि धड समजत नव्हतीं. मात्र त्यांचे कसले तरी महत्वाचे बेत चालले होते येवढं त्याच्या लक्षांत आलं होतं. सारीं मुलं झाडाखालीं उभीं राहिलीं, व त्या जुन्या वृक्षाच्या हिरव्या गार फांद्यांकडे लक्षपूर्वक पाहूं लागलीं. फळं दिसत होती. पण अगदीं लहान, हिरवीं-चार, अन् टणक !

आल्फ म्हणाला, " शीः ! पिकले नाहींत !"

ऑगी म्हणाला, "हुं ! ... अजून थोडे दिवस हवेत. कदाचित् पुढच्या शनिवारीं ..."

शॅग म्हणाला, " पुढच्या शनिवारीं नक्कीच ..."

ऑगी म्हणाला, " पण काय लगडल्या आहेत रे फांद्या !"

" रिकाम्या हातांनीं जायचं काय ऑगी ? कच्चा कां होईना पण एक तरी अलूबुखार तोडलाच पाहिजे !"

"हरकत नाहीं. तोडतों. मात्र तुम्हीं सगळीं धूम ठोकायच्या तयारीनं असा हं." असं म्हणून ऑगी झटकन् पुढें झाला, आणि एका फांदीला लोंबकळून झाडावर चढला. टोळीचे बाकीचे सभासद थक्क होऊन, मंत्रमुग्ध होऊन ऑगीचा तो पराक्रम बघत राहिले.

आणि तितक्यांत हेंडर्सन आपल्या दारांत येऊन उभा राहिला ! त्याला पाहतांच तीं सारीं पोरं पाखरांसारखीं भुर्रदिशीं उडून गेलीं !

पळतां पळतां शॅगी मागं वळून ओरडला, " ऑगी ! हेंडर्सन ! ..."

# २१

चौर्यमंडळाचे सभासद धांवत, धांपा टाकीत परत आले ते आरा नांवाच्या एका आर्मीनियन माणसाचं दुकान होतं त्यापुढें जमा झाले. किराणा मालाचं अन् फळांचं दुकान होतं हें. पण आरानं त्याला नांव दिलं होतं "आराची मंडई" ! शिस्तशीर माघार घेऊन हे सभासद पुन्हां एकत्र गोळा झाले, व आपल्या पुढाऱ्याची वाट पहात उभे राहिले. बऱ्याच वेळानं गल्लीच्या कोपऱ्यावर ऑगी आलेला त्यांना दिसला. त्याचा हात धरून युलिसेस येत होता. ऑगी जवळ येऊन पोचतांच त्याची मुद्रा प्रत्येक अनुयायानं निरखून पाहिली. शेवटीं आल्फनं विचारलं, ऑगी, अलूबुखार मिळाला ?"

त्या संशयात्म्याकडे तुच्छतेनं बघून ऑगी म्हणाला, "हें काय विचारतोस ! झाडावर मी चढलों तें तूं पाहिलंस ना ? अलूबुखार आणला तर !"

तें ऐकतांच सारे सभासद एकदम म्हणाले, ( सारे म्हणजे लायनेलखेरीज सारे. पण लायनेल कांहीं मंडळाचा सनदशीर सभासद नव्हता ! ) "ऑगी, दाखव. अलूबुखार बघूं दे आम्हांला !" त्यांच्या त्या उद्गारांत ऑगीच्या पराक्रमाबद्दल केवढा आदर भरला होता.

छोटा युलिसेस सारं पहात होता. या मुलांना कोणत्या गोष्टींचं येवढं विलक्षण महत्त्व वाटतं आहे त्याचा कांहीं त्याला उमज अजूनहि पडत नव्हता. परंतु त्याची येवढी खात्री होती कीं त्या गोष्टींइतक्या महत्वाच्या दुसऱ्या कोणत्याच गोष्टी असणं शक्य नाहीं. या क्षणीं तरी...

चौर्यमंडळाचे सभासद पुन्हां विनवणीच्या स्वरानं ऑगीला म्हणाले, "तूं चोरून आणलेला अलूबुखार बघूं दे आम्हांला. दाखव ना. असं काय ? काढ. दाखव."

ऑगीनं मुकाटयानं आपला हात कुडत्याच्या खिशांत घातला, अन् बंद मूठ बाहेर काढून ती पुढें केली. साऱ्या सभासदांनीं माना पुढें केल्या, अन् सारे

आदरानं व उत्सुकतेनं गप्प राहिले. त्यांच्या स्तब्धतेला पुरेसा ताण दिल्यावर ऑगीनं एकदम आपली मूठ उघडली !

त्याच्या तळहातावर एक लहानसा हिरवा अलूबुखार होता !

गुरुदेवानं एखादा चमत्कार करून दाखविला कीं शिष्यांनीं श्रद्धायुक्त अंतःकरणानं पहात रहावं त्याप्रमाणं ऑगीचे सारे भक्तगण त्याच्या तळहातावर दृश्यमान होणाऱ्या त्या फळाकडे बघत राहिले. लायनेल कांहीं या भक्तगणांपैकीं नव्हता, पण तो सर्वांत अधिक ममताळू होता. युलिसेसलासुद्धां तो महान चमत्कार पाहतां यावा म्हणून लायनेलनं त्याला उचलून उंच केलं. युलिसेसनं तो हिरवा अलूबुखार न्याहाळून घेतला, व मग एखादं कुत्र्याचं पिलूं हातांतून अंग सोडवून घेतं त्या प्रमाणें लायनेलच्या मिठींतून स्वतःला सोडवून घेऊन खालीं उतरून तो घराकडे धांवत निघाला. त्याला चमत्कार पटला नाहीं म्हणून नव्हे, तर ती बातमी केव्हां एकदां कुणाला तरी सांगायला मिळेल अशी त्याला घाई झाली म्हणून !

तितक्यांत आरा आपल्या "मंडई"च्या दारांत आला. सात वर्षांपूर्वी तो आपला देश सोडून इकडे कॅलिफोर्नियांत आला होता, आणि इथाका गांवांत त्यानं हें दुकान थाटलं होतं. उंच बांध्याचा, हाडकलेल्या चेहऱ्याचा, कांहींशा खिन्न गंभीर मुद्रेचा, अन् दिसायला जरा हास्यास्पद असा होता तो. किराणा मालाचे दुकानदार पुढच्या अंगावर बांधतात तसलं एक फडकं त्यानं आत्तां गळ्यांत अडकविलेलं होतं. त्यानं दारांत येऊन पाहिलं तो त्याच्या दारापुढेंच हें पोरांचं टोळकं त्याला दिसलं. ऑगीचे भक्तगण त्याच्या हातांतल्या दैवी चमत्काराच्या दर्शनानं साक्षात्कार झाल्याप्रमाणं धन्यतेचे उद्गार काढीत होते ते ऐकत तो कांहींवेळ उभा राहिला. मग तो पुढें होऊन म्हणाला,

"कोण रे तें, ऑगी, तूं कां ? शॅग, निकी, आल्फ, अरे सारेच आहांत कां ? काय, चाललं आहे काय ? वॉशिंग्टनची परिषदच भरविली आहे कीं तुम्हीं. दुसरीकडे कुठें तरी भरवा ही तुमची महत्त्वाची बैठक. ही कॉंग्रेसची जागा नाहीं. मंडई आहे !"

ऑगी म्हणाला, " ठीक आहे आरा, जातों आम्हीं. तो रस्त्यापलिकडे बखळ आहे तिकडे जाऊं आम्ही. पण तुम्हांला अलूबुखार बघायचा आहे कां ?"

आरानं विचारलं, " अलूबुखार ? कुठनं आणलास रे ?"

" झाडावरून. बघायचा आहे कां ?"

" या दिवसांत कुठला अलूबुखार ? अजून दोन महिने हवेत. अलूबुखार मे महिन्यांत येतात."

" पण हा मार्च महिन्यांतला अलूबुखार आहे." छोट्या भटक्या दरवेशांचा तो नायक म्हणाला, " हा पहा. बघा तरी !" त्यानं आपली मूठ उघडून पुढें केली, व तें छोटं हिरवं कच्चं फळ दाखवून विचारलं, " सुंदर ?"

" ठीक, ठीक. सुंदर. फार सुंदर अलूबुखार आणला आहेस. पण आतां ही तुमची वॉशिंग्टन परिषद इथून हालवा पाहूं. आज शनिवारचा दिवस आहे बाबांनो. धंद्याचा वखत आहे. माझी मंडई आधीच छोटीशी. दारापुढें गर्दी केलीत तर गिऱ्हाईक कसं येणार ? म्हणून म्हणतों इथून दूर व्हा. पळा, पळा पाहूं."

" अच्छा. आम्ही कशाला तुमच्या दुकानापुढें दाटी करतो आहोंत ? हे चाललों आम्ही त्या बखळींत. चला रे."

ऑगीच्या भजनीं लागलेल्या भक्तगणांचं तें स्थलांतर बघत आरा जरा वेळ उभा राहिला. मग दुकानांत जायसाठीं म्हणून तो वळणार होता. पण तितक्यांत एक लहान मुलगा बाहेर आला, त्याच्या जवळ उभा राहिला, व म्हणाला,

" बाबा ?"

आपल्या आर्मीनियन भाषेंत आरा म्हणाला, " कोण, जॉन ?"

" मला एक सफरचंद दे" मुलगा म्हणाला. अगदीं आर्जवून. जवळ जवळ रडकुंडीस आल्याप्रमाणें.

बापानं मुलाचा हात धरला, व त्याला घेऊन तो दुकानांत शिरला. एका ठिकाणीं ताजीं ताजीं सफरचंद रचून मांडलेलीं होतीं. त्यांजवळ जाऊन आणि त्या राशींतलं सर्वांत उत्तम फळ उचलून मुलापुढें करून तो म्हणाला, " सफरचंद पाहिजे ? — अच्छा. सफरचंद !"

तेवढ्यांत एक गिऱ्हाईक आलं म्हणून आरा दूर झाला.

जॉननं सफरचंदांत दांत मारून एक भला मोठा तुकडा तोडला, सावकाश चघळला, गिळून टाकला; अन् मग तो स्वस्थ विचार करीत उभा राहिला. त्या सफरचंदानं त्याचं समाधान होईना. त्यानं तें टेबलावर टाकून दिलं अन् बापाकडे बघितलं.

"बाबा?"

"हं, जॉन?"

"मला संत्रं दे."

संत्र्यांच्या राशींतील सगळ्यांत मोठं फळ निवडून उचलून पुढें करीत आरा म्हणाला, "संत्रं पाहिजे? अच्छा. संत्रं."

त्या पोरानं तें फळ दातांनीं कुरतडलं, आणि नंतर त्याची सालं तो काढूं लागला. त्यानं साल काढण्याचं तें काम प्रथम मोठ्या कसोशीनं आणि सावकाश सुरू केलं, परंतु नंतर तो इतक्या घाईघाईनं साल ओरबाडूं लागला कीं जणूं त्या सालींच्या आंत त्याला एकादं फळ नव्हे तर कायमचं अखंड सौख्यच सांपडणार होतं. त्यानं साली काढून त्या बापापुढच्या टेबलावर ठेवल्या, फळाचे दोन तुकडे केले, व एक तुकडा तोंडात घालून चघळून चघळून गिळून टाकला. परंतु नव्हेच तें! तें फळ गोड होतं परंतु त्या छोट्या मुलाचा चेहरा आंबट तो आंबटच राहिला. त्याच्या हृदयाचं समाधान कांहीं त्या फळाच्या मधुर रसानं झालं नाहीं! उरलेलं अर्धं संत्रं हातांत तसंच धरून तो एक क्षणभर उभा राहिला, व मग त्यानं तें बापापुढें टाकून दिलं.

"बाबा?"

"हां, जॉन?"

"मला चिक्की दे."

"चिक्की पाहिजे? अच्छा. चिक्की."

कपाटांतून अगदीं भारी किंमतीची चिक्की काढून बापानं मुलाच्या हातीं दिली. त्यानं वरचा कागद काढून टाकला, आणि चिक्कीचा मोठा लचका तोडून

चावायला प्रारंभ केला. परंतु छे! चिक्की गोड होती. परंतु त्या मुलाला हवं होतं तें समाधान त्यांत नव्हतं. त्यानं ती उरलेली चिक्की बापापुढें टाकून दिली.

"बाबा?"

"हां, जॉन?"

"मला केळं दे."

बापानं धीर सोडला नाहीं. "केळं पाहिजे? अच्छा. केळं!" असं म्हणून टांगलेल्या केळ्यांच्या घडांतलं सगळ्यांत पिकलेलं आणि सगळ्यांत मधुर असं केळं त्यानं तोडलं आणि मुलाच्या हातांत दिलं.

तितक्यांत एक गृहस्थ दुकानांत शिरला. या गृहस्थाला आरानं पूर्वी कधीं पाहिला नव्हतं. त्यानं त्या गृहस्थाला अभिवादन केलं. त्या गृहस्थानंहि उलट अभिवादन केलं आणि विचारलं, "तुमच्याकडे वाफोळे आहेत का?"

"वाफोळे? हां हां. पण कसल्या प्रकारचे हवेत?"

त्याच वेळीं दुसरं एक गिऱ्हाईक दुकानांत शिरलं. हें गिऱ्हाईक म्हणजे छोटा युलिसेस. तो बाजूला उभा राहिला व आपली पाळी येईल म्हणून वाट बघत त्या दोघांचा संवाद ऐकूं लागला.

"खजुराचे वाफोळे आहेत का तुमच्याकडे?"

"खजुराचे वाफोळे?" आली का पंचाईत! "खजुराचे वाफोळे," असं पुटपुटत आरानं दुकानांत चहूंकडे पाहिलं...

त्याच वेळीं त्याच्या मुलानं हातातलं केळं बापापुढें टाकून दिलं व म्हटलं, "बाबा?"

आरा भराभरा बोलूं लागला, "सफरचंद पाहिजे, सफरचंद दिलं. संत्रं पाहिजे, संत्रं दिलं. चिकी हवी म्हणालास, चिकी दिली. केळं हवं म्हणालास, केळं दिलं. आतां काय पाहिजे रे बाबा?"

"वाफोळे!"

"कसल्या प्रकारचे वाफोळे हवेत?" आरानं विचारलं. हे विचारतांना त्याचं लक्ष त्या गृहस्थाकडे होतं. किंबहुना तो जरी आपल्या मुलाकडे पहात होता तरी त्यानं जो प्रश्न विचारला तो केवळ मुलापुरता नव्हता. त्या गृहस्था-

लाहि उद्देशून तो केलेला होता. नव्हे, जगांत जीं जीं माणसं असमाधानाचे सुस्कारे सोडीत होतीं व हें पाहिजे, तें पाहिजे असं म्हणून समाधानाच्या मागं व्यर्थ धावत होतीं त्या सर्वांना उद्देशून कांहींशा निषेधाच्या चिडलेल्या स्वरांत त्यानं तो प्रश्न केला होता...

मुलगा म्हणाला, " खजुराचे वाफोळे हवेत. "

मनांतला राग कसा बसा आवरीत आपल्या मुलाला उद्देशून परंतु त्या गृहस्थाकडे पहात आरा हलकेच म्हणाला, " वाफोळे नाहींत माझ्याजवळ. खजुराचे, कसलेसुद्धां नाहींत. कशाला हवेत वाफोळे ? इतर चांगल्या जिनसा काय थोड्या आहेत ? दुकान भरलं आहे. पण तुम्हाला हवेत वाफोळे. कशाला हवेत ? "

त्या गृहस्थानं चटकन उत्तर दिलं " एका लहान मुलासाठीं हवे. आहेत. आहेत कां ?

" अंहं ! वाफोळे नाहींत. लहान मुलगा आहे. हा बघाना. माझाच. त्याला सफरचंद दिलं, चिक्की दिली, सारं दुकान दिलं. पण त्याला हवेत वाफोळे ! "

तो गृहस्थ म्हणाला, " माझ्या भावाचा धाकटा मुलगा तापानं आजारी आहे. सारखा रडतो अन् म्हणतो, वाफोळे हवेत, खजुरांचे वाफोळे हवेत. "

परंतु जगांत प्रत्येक व्यक्तीचं आयुष्य स्वतंत्र असतं, त्यांत उद्भवलेले निकडीचे प्रश्नहि स्वतंत्र असतात, दुसऱ्याची कहाणी ऐकायला कोणालाच वेळ नसतो ! त्यामुळे छोटा जॉन पुन्हा आपल्या पालुपदावर आला व म्हणाला, " बाबा ? "

आतां मात्र आरानं त्याच्याकडे मुळींच लक्ष दिलं नाहीं. आपल्या आजारी पुतण्यासाठीं खजुराचे वाफोळे मागायला आलेल्या त्या गृहस्थाकडे तो पहात राहिला. त्याच्या नजरेंत सहानुभूति होती. माया होती. पण त्याप्रमाणेंच तीव्र रागहि होता. राग त्या गृहस्थाबद्दल नव्हे, तर साऱ्या जगाबद्दल, जगांतल्या दुःखाबद्दल, व्याधींबद्दल, एकटेपणाच्या असह्य स्थितीबद्दल, असेल तें विटव आणि नसेल ते भेटव म्हणणाऱ्या मनुष्यप्राण्याच्या असंतोषाबद्दल !

त्याला स्वतःचा देखील संताप आला होता. कारण, काय दुर्दैव पहा, आपला देश सोडून इकडे सात हजार मैलांवरच्या परदेशांत येऊन ही 'मंडई' त्यानं थाटली होती, परंतु एका आजारी मुलाला खजुराचे वाफोळे हवे होते ते कांहीं त्याच्या दुकानात नव्हते! त्यानं आपल्या मुलाकडे बोट दाखविलं व त्या गृहस्थाला तो सांगू लागला,

"हा माझा मुलगा तीन वर्षांचा आहे. आजारी नाहीं. पण त्याचं हवं हवं कांहीं संपत नाहीं. त्याला काय हवं मला कळेना. सफरचंद दिलं, संत्रं दिलं, चिक्की दिली, केळं दिलं, पण त्याचं कांहीं समाधान नाहीं. बिचारा परमेश्वर. असमाधानावर त्याच्याजवळसुद्धां औषध नाहीं. ईश्वरानं माणसाला ही एवढी अफाट दुनिया दिली आहे. सूर्यप्रकाश, चांदणं, तारे, आईबाप, भाऊ, बहिणी, आप्त-स्वकीय, घरदार, अंथरूण पांघरूण-सारं कांहीं माणसाला मिळालं आहे. पण माणसाचं समाधान कांहीं होत नाहीं. तुमच्या आजारी पुतण्याप्रमाणें प्रत्येक माणूस हट्ट धरून रडतो आहे, खजुराचे वाफोळे!"

हे बोलतां बोलतां आरा आपल्या जागेवरून उठला होता आणि एखाद्या रागावलेल्या राजाप्रमाणें त्वेषानं येरझारा घालूं लागला होता. बोलणं संपलं तेव्हां त्यानं एक कागदाची पिशवी घेतली, फटकन् तिचं तोंड उघडं केलं आणि तिच्यांत एकेका राशींतून एक एक फळ टाकीत तो म्हणाला, "हें सफरचंद, अगदीं उत्तमातलं उत्तम. हें संत्रं फक्कडपैकीं. हें केळं एकदम गोड!" त्यानं ती भरलेली पिशवी त्या गृहस्थापुढें मोठ्या आदबीनं धरली व म्हटलं "तुमच्या छोट्या पुतण्यासाठीं हें घेऊन जा. कदाचित् तो रडायचा थांबेल. अगदीं निवडक फळं दिलीं आहेत. घेऊन जा. तुमच्या पुतण्याला सांगा फार चांगलीं आहेत. छे छे छे! पैसे नकोत मला. खजुराचे वाफोळे नाहींत. मी तरी काय करूं?

तो गृहस्थ म्हणाला, "याचा कांहीं उपयोग नाहीं. आम्ही त्याला सगळ्या प्रकारचीं फळं देऊन पाहिलीं. पण त्याचा एकच हट्ट खजुराचे वाफोळे पाहिजेत. तुमचे आभार मानतों. परंतु ही फळं नेऊन काय करूं? आतां

दुसऱ्या एखाद्या दुकानांत खजुराचे वाफोळे मिळतात का पाहतों." त्यानं ती कागदाची पिशवी परत ठेवली.

आरा म्हणाला "ठीक आहे बाबा, ठीक आहे. बघा दुसऱ्या दुकानांत मिळतात का. पण मी सांगतों खजुराचे वाफोळे कुठंहि मिळायचें नाहींत तुम्हाला."

त्या गृहस्थानं लाजल्याप्रमाणं मान खालीं घातली व दुकानांतून पाय काढला. आरा आपल्या टेबलामागं उभा होता. तो तसाच आपल्या मुलाकडे पहात उभा राहिला. मग आपल्या आर्मीनियन भाषेंत तो बोलूं लागला.

"दुनियेचं माथं फिरलं आहे खास. आपल्या देशा शेजारच्या देशाचीच फक्त गोष्ट घेतली तर तिथें लक्षावधी माणसं अन् लक्षावधी पोरं अन्नावांचून तडफडून मरताहेत. थंडीनं कुडकुडताहेत. अनवाणी भटकताहेत. त्यांना खायला घासभर अन्न मिळत नाहीं. रोटीच्या तुकड्यासाठीं त्यांचा आक्रोश चालला आहे. झोपेसाठीं आडवं व्हायला निवाऱ्याची जागा त्यांना मिळत नाहीं. इकडे या विस्तीर्ण अमेरिकेंत, कॅलिफोर्नियांत, इथें या इथाका गावांत आम्ही मजेंत आहोंत, सुरक्षित आहोंत. अन्न, वस्त्र सगळं कांहीं मुबलक आहे. कुणी रस्त्यांत गोळी झाडील, घराला आग लावील, आपल्या मुलांचे, भावांचे, आई-बापांचे गळे कापील अशी भीति नाहीं! लोक चैन करताहेत, मोटारी उडवताहेत शहराचा कंटाळा आला कीं रानावनांत जाऊन सृष्टीचं सौंदर्य मनमुराद पाहताहेत. पण इतकं झालं तरी माणसाचं असमाधान कांहीं नाहींसं होत नाहीं!"

हा सिद्धांत ओरडून सांगितल्याप्रमाणें त्यानं उच्चारला. परंतु नंतर एकदम ममतेचा उमाळा आल्याप्रमाणें तो आपल्या मुलाजवळ गेला व म्हणाला, "बाबा, असं करूं नकोस. मी असमाधानांत आहे, पण माझी गोष्ट सोडून दे. तूं माझा मुलगा आहेस. माझ्यापेक्षां अधिक शहाणा आहेस. तेव्हां असं करूं नकोस. सुखांत रहा. समाधानांत रहा. हें सांगत। सांगतां त्यानं दुकानाच्या मागील दाराकडे बोट दाखविलं. त्याचा छोटा मुलगा आज्ञाधारकपणानं बाहेर गेला. त्याची मुद्रा आता बदलली होती, शांत झाली होती. तो घरांत शिरला.

कांहीं वेळ आरा स्तब्ध राहिला, व त्यानं आपलं मन शांत करण्याचा प्रयत्न केला. मग मघापासून खोळंबून राहिलेल्या छोटया युलिसेसकडे त्याचं लक्ष गेलं. हंसत हंसत त्याच्याजवळ जाऊन त्यानं विचारलं, " बेटा युलिसेस, काय पाहिजे तुला ? "

युलिसेस म्हणाला, " पीठ हवं आहे. "

" पण कोणत्या तऱ्हेचं हवं ? "

युलिसेस म्हणाला, " पीठ हवं. "

" अरे पण दोन तऱ्हा असतात. एक लवकर शिजणारं, अन् दुसरं सावकाश शिजणारं. तुझ्या आईनं कोणतं आणायला सांगितलं ? ऑं ? "

युलिसेसनं क्षणभर विचार करून पाहिला, पण तो पुन्हा फक्त म्हणाला, " पीठ हवं... "

" अरे पण कोणती तऱ्हा देऊं ? "

पण युलिसेसला सांगतां येईना. तेव्हां आरानंच आपल्या मनानं ठरविलं आणि पिशवी तयार करून त्याच्या हातीं दिली.

इतकावेळ घट्ट मिटून ठेवलेली मूठ युलिसेसनं उघडली आणि पुढें धरली. आरानं त्याच्या तळहातावरचं नाणं घेतलं आणि मोड मोजून परत दिली.

युलिसेसनं पिशवी हातांत घेतली, आणि घरची वाट धरली. त्याचं मन आश्चर्यानं भरून गेलं होतं. जगांत काय काय प्रकार कशासाठीं चालतात याचा त्याला बोध होत नव्हता. आज सकाळपासून चमत्कारामागून चमत्कार घडले होते. प्रथम अलूबुखाराच्या झाडावरचा हल्ला त्यानं पाहिला होता, मग या दुकानांत तो गृहस्थ येऊन आपल्या पुतण्यासाठीं खजुराचे वाफोळे हवे म्हणाला होता, आणि अखेर हा दुकानदार आपल्या मुलाशीं कुठल्या चमत्कारिक भाषेंत किती वेळ तरी बोलत राहिला होता ! यांतली एकहि गोष्ट त्याला कळली नव्हती. परंतु जें जें पहावं त्यांत गंमत आहे एवढं मात्र त्याला वाटत होतं. त्यामुळें युलिसेस मनाशीं मोठ्या खुषींत होता. मध्येंच उजव्या पायावर लंगडी घातल्याप्रमाणें करीत तो आपल्या घराकडे धांवत सुटला.

# २२

होमरच्या आईनं स्वयंपाकघरांतल्या टेबलावर होमरची न्याहारी वाढून ठेवली व ती त्याची वाट पाहूं लागली. तितक्यांत होमर आलाच. तिनं त्याच्याकडे ओझरतीच नजर टाकली, पण तेवढ्यांत तिनं ओळखलं कीं रात्रींच्या त्या विचित्र अनुभवाचा परिणाम अजूनहि त्याच्या मनावर होताच. स्वप्नांत आपण रडलों हें त्याला माहीत असणं शक्य नव्हतं, पण दुःखाचा तीव्र आवेग ओसरून गेल्यावर ज्या प्रकारची स्तब्धता माणसाच्या मनावर येते ती होमरच्या ठिकाणीं स्पष्ट दिसत होती. त्याचा आवाजदेखील नेहमींपेक्षां हळू अन् गंभीर झाला होता. तो म्हणाला.

"इतक्या उशीरापर्यंत निजायचं नव्हतं मला. जवळ जवळ साडेनऊ झाले कीं. गजराचं घड्याळ कुठें गेलं ?"

त्याची आई म्हणाली, "तुला काम फार पडतं. विश्रांति पाहिजेच तुला."

होमर म्हणाला, "काम कांहीं इतकं पडत नाहीं" त्यानं डोळे मिटले अन् प्रार्थना म्हटली. नेहमींपेक्षां जरा जास्त वेळ म्हटली. मग त्यानं चमचा उचलला, व खायला प्रारंभ करण्यासाठीं तो पुढें वाकला. पण तो थांबला अन् वेड्यासारखा चमच्याकडेच निरखून पहात राहिला. कांहीं वेळानं पलीकडे त्याची आई भांडीं विसळीत होती तिच्याकडे बघून तो म्हणाला,

"आई !"

तोंड न फिरवितां तिनं विचारलं, "काय रे ?"

"काल रात्रीं मी परत आलों तेव्हां तुझ्याशीं कांहीं बोललों नाहीं. त्या दिवशीं तूं म्हणाली होतीस ना, तसं मला झालं होतं. कांहीं बोलूं नयेसं वाटत होतं. रात्रीं कामावरून घरीं परत येतानां वाटेंत एकदम मला रडूंच आलं. लहानपणीं माझ्या मनाविरुद्ध कांहीं झालं तरी मी रडत नसे. रडणं म्हणजे शरमेची गोष्ट आहे असं मला वाटे. आपला युलिसेससुद्धां कधीं रडत नाहीं. कारण–रडण्याचा कांहीं उपयोग नसतो. पण काल रात्रीं मला आवरेच ना.

अन् रडतांना शरमहि वाटली नाहीं मला. मात्र त्या स्थितींत घरीं यावसं वाटेना. म्हणून सायकलवर भटकत गेलों. आमच्या शाळेच्या बाजूला गेलों. वाटेनं एक बंगला लागला तिथें आधीं संध्याकाळीं मी एक तार नेऊन दिली होती तेव्हां खूप माणसं पार्टीसाठीं जमलीं होतीं, गाणं नाचणं चाललं होतं, रोषनाई केली होती; पण आतां त्या बंगल्यांत अंधार होता, भयाण शांतता होती. मी तार नेऊन दिली ती कसली होती तुझ्या लक्षांत आलं ना? अंधारांत अन् स्तब्धतेंत बुडालेल्या त्या बंगल्याकडे पाहून माझ्या काळजाचं पाणी झालं. मग साऱ्या गांवभर हिंडत सुटलों. रस्ते, घरं, माणसं, सगळ्या गोष्टींकडे बघत राहिलों. अन् मला वाटलं जसं कांहीं माझं हें गांव कसं आहे तें मला आज कळतं आहे, सगळ्या लोकांची खरी ओळख आज होते आहे. त्या साऱ्यांच्या विषयीं माझ्या मनांत एकदम करुणा आली. बिचाऱ्यांच्या वांटयाला दुःख येऊं नये म्हणून मीं प्रार्थना केली. मग माझं रडणं ओसरलं. माणूस मोठं झालं कीं कधीं रडत नाहीं अशी माझी कल्पना होती, पण उलटच दिसतं आहे. माणूस मोठं झालं म्हणजेच त्याला रडूं यायला लागतं. कारण जग कसं आहे तें त्याला कळूं लागतं." बोलतां बोलतां त्याचा आवाज अधिकच गंभीर झाला. "कळूं लागतं याचा अर्थ जगांत जिकडे तिकडे वाईटपणा अन् दुःख कसं भरलं आहे तें त्याला समजूं लागतं." आई कांहीं तरी बोलेल या अपेक्षेनं तो थोडा थांबला, पण ती बोलली नाहीं, किंवा हातांतलं काम सोडून तिनं त्याच्याकडे पाहिलंसुद्धां नाहीं. शेवटीं त्यानं विचारलं, "जगांत इतकं दुःख कां असावं?"

त्याच्याकडे वळून न पाहतां त्याची आई म्हणाली, "तुझं तुलाच पुढें कळेल. ही गोष्ट दुसऱ्यानं सांगायची नसते. ज्याची त्यानंच शिकायची असते. माणूस स्वतः अंतर्यामीं जसा असतो तशा त्याला जगांतल्या गोष्टी दिसतात. अमुक सुंदर आहे, अमुक गलिच्छ आहे, अमक्यांत सुख आहे, अमक्यांत दुःख आहे असं माणसं म्हणतात. पण खरं म्हणजे ती त्यांचीच करणी असते. जगाच्या बरेवाईटपणाचं बीज माणसाच्या अंतःकरणांत आहे. जगाचा बरेवाईटपणा वाढविण्याचं काम प्रत्येक मनुष्य करतो आहे. एखाद्या घरांतलीं माणसं बदलावीं, जुन्यांनीं नव्यांच्या हवालीं तें घर करावं, त्या त्या माणसांच्या

वागणुकीनं घरांत फरक व्हावा, तसं जगाचं आहे. आपले गुण अगर अवगुण त्यांत घालून प्रत्येक माणूस तें दुसऱ्यांच्या हवालीं करतो आहे..." बोलतां बोलतां ती सैंपाकघरांतून मागील दारांत गेली.

पण ती दूर गेली तरी होमर तिच्याशीं बोलत राहिला. तो म्हणाला, "काल रात्रीं मला इतकं रडूं कां यावं मला समजत नाहीं. माझ्या मनाची अशी स्थिति पूर्वी कधींच झाली नव्हती. असं कां व्हावं? रडण्याचा आवेग ओसरून गेल्यावरसुद्धां कुणाशीं बोलायला नको असं मला कां वाटावं? मला मुळीं तुझ्याशीं कांहीं बोलायला सुचेच ना! असं कां?"

त्याची आई दूर होती ती दूरच राहिली, पण आपला प्रत्येक शब्द होमरला अगदीं स्पष्ट कळावा अशा प्रकारें ती बोलूं लागली. ती म्हणाली, "तुझ्या मनांत उत्पन्न झालेली करुणा तुला आवरेना म्हणून तुला रडूं आलं. करुणा म्हणजे अमुक एका व्यक्तीच्या दुःखाबद्दल नव्हे, तर जगांत असं इतकं दुःख असावं याबद्दल. ज्याचं अंतःकरण जगांतलं दुःख दिसलं कीं कळवळत नाहीं तो मनुष्यच नव्हे. हा कळवळा, ही करुणा म्हणजेच माणसांचा दुःखदाह कमी करणारा थंड लेप आहे. ज्यांना अंतःकरण आहे त्याच माणसांना रडूं येतं. लोकांचं दुःख पाहून ज्याला कधीं रडूं आलं नाहीं त्या माणसाचं मन माती इतक्यासुद्धां मोलाचं नाहीं, कारण माती झाली तरी तिच्यांतसुद्धां बीं पडलं तर तें वाया जात नाहीं, त्याचं रोप होतं, तें वाढतं, त्याला पानं, फुलं, फळं येतात. ज्याला करुणेचा कधीं स्पर्श झाला नाहीं तें अंतःकरण मात्र अगदीं वांझोटं असतं. त्यांतून कांहीं निर्माण होऊं शकत नाहीं. झालाच तर दुरभिमान तेवढा पैदा होतो. अन् तो दुरभिमान माणसाच्या हातून काय घडवितो? तर हत्या! या जगांत जें जें सात्विक आहे त्याची हत्या! प्रत्यक्ष माणसांचीदेखील हत्या!"

हें बोलतां बोलतां त्याची आई परत सैंपाकघरांत आली अन् काम करूं लागली. तें काम कांहीं करायलाच हवं होतं असं नव्हतं हें होमरला स्पष्ट दिसत होतं. तरी ती तें करूं लागली, व होमरकडे न पाहतां पुढें बोलूं लागली,

"ज्यांत दुःख नाहीं असं जगांत कांहीं नाहीं. प्रत्येक गोष्टींत दुःख आहे. मात्र हें माहीत झालं तरी माणसानं निराश होऊं नये. जीं चांगलीं माणसं असतात तीं दुःख नष्ट करण्यासाठीं झटतात. जीं मूर्ख असतात त्यांना स्वतःचं तेवढं दुःख दिसतं, इतरांचं दिसत नाहीं. अन् जीं दुष्ट असतात तीं जिकडे जातील तिकडे दुःख पसरवितात. पण त्यांत त्यांचा अपराध नाहीं. कारण सज्जनांप्रमाणेंच मूर्ख व दुष्ट माणसं जगांत येतात तीं कांहीं कुठून आभाळांतून पडून नव्हे, तर शेंकडो पिढ्यांच्या संचिताचं फळ म्हणूनच जन्म पावतात. आपण दुष्ट आहोंत हें दुष्ट माणसाला कळत नसतं. तेव्हां त्याला अपराधी समजण्यांत अर्थ नाहीं. दुष्टाच्या दुष्टपणाचा अंश इतर सर्वांच्या ठिकाणीं थोडाफार असतोच, अन् इतरांच्या गुणांचा अंश दुष्टाच्या ठिकाणीं कमीअधिक प्रमाणांत असतोच. हें ध्यानांत ठेवून दुष्टांविषयीं आपण क्षमाशील असलं पाहिजे. त्यांच्यावर देखील प्रेम केलं पाहिजे. ते आपलेच आहेत. सगळ्यांचं मिळून एक मानवी जीवित बनलेलं आहे. कुणी कुणापासून पूर्ण विभक्त असूं शकत नाहीं. गरीबांतला गरीब शेतकरी परमेश्वराची प्रार्थना करतो त्यांत माझा भाग आहे; खुनी माणसाच्या कृत्यांतहि माझा भाग आहे...या साऱ्या गोष्टी तुला कळायला लागल्या म्हणून तूं काल रात्रीं तसा रडलास..."

होमरचं मन एकदम शांत झालं. मघाशीं त्याची अन्नावर वासना नव्हती. पण आतां त्याला खावंसं वाटलं. त्यानं आपल्या पुढच्या बशींत दूध ओतून घेतलं व न्याहारीला प्रारंभ केला.

## २३

युलिसेस व त्याचा सगळ्यांत प्यारा दोस्त लायनेल, दोघे सैंपाकघरांत आले. लायनेल युलिसेसहून सहा वर्षांनीं मोठा होता, पण त्यांची अगदीं भलतीच दोस्ती होती हें दोघांकडे नुसतं पाहिल्याबरोबर कुणालाहि उघड दिसण्यासारखं

होतं. ते ज्या तऱ्हेनें एकत्र चालत, उभे राहात, तिच्यांत अगदीं गाढ स्नेह काठोकाठ भरलेला दिसे. त्यांना एकमेकाशीं बोलण्याची गरज वाटत नसे. शब्दांच्या साहाय्यावांचून त्यांचा स्नेह सहज प्रगट होत असे, इतका तो अकृत्रिम अन् दृढ होता.

लायनेल म्हणाला, " होमरची आई, मी परवानगी विचारायला आलों. युलिसेसला घेऊन जाऊं का मी आपल्याबरोबर लायब्ररींत? माझी बहीण लिलियन् आहे ना? तिचं एक पुस्तक परत करायचं आहे लायब्ररींत."

होमरची आई म्हणाली, " बरं, जा. पण काय रे, ऑगी, ऑल्फ, शॅग यांच्या टोळक्यांत कां नाहींस तूं?"

" आम्हांला त्यांनीं—" लायनेल सांगूं लागला, पण तेवढंच बोलून तो थांबला. तो गोंधळून गेल्यासारखा दिसला. क्षणभर थांबल्यावर तो पुन्हां म्हणाला, " त्यांनीं आम्हांला—म्हणजे मला घालवून दिलं. त्यांना मी आवडत नाहीं. त्यांना वाटतं मी खुळा आहे. होमरची आई, मी खुळा आहे होय?"

" छे. छे लायनेल. कोण म्हणतं तूं खुळा आहेस म्हणून? फार शहाणा आहेस तूं. फार चांगला आहेस. पण इतर मुलंहि चांगलीं आहेत, शहाणीं आहेत. त्यांच्यावर तूं रागावूं नकोस, अं!"

लायनेल म्हणाला, " छे, मी कशाला रागावूं. त्यांच्यावर? तीं सगळीं मला आवडतात. पण खेळतांना माझं जरा कांहीं चुकलं कीं तीं मला हांकून देतात. शिव्यासुद्धां देतात. थोडीशी चूक झाली माझ्या हातून कीं माझ्यावर संतापतात, अन् म्हणतात " बास बास लायनेल." त्यांनीं असं म्हटलं कीं, मी निघून जावं अशी त्यांची इच्छा आहे हें मी ओळखतों. कधीं कधीं पांच मिनिटं देखील ते मला खेळूं देत नाहींत. अगदीं सुरवातीलाच माझ्याकडून कांहीं तरी चुकतं अन् मग ओरडतात " हूं बास बास लायनेल." माझी काय चूक झाली तें देखील माझ्या लक्षांत येत नाहीं. तें त्यांनीं मला सांगावं अशी माझी इच्छा असते परंतु कधीं सांगतील तर शपथ. नुसतं आपलं " बास बास लायनेल" म्हणून ओरडायचं म्हणजे काय? केव्हांहि त्यांच्यांत मिसळायचा मी प्रयत्न केला कीं सारींजणं अशीं वागतात. एकटा युलिसेसच काय तो मला सोडून

जात नाहीं. माझा ज़िवलग मित्र असा युलिसेस तेवढाच आहे. बाकीचीं तीं मुलं आज माझ्याशीं अशीं वागतात खरीं, पण पुढें त्यांनाच पश्चात्तापाची वेळ येणार आहे. एक दिवस खात्रीनं असा येईल कीं त्यांना माझ्याकडे येऊन म्हणावं लागेल, "लायनेल आम्हाला एवढी मदत कर कीं." अशा प्रकारें ते माझ्याकडे आले कीं मी त्यांना मदत करणार आहे बरं का, होमरची आई. मग मात्र त्यांना वाटेल कीं, अरेरे लायनेलशीं आपण पूर्वी वाईट वागलों तें बरं केलं नाहीं. होमरची आई, मला थोडं पाणी देतां कां प्यायला ?"

"हो हो !" असं म्हणून होमरच्या आईनं पाण्याचा ग्लास भरून त्याच्यापुढें केला. लहान मुलांना पाणी म्हणजे जगांतलं सगळ्यांत अद्भूत पेय वाटत असतं, व तें तीं आधाशीपणानं पिऊं लागलीं कीं कांहीं एक विवक्षित गमतीदार आवाज तीं करीत असतात. तसा आवाज करीत लायनेल ग्लासांतलं पाणी घटाघट पिऊं लागला. त्यानं युलिसेसकडे पाहून त्याला विचारलं, "युलि-सेस, तुला नको का रे पाणी ?"

हवं अशा अर्थी युलिसेसनं मान डोलवली, व त्याच्या आईनं त्याला एक ग्लास भरून दिला. त्याचं पिणं झाल्यावर लायनेल म्हणाला, "होमरची आई आतां आम्हीं जातों हं लायब्ररींत." तो आणि युलिसेस मिळून गेले.

न्याहारी करतां करतां होमर हें सारं पहात होता. त्यानं आईला विचारलं, "मार्कस् लहानपणीं युलिसेससारखाच होता का ग आई ?"

"म्हणजे, कसं म्हणतोस ?"

"म्हणजे, असं आपल्या, युलिसेसचं तूं पहातेसच, प्रत्येक गोष्टींत त्याला गोडी आहे, ज्याच्या त्याच्याकडे तो अगदीं निरखून पहात असतो. तोंडावाटे शब्द काढीत नाहीं, परंतु ज्या त्या गोष्टींतून आनंद घेण्याची त्याची वृत्ति असते. त्याला सगळीजणं आवडतात, सगळ्यांना तो आवडतो. त्याला किती थोडे शब्द येतात. वाचतां तर मुळींच येत नाहीं. परंतु त्यानं जरी तोंड उघडलं नाहीं तरी त्याला म्हणायचं आहे तें आपल्याला कळतं. मार्कस् लहानपणीं असाच होता का ग ?"

“ अरे, ते दोघे भाऊ, एक दुसऱ्यासारखा असायचाच. पण ते कांहीं अगदीं हुबेहुब एकमेकांसारखे नाहींत. ”

होमर म्हणाला, “ आपला युलिसेस कुणी तरी मोठा होणार खास बरं का आई ! ”

त्याच्या आईनं मान हलविली व म्हटलं, “ अंहं, मला नाहीं तसं वाटत. म्हणजे ज्या अर्थानं तूं म्हणतोस त्या लौकिक अर्थानं युलिसेस मोठा होईलच असं मी नाहीं म्हणणार. परंतु तो अर्थ सोडला तर मात्र युलिसेस आजच मोठा आहे. ”

“ मार्कससुद्धां लहानपणीं असाच मोठा असेल नाहीं का ? ”

“ हो. तुझ्यांत आणि मार्कसमध्यें पुष्कळ साम्य आहे, परंतु फरकहि पुष्कळ बाबतींत आहे. तुझ्या ठिकाणीं अस्वस्थता, धडपड आहे, मार्कस कांहींसा एकलकोंडा होता. लोकांत मिसळणं त्याला फारसं आवडत नसे. तो एकटाच बसून वाचीत असे, किंवा गाणं ऐकत असे, कधीं कधीं नुसता स्तब्ध बसून राहत असे, किंवा खूप दूर दूर फिरावयाला जात असे...... ”

होमर म्हणाला, “ युलिसेसचं मार्कस्‌वर फार प्रेम आहे. ”

“ त्याचं सगळ्यांवर प्रेम आहे. प्रत्येक माणूस याला आवडतं. ”

“ तें खरं, परंतु मार्कस्‌वर त्याची विशेष भक्ति आहे, आणि ती कां असावी तेंहि मी सांगूं शकतें. मार्कस् वयानं मोठा झाला आहे, सैन्यांत गेला आहे, परंतु त्याचा स्वभाव एखाद्या लहान मुलासारखाच आहे. मला वाटतं, जी जी व्यक्ति भेटेल तिच्यांत मुलपणा किती आहे तें लहान मुलं पाहात असतात, आणि ज्या मोठ्या माणसांत मूलपणा त्याला विशेष आढळेल त्याच्यावर त्यांचं एकदम प्रेम जडतं. पुन्हां लहान व्हावं आणि युलिसेस ज्या रीतीनं वाढतो आहे त्या रीतीनं वाढावं असं माझ्या मनांत कितीदां तरी येतं. आपल्या कुटुंबांतल्या माणसांची गोष्ट सोडली तर युलिसेसइतकं दुसरं कुणींच मला आवडत नाहीं. ”

" तो आपल्या वडिलांच्या वळणावर गेला आहे."

होमरनं एकदम विचारलं, " त्यांना तूं लहानपणीं पाहिलं होतंस का ?"

" वा रे शहाण्या. मी कशी पाहीन ? तुझे वडील माझ्यापेक्षां सात वर्षांनीं मोठे होते ना. परंतु ते मला जसे प्रथम वाटले तसेच जन्मभर राहिले; आणि आपला छोटा युलिसेस अगदीं त्यांच्यासारखा आहे." बोलतां बोलतां होमरच्या आईचं हृदय एकदम आनंदानं भरून आलं. तिनं आजपर्यंत जें दुःख सोसलं अगर पुढें जें तिच्या वाट्याला येणार होतं त्याचा आणि या आनंदाचा जणूं कांहीं संबंध नव्हता. ती सुखाचा निःश्वास सोडीत म्हणाली, " माझं भाग्य मोठं म्हणून माझ्या वांट्याला इतका सुखाचा संसार आला. परमेश्वराला मी धन्यवाद दिले पाहिजेत. माझीं मुलं नुसतींच मुलं नाहींत तर त्यांच्या ठिकाणीं माणुसकी आहे. काल रात्रीं तूं रडलास याचं कारण तुझ्या ठिकाणीं माणुसकी आहे, जगण्याचं साहस करण्यांत जो आनंद आहे तो तुला कळूं लागला आहे. तुला हें समजूं लागलें आहे, कीं कोट्यावधि लोकांत आपल्याला रहायचं आहे, जगांत सज्जन आहेत त्याप्रमाणें दुष्ट लोक आहेत, उदार अंतःकरणाचीं माणसं आहेत त्याप्रमाणेंच क्षुद्र मनाचींहि आहेत, आयुष्यांत सौंदर्याचा भाग आहे त्याप्रमाणेंच गलिच्छ घाणेरड्या गोष्टीहि आहेत, परंतु ज्याला आपण संसार म्हणतों, माणसाचं आयुष्य म्हणतों, तें या सर्व गोष्टींचं मिळून बनलेलं आहे." क्षणभर थांबून तिनं होमरकडे पाहिलं व मग अगदीं हलक्या आवाजांत ती म्हणाली, " या साऱ्या गोष्टी तुला समजूं लागल्या म्हणून काल घरीं परत येतांना रडूं आलं. झोंपेंत देखील रडलास."

" असं ?" आपण झोंपेंत रडलों व आपल्याला कळलं नाहीं याचं होमरला फार आश्चर्य वाटलं.

" होय, तुझ्या रडण्यामुळें युलिसेस जागा झाला व त्यानं माझ्याकडे येऊन मला उठवलं. मला तुझं रडणं ऐकूं आलं, परंतु मला ठाऊक होतं कीं जो रडतो आहे तो कांहीं होमर नव्हे."

" म्हणजे काय ?"

त्याची आई म्हणाली, " तें रडणं माझ्या परिचयाचं आहे. पूर्वी ऐकलं आहे मी तें. तें रडणं कोणा एका व्यक्तीचं नसून साऱ्या जगाचं रडणं आहे. दुनियेंतलं दुःख तुला कळूं लागलं आहे. याचाच अर्थ असा, कीं तूं आतां आपल्या आयुष्याची वाट चालूं लागला आहेस. तुझ्या हातून पुष्कळ चुका व्हायच्या आहेत. त्या तुला टाळतां यायच्या नाहींत. तुझ्या हातून त्या घडल्याच पाहिजेत. एकांतांत, अंधारांत ज्या गोष्टी सांगायला लोक कचरतील त्या मी तुला दिवसा उजेडीं न्याहारीच्या वेळेस सांगतें आहे. कारण काल रात्रींच्या रडण्यानं तुझं अंतःकरण स्वच्छ झालेलं आहे, आणि या गोष्टी तुला एकदां केव्हां तरी सांगितल्याच पाहिजेत अशा आहेत. पुढच्या आयुष्यांत ज्या चुका तुझ्या हातून होतील त्या कशाहि प्रकारच्या असोत, त्यामुळें तूं बिचकून जाऊं नकोस, किंवा आपल्या हातून अशाच आणखी चुका होत राहतील काय अशा शंकेनं धीर सोडूं नकोस. तुझं अंतःकरण शुद्ध आहे. त्यावर श्रद्धा ठेव. अंतःकरणाला जें पटेल ते नेहमीं करीत जा. वाटेंत थांबूं नकोस, थबकूं नकोस. तुला कुणी फसविल्या-मुळें, अगर तुझ्या स्वतःच्या अज्ञानामुळें तुला अपशय आलं तरी गोंधळून जाऊं नकोस. जीविताच्या मार्गानं जातांना तूं पुष्कळदां ठेंचकाळशील, पडशील, पण तसं झालं तरी निराश होऊं नकोस, उठायचं अन् चालायला लागायचं हें धोरण ठेव. अशा प्रकारें वागलास म्हणजे तुझ्या वांट्याला दुःखाबरोबर सुखहि येईल. तुला पुष्कळदां रडावं लागेल; परंतु पुष्कळदां हंसताहि येईल. क्षुद्रपणानं वागण्याचं तुझ्या मनांत कधीं येणार नाहीं. तुझी वाटचाल अशी वेगाची असेल, कीं मत्सर, असूया, क्षुद्र बुद्धि इत्यादि गोष्टींकडे तुझं मन वळणारच नाहीं. तुझ्या नजरेचा पल्ला इतका मोठा राहील, कीं या गोष्टी तुला कधीं सुचायच्याच नाहींत."

होमरची आई किंचित् हंसली व ती त्याच्याजवळ येऊन उभी राहिली. तिचं मन थोडसं भांबावल्यासारखं झालं असावं. ती म्हणाली, " तुला वाटेल रात्रंदिवस जेव्हां जेव्हां म्हणून संधि मिळेल तेव्हां तेव्हां आपली आई अशी काय व्याख्यानं झोडते. परंतु हा उपदेश केल्यावांचून माझ्याच्यानं राहवत नाहीं. तेव्हां माफ कर."

"आई!" येवढाच उद्गार होमरच्या तोंडून निघाला. तो आपल्या जागेवरून उठला व लंगडत खिडकीपाशीं गेला. त्यानं बाहेर पाहिलं तों समोरच्या बखळींत ऑगी अन् त्याचे दोस्त फुटबॉल खेळण्यांत दंग झाले होते.

"तुझ्या पायाला काय झालं आहे?"

"कांहीं नाहीं. थोडासा पडलों येवढंच!" आईकडे वळून न पहातां तो पुढें म्हणाला, "आई, तुझ्यासारखी स्त्री खरंच जगांत कुठें नसेल." तितक्यांत तो मोठ्यांदा हंसूं लागला व म्हणाला, "आई, पाहिलंस का ऑगीची स्वारी खेळतां खेळतां जमिनीवर कशी लोटांगण घालून राहिली आहे!... आतां मला कधीं असं खेळायला मिळायचं नाहीं. तार ऑफीसांत जायला हवं मला. जातों हं." तो निघाला, परंतु पुन्हां थांबून म्हणाला, "खरंच आई, तुला सांगायचं राहिलंच कीं बेसबरोबर तूं फराळाचं पाठविलं होतंस ना, त्यांतलं आमच्या ऑफीसांतल्या ग्रॅगननं थोडं खाल्लं अन् त्यानं तुझे आभार मानण्याबद्दल मला बजावलं होतं. त्यानं तुझे फार आभार मानले."

तो गेला. सायकलीच्या चाकांत पुरेशी हवा आहे कीं नाहीं तें पहाण्यासाठीं त्यानं सायकल आपटून पाहिली, आणि मग सायकलीवर टांग मारून तो वेगानं निघाला. त्याची आई त्याच्याकडे बघत राहिली. थोड्या वेळानं ती परत फिरली आणि ज्या खुर्चीवर होमर न्याहारी करीत बसला होता त्या खुर्चीजवळ येऊन ती उभी राहिली.

त्या ठिकाणीं होमरचे वडील बसलेले तिला दिसले, होमरनं ज्याप्रमाणें हातांतल्या चमच्याकडे निरखून पाहिलं होतं त्याप्रमाणेंच तेहि पाहात होते. त्यांनीं नजर वर केली व म्हटलं,

"केटी?"

"काय?"

"केटी, मार्कस माझ्याकडे येणार आहे."

तें ऐकतांच ती क्षणभर अगदीं स्तब्ध झाली. मग ती हलकेच म्हणाली, "तें मला माहीत आहे." आणि तेथून दूर होऊन ती पुन्हा आपल्या कामाला लागली.

# २४

लायनेल आणि युलिसेस, जीवाभावाचे दोस्त, हातांत हात घालून वाचन-मंदिराकडे निघाले होते. वाटेंत चर्चमधून एक स्मशानयात्रा निघालेली त्यांना दिसली. प्रेताची पेटी बाहेर उभ्या असलेल्या गाडीकडे लोक उचलून नेत होते, आणि दुखवटा करणारीं माणसं मागोमाग चाललीं होतीं.

लायनेल म्हणाला, " युलिसेस चल चल. प्रेतयात्रा निघाली आहे. कुणी तरी मेलंय् वाटतं. " त्यानं युलिसेसला हात धरून ओढलं, व लौकरच ते दोघे त्या लहानशा गर्दीच्या अगदीं मध्यभागीं जाऊन पोहोंचले.

लायनेल अगदीं हलक्या आवाजांत म्हणाला, " ती पेटी. दिसली का तुला ? कोणी तरी मेलं आहे. त्याला त्या पेटींत घातलं आहे बरं कां ? कोण मेलं आहे तें कळेल तर बरं होईल. तीं फुलं पाहिलीस कां ? माणसं मेलीं कीं मग त्यांना फुलं वाहतात. ते लोक रडताहेत बघ. त्यांचीं आणि जो मेला त्याची ओळख असली पाहिजे. "

रडण्याच्या कामांत त्यांतल्यात्यांत जो एक मनुष्य कमी गुंतलेला दिसला त्याच्याकडे लायनेल वळला, व त्यानं विचारलं, " कोण मेलं हो ? "

त्या इसमानं नुकतंच आपलं नाक शिंकरलं होतं. डोळ्यांच्या कडांना हातरुमाल लावीत त्यानं उत्तर दिलं, " जॉनी मेरीवेदर ! कुबडा ! मेला बिचारा."

युलिसेसकडे वळून लायनेल म्हणाला, " ऐकलंस ना. जॉनी मेरीवेदर. कुबडा. मेला बिचारा. "

नाकडोळे पुसणारा तो इसम म्हणाला, "सत्तर वर्षांचा म्हातारा होता. "

लायनेल युलिसेसला म्हणाला, " सत्तर वर्षांचा म्हातारा होता. "

रडणाऱ्या इसमानं सांगितलं, " त्या पलिकडच्या कोपऱ्यावर तीस वर्षं दुकान होतं त्याचं. "

लायनेल युलिसेसला सांगूं लागला, " त्या पलिकडच्या कोपऱ्यावर–" पण तितक्यांत तो एकदम थांबला. त्या रडणाऱ्या माणसाकडे त्यानं पाहिलं व जवळ जवळ ओरडून तो म्हणाला, " म्हणजे त्या दुकानावरचा माणूस म्हणतां ? "

" होय ना. जॉनी मेरीवेदर. अखेरची झोंप घेतली बिचाऱ्यानं !"

लायनेल ओरडला, " त्याची माझी ओळख होती. त्याच्या दुकानांत मी पुष्कळदां गेलेलों आहे. तो मेला म्हणतां ?"

" होय. सुखाचं मरण आलं बिचाऱ्याला. झोंपेंतच आटपला कारभार. ज्यानं त्याला निर्माण केलं त्याच्याकडे तो परत गेला. "

आतां लायनेल रडण्याच्या बेतांत होता. तो म्हणाला, "त्याला मी चांगला ओळखीत होतों. त्याचं नांव मला माहीत नव्हतं. पण माझ्या ओळखीचा होता तो. " त्यानं युलिसेसच्या गळ्यांत हात घातला व हुंदके देत म्हटलं, " अरेरे बिचारा जॉनी. देवाकडे गेला. माझा एक चांगल्यांपैकीं दोस्त आज कायमचा नाहींसा झाला म्हणायचा !" तेवढ्यांत प्रेताची गाडी चालूं झाली आणि थोड्याच वेळांत चर्चपुढें लायनेल आणि युलिसेस हे दोघेच उरले. आपल्या ओळखीचा एक माणूस मेल्याची बातमी ज्या ठिकाणीं कळली तिथून एकदम दूर होणं बरं नव्हे असं लायनेलला वाटत होतं. त्याचा पाय कांहीं तिथून निघेना. परंतु जो माणूस मेला त्याच्या दुकानांतून त्यानं पुष्कळदां माल खरेदी केला हें खरं असलं तरी चर्चपुढें कायमचं उभं राहणं कांहीं शक्य नव्हतं असा शेवटीं विचार करून युलिसेसचं बोट धरून लायनेल तेथून निघाला. जॉनीच्या दुकानांत आपण केव्हां केव्हां कोणत्या कोणत्या वस्तू खरेदी केल्या त्याच्या आठवणी त्याच्या मनांत येत होत्या. पुष्कळदां खाण्याचे पदार्थ त्यानं जॉनीच्या दुकानांत घेतले होते, त्याची चव देखील त्याला आतां आठवूं लागली.

वाचनमंदिराची इमारत लहानशीच परंतु रुबाबदार होती. तिच्यांत प्रवेश करतांच लायनेल व युलिसेस या दोघांना वाटलं, कीं आपण कुठल्यातरी एका चमत्कारिक स्थळीं आलों आहोंत. कारण त्या ठिकाणीं इतकी विलक्षण स्तब्धता होती कीं एकाद्याला त्याची भीतिच वाटावी. खुर्च्या, टेबलं, इमारतीच्या भिंती, सगळ्या वस्तू कसल्या तरी जादूनं निःशब्द झालेल्या होत्या, गाढ शांततेचं आवरण सगळीकडे पसरलं होतं. म्हातारे पुरुष वर्तमानपत्रं वाचीत होते, स्वतःला तत्त्वज्ञानी समजणारे दहा पांच लोक लठ्ठ लठ्ठ पुस्तकांत डोकं खुपसून बसले होते, हायस्कूलमधील विद्यार्थी आणि विद्यार्थिनी आपापल्या विषयांतलं

संशोधन करण्यासाठीं पुस्तकं उघडून बसल्या होत्या, परंतु कुणाच्या तोंडून शब्द निघेल तर शपथ. सगळ्यांचा व्यवहार अगदीं गुपचुप चालला होता. कारण सारेजण ज्ञानाच्या शोधांत होते! ग्रंथांच्या सन्निध होते! लायनेल बोलेनासा तर झालाच, परंतु पावलं देखील टांचा उचलून पुढच्या बोटांवर टाकीत तो चालूं लागला. वाचण्यांत गढलेल्या लोकांना त्रास होऊं नये म्हणून नव्हे तर ग्रंथाचा आदर राखला पाहिजे म्हणून असं वागणं अवश्य आहे असं त्याला वाटलं. त्याचं पाहून युलिसेसहि टांचा उचलून चवडयावर चालूं लागला. लायनेलचं लक्ष पुस्तकांकडे होतं, आणि युलिसेसचं माणसांकडे होतं. परंतु दोघांनाहि वाटत होतं, कीं एखादा अद्‌भुत खजिना आपण पहात आहोंत. लायनेल पुस्तकं वाचीत नसे, किंवा स्वतःसाठीं पुस्तकं नेण्याकरितां तो तिथें आलाहि नव्हता. परंतु जिकडे तिकडे कपाटाकपाटांतून पुस्तकंच पुस्तकं भरलेलीं त्याला दिसलीं तीं पाहून त्याला विलक्षण हर्ष झाला. त्याकडे किती पाहूं अन् किती नको असं त्याला झालं. पुस्तकांच्या रांगांकडे बोट दाखवीत तो युलिसेसच्या कानांत कुजबुजला, "पाहिलींस ना. हीं सारीं पुस्तकं बरं का! हें तांबडया पुठ्ठयाचं, तें हिरव्या पुठ्ठयाचं, हीं सारीं पुस्तकं!"

ग्रंथालयावर देखरेख ठेवणाऱ्या म्हाताऱ्या मिसेस गॅलॅघरचं लक्ष या दोन मुलांकडे गेलं तेव्हां ती उठून त्यांच्याकडे आली. "बाळ, तुला काय हवं आहे?" असं तिनं विचारलं. तें हलक्या आवाजांत नव्हे, तर अगदीं मोठ्यांदा. इतक्या मोठ्यांदा कीं ती जणूं वाचनमंदिरांत नव्हे तर बाहेर रस्त्यावर उभी होती. तिचा आवाज ऐकून वाचणाऱ्यांपैकीं कांहीं लोकांनीं पुस्तकांतून माना वर केल्या. लायनेलला तर आश्चर्याचा धक्काच बसला, अगदीं हलक्या आवाजांत त्यानं तिच्या प्रश्नाला उत्तर दिलं,

"पुस्तक—"

"कोणतीं पुस्तकं हवींत?"

"इथें आहेत तेवढीं सगळीं."

"सगळीं? काय, म्हणतोस काय? एका वेळेस चार पुस्तकांपेक्षां जास्ती घरीं नेतां येत नाहींत"

लायनेल म्हणाला, " पण मला मुळीं घरीं न्यायचींच नाहींत. "

" पण मग तुला हवींत म्हणजे कशाला हवींत ? "

" मला नुसतं त्यांच्याकडे पोटभर बघायचं आहे. "

" बघायचं आहे ? लायब्ररी पुस्तकांकडे बघायसाठीं नाहीं, ती वाचण्या-साठीं आहे. पुस्तकांतलीं चित्रं पाह्यचीं आहेत असं एखाद्यानं म्हटलं तर तें ठीक आहे. परंतु पुस्तकांकडे नुसतं बघत रहायचं म्हणतोस तूं, हें काय "

" आम्हाला बघत राहवंसं वाटलं तर बघूं नये कीं काय ? "

ती वृद्ध स्त्री हंसली व म्हणाली " बघूं नये असा कांहीं कायदा नाहीं. " तितक्यांत तिचं लक्ष युलिसेसकडं गेलं व तिनं विचारलं, " अन् हें कोण ? "

" हा युलिसेस. याला वाचतां नाहीं येत. "

" तुला येतं का ? "

" नाहीं. अन् यालाहि येत नाहीं. म्हणूनच आमची दोघांची दोस्ती आहे. ज्याला वाचतां येत नाहीं असं दुसरं कुणीच माझ्या ओळखीचं नाहीं. "

ती वृद्ध स्त्री क्षणभर त्या दोघां दोस्तांकडे पहात राहिली. ' बरेच विद्वान आहांत म्हणायचे ' अशा शब्दांनीं जणूं तिनं त्या दोघांचा मनांतल्या मनांत प्रेमानं धिःकार केला. तिनं त्या ग्रंथालयांत कित्येक वर्षं काढलीं होतीं, परंतु अशा गंमतीदार व्यक्ती तिच्या पाहण्यांत प्रथमच येत होत्या. शेवटीं ती म्हणाली, " छान छान. तुम्हां दोघांनाहि वाचतां येत नाहीं म्हणायचं. बाकी येत नाहीं तर बिघडलं नाहीं. मला वाचतां येतं आहे. आज साठ वर्षं झालीं मी सारखी ग्रंथ वाचतें आहे. परंतु त्यांपासून माझा कांहीं फायदा झाला असेल असं मला नाहीं वाटत. बरं जा आतां. पुस्तकं पाह्यचीं आहेत ना तुम्हाला ? बघा, बघा. "

ते दोघे दोस्त दालनादालनांतून हिंडूं लागले. एखादं रहस्य उकलण्या-साठीं आपण कांहीं तरी साहस करीत आहोंत अशी त्यांच्या मनाची भावना होती. जिकडे तिकडे पुस्तकंच पुस्तकं त्यांना दिसत होतीं. लायनेल पुनः पुन्हा हात दाखवून युलिसेसच्या कानांत म्हणत होता, " बघ बघ ! हीं इकडे पुस्तकं. तीं तिकडे पुस्तकं ! " क्षणभर तो आपल्या मनाशीं विचार करीत गप्प राहिला,

व मग म्हणाला, " या इतक्या पुस्तकांत काय लिहिलेलं असेल देव जाणे !... आणि युलिसेस, हें पुस्तक पाहिलंस काय ? कसं गवतासारखं हिरवंगार आहे, बघ. फार सुंदर आहे, नाहीं ? "

आपण कांहीं तरी भलतंच करीत आहोंत या जाणिवेनं भीतभीत त्यानं तें पुस्तक काढून हातांत धरलं, व तें उघडून तो एकदम आनंदानं म्हणाला,

" पाहिलंस युलिसेस, पुस्तक असं असतं बरं ! इथं कांहीं तरी लिहिलं आहे बघ. हें ' ए ' अक्षर आहे खास. शंकाच नको. आणखी हें दुसरं कांहीं तरी अक्षर आहे. मला तें ओळखतां येत नाहीं. प्रत्येक अक्षर निराळं अन् प्रत्येक शब्द निराळा. " त्यानं एक निःश्वास सोडला, आणि भोंवतालच्या पुस्तकांच्या रांगांकडे दृष्टि टाकून तो म्हणाला, " मला कधीं वाचतां येईल असं नाहीं मला वाटत. परंतु या इतक्या पुस्तकांत जें कांहीं लिहिलं आहे तें मला समजेल तर किती छान होईल. अरे, या पुस्तकांत चित्र आहे बरं कां. एका मुलीचं आहे. किती देखणी आहे, नाहीं. त्यानं मग त्या पुस्तकाचीं पानं भरकन् उलटलीं व म्हटलं, " बघितलंस ना ! पुस्तक संपेपर्यंत अक्षरंच अक्षरं अन् शब्दच शब्द ! युलिसेस, लायब्ररी म्हणजे काय कळलं ना तुला ? इथें जिकडे तिकडे पुस्तकं रचलेलीं असतात. " हातांतल्या पुस्तकांतील छापील मजकुराकडे त्यानं मोठ्या आदरानं नजर लावली, व जणूं वाचल्याप्रमाणें तो स्वतःशीं कांहीं वेळ पुटपुटत राहिला. अखेर मान हालवून तो म्हणाला, " युलिसेस, पुस्तकांत काय लिहिलं आहे तें कळून घ्यायचं असेल तर वाचतां आलं पाहिजे. आणि मला तर वाचतां येत नाहीं. "

मग त्यानं अगदीं सावकाश तें पुस्तक मिटून जागच्या जागीं ठेवलं, व टांचा न टेकतां पावलं टाकीत ते दोघे दोस्त वाचनमंदिरांतून बाहेर पडले. युलिसेस लंगडी घालत चालूं लागला. त्याला आज किती तरी नवीन गोष्टी दिसल्या होत्या ! समजल्या होत्या ! तो विलक्षण खुषींत होता !

# २५

लायनेल व युलिसेस वाचनमंदिरांतून बाहेर पडले ते रमत गमत हें पहा तें पहा असं करीत निघाले. सूर्यास्ताचा सुमार झाला तेव्हां या दोन स्वाऱ्या एका औषधी दुकानापुढें जमलेल्या लहानशा घोळक्याच्या अग्रभागीं उभ्या होत्या, व दुकानाच्या खिडकींतल्या एका गमतीकडे पाहण्यांत दंग झाल्या होत्या. खिडकींत एक माणूस उभा होता. तो माणूस होता याबद्दल शंकाच नव्हती. परंतु त्याची हालचाल यंत्रासारखी होत होती व तो मेणाच्या बाहुलीसारखा दिसत होता. असा चमत्कारिक, जवळ जवळ मुद्दाम उभ्या केलेल्या प्रेतासारखा दिसणारा माणूस युलिसेसनं आजपर्यंत कधीं पाहिला नव्हता. त्याच्या डोळ्यांत जिवंतपणा दिसत नव्हता, आणि त्यानं आपलं तोंड असं कांहीं गच्चं मिटून धरलं होतं कीं जणूं तें कधींच उघडणं शक्य नव्हतं!

डॉ. ब्रॅडफोर्डच्या टॉनिकची जाहिरात करण्यांत तो विचित्र माणूस गुंतला होता. त्याच्या दोन्ही बाजूंस दोन फळ्या होत्या. एका फळीवर लिहिलं होतं, "मेकॅनोसाहेब! अर्धा माणूस, अर्धं यंत्र! मेलेला, पण जिवंत! जो याला हंसवील त्याला पांचशे डॉलर्स बक्षीस!" त्याच्या पुढें एक लहान टेबल होतं, त्यावर दहा जाड कार्डे ठेवलेलीं होतीं, त्यांतलं एकेक घेऊन तो दुसऱ्या फळीवर लावी. प्रत्येक कार्डावर, ब्रॅडफोर्डचं टॉनिक घेऊन आपलं आयुष्य वाढविण्याचा लोकांना संदेश देणारा मजकूर छापला होता. एकेक कार्ड फळीवर लावलं कीं मेकॅनोसाहेब त्यांतला मजकूर हातानं दाखवी. दहा कार्डे फळीवर लावून झालीं, कीं तो तीं सगळीं काढून टेबलावर ठेवी, व पुन्हां फळीवर लावून दाखविण्याचा उद्योग सुरू करी.

लायनेल म्हणाला, "युलिसेस, हा माणूसच आहे बरं कां. यंत्र नाहीं. तो पहातोय् कसा बघ. तो जिवंत आहे खास!"

मेकॅनोसाहेबानं फळीवर चढविलेल्या नव्या कार्डावर लिहिलं होतं. "मेल्यासारखं आयुष्य कंठूं नका! आयुष्याची मजा लुटा! डॉ. ब्रॅडफोर्डचं टॉनिक घ्या! संजीवन प्राप्त झाल्याप्रमाणें तुम्हाला वाटेल!"

बराच वेळ झाल्यावर लायनेलला कंटाळा आला व त्याला घरीं जावंसं वाटूं लागलं. तो म्हणाला, " युलिसेस चल जाऊं या. सारीं कार्डे तीन वेळां पाहिलीं आपण. दिवे लागणी झाली बघ. आतां घरीं जाऊं. " त्यानं युलिसेसचा हात पकडला परंतु युलिसेसनं तो काढून घेतला. " चल रे, असं काय ? आतां मला घरीं गेलचं पाहिजे. भूक लागली. "

परंतु युलिसेसची घरीं जाण्याची इच्छा नव्हती. त्याला लायनेलचं बोलणं ऐकूं देखील आलं नाहीं. " युलिसेस, मी चाललों बरं का ? " अशी लायनेलनं निर्वाणीची ताकीद दिली व तो त्याच्यासाठीं थोडासा थांबलाहि. परंतु युलिसेस जागचा हालला नाहीं. त्याचं हें वागणं दोस्ताला शोभण्यासारखं नाहीं असं मनांत येऊन लायनेलला वाईट वाटलं. तो घरीं निघाला खरा, पण तीन चार पावलांगणीक तो मागं वळून पहात होता. युलिसेस आपला हट्ट सोडील व आपल्याबरोबर येईल असं त्याला वाटलं. परंतु तसं कांहीं झालं नाहीं तेव्हां लायनेलला दुःख झालं. तो मग एकटाच निघाला. तो मनाशीं म्हणत होता, " मला वाटलं होतं हा माझा सगळ्यांत जीवाभावाचा दोस्त आहे. "

युलिसेस मेकॅनोसाहेबाकडे बघत उभा राहिला. गर्दी कमी झाली. एकच म्हातारा माणूस युलिसेसजवळ उरला. मेकॅनोसाहेबाचा उद्योग अखंड चालू होता. टेबलावरचं एकेक कॉर्ड उचलून तो फळीवर लावी, कॉर्डावरच्या प्रत्येक शब्दाकडे व ओळींकडे बोट दाखवी, दहा कार्डे झालीं कीं तीं सगळीं काढून तो टेबलावर ठेवी. शेवटीं तो म्हातारा माणूसहि निघून गेला, आणि युलिसेस एकटाच राहिला. अंधार पडूं लागला. रस्त्यांतले दिवे लागले त्याबरोबर युलिसेस दचकला. त्या मेकॅनोसाहेबानं जणूं त्याला मोहनिद्रेंत टाकलं होतं व तिच्यांतून तो एकदम भानावर आला होता. त्यानं इकडे तिकडे पाहिलं. दिवस संपला होता. रस्त्यावरचीं सारीं माणसं निघून गेलीं होतीं. जें उरलं होतं त्याचं वर्णन फक्त स्मशान–शांतता या शब्दानं होण्यासारखं होतं. परंतु तो शब्द अगर ती कल्पनाहि युलिसेसला माहीत नव्हती !

त्यानं पुन्हां मेकॅनोसाहेबांकडे पाहिलं. या वेळीं त्याला वाटलं, कीं मेकॅनोसाहेबांनं आपल्याकडे रोखून नजर लावली आहे. ही कल्पना मनांत येतांच त्याची भीतीनें गाळण उडाली. त्यानं एकदम धूम ठोकली. रस्त्यांत जीं थोडीं माणसं दिसलीं तीं मेलेलीं आहेत असा त्याला भास झाला. तीं सारीं त्या मेकॅनोसाहेबासारखींच दिसत आहेत असा त्याला भास झाला. भेसूर, गलिच्छ, अक्राळ विक्राळ ! धांवता धांवता अखेर तो थकला तेव्हां थांबला. त्याला श्वास लागला होता. तो धापा टाकीत होता, रडकुंडीस आला होता. त्यानं आजूबाजूस पाहिलं. भोंवतालच्या सर्व वस्तूंत मेकॅनोसाहेब—म्हणजेच मृत्यू—त्याला दिसूं लागला, व भीतीनं त्याच्या अंगाला घाम सुटला. आजपर्यंत कसलंच भय त्याच्या मनाला शिवलं नव्हतं, त्यामुळें आतां भीति वाटल्यावर काय करावं तें त्याला अगदीं समजेना. भीति जणूं त्याचा पाठलाग करीत होती व त्यामुळें त्याचा नेहमींचा तोल पार सुटला होता. तो आणखी वेगानं धांवत निघाला, व आतां धांवतां धांवतां, "बाबा ! आई ! मार्कस ! बेस ! होमर !" अशा पुनः पुन्हां हांका मारूं लागला.

आजपर्यंत त्याची समजूत झाली होती, कीं हें जग म्हणजे मोठं गंमतीदार ठिकाण आहे, यांत नाना चिजा भरलेल्या आहेत आणि त्यांकडे पुनः पुन्हां जितकं पहावं तितका आनंदच आहे. परंतु त्याची ही समजूत आतां एकदम नष्ट झाली होती व जग म्हणजे ज्यापासून दूर पळून आपलं संरक्षण केलं पाहिजे असं ठिकाण होय असं त्याला वाटूं लागलं होतं, आणि कोणत्या दिशेनं पळावं हें मात्र त्याला मुळींच कळत नव्हतं. आपल्या घरांतल्या कोणत्यातरी माणसांकडे धांव घ्यावी येवढंच त्याक्षणीं त्याला कळत होतं. भयानं भांबावल्याप्रमाणें तो मध्येंच थबकून उभा राही, मग पुन्हां उलट दिशेनं पळे, मग पुन्हां सुलट दिशेनं धांवूं लागे. जिकडे तिकडे संकट उभं राहिलेलं त्याला दिसत होतं, व आपल्या घरचं कोणी तरी माणूस भेटलं तरच तें संकट टळेल असं त्याला वाटत होतं. तो धांवत सुटला...

आणि नंतर एका ठिकाणीं ऑगी उभा असलेला त्याला दिसला ! तो कोंपऱ्यावर उभा राहून वर्तमानपत्रांतल्या बातम्यांचे मथळे अशा कांहीं आवि-

भांवानं ओरडत होता, कीं जणूं रस्ता माणसांनीं गजबजलेला होता, आणि जगांत त्या दिवशीं जें जें घडलं तें तें त्यांना ओरडून सांगितल्याखेरीज भागण्यासारखं नव्हतं.

बातम्यांचे मथळे उंच आवाजांत ओरडण्याचं हें काम खरं म्हटलं म्हणजे ऑगीला मुळींच आवडत नसे. त्याला वाटे, रोजच्या रोज खून, दरोडे, अत्याचार, लढाई, कापाकापी, जाळपोळ इत्यादींचा उंच आवाजांत घोष करायचा आणि वर्तमानपत्रं विकून पैसे मिळवायचे हें काय हें? लोकांनीं परोपरीचीं अपकृत्यं करायचीं आणि एखादी आनंदाची गोष्ट घडल्याप्रमाणें आपण उंच आवाजांत ओरडून त्यांचा पुकार करावा?...कधीं कधीं त्याला स्वप्नं पडत त्यांतसुद्धां कोपऱ्यावर उभं राहून आपण बातम्या ओरडत आहोंत असंच त्याला दिसे. मनाच्या कुठल्यातरी खोल कप्प्यांत त्या बातम्यांविषयीं त्याला तिरस्कार, शिसारी वाटे. त्याला भास होई, कीं आपण कुठें तरी खूप खूप उंच उभे आहोंत आणि खालीं मुंग्यांयेवढ्या दिसणाऱ्या माणसांचे थवेच्या थवे मूर्खपणा करीत आहेत, अत्याचारांत गुंतले आहेत. त्याचा खणखणीत आवाज ऐकून ते वर मान करून त्याच्याकडे बघत. मग तो त्यांना ओरडून सांगे "अरे परत जा! आपापल्या घरीं जा ना! एकमेकांच्या माना काय कापतां! थांबा, एकदम थांबा! घरीं जा आणि झाड लावा!" झाडं लावण्याची कल्पना त्याला नेहमीं रम्य वाटत असे...

कोपऱ्यावर उभा असलेला ऑगी दृष्टीस पडल्याबरोबर युलिसेसची भीति पुष्कळच कमी झाली. प्रेमाचं, मायेचं ठिकाण दूर नाहीं असं त्याला वाटलं. ऑगीला मोठ्यांदा हांक मारावी असं त्याला वाटलं, परंतु त्याच्या तोंडांतून शब्दच फुटेना. मग हांक मारण्याऐवजीं तो आपलं सारं बळ एकवटून धांवला, व जवळ गेल्याबरोबर त्यानं अशी जोराची झेंप घेऊन ऑगीला मिठी मारली, कीं ऑगी आपल्या पायांवर लटपटलाच. त्यानं आश्चर्यानं विचारलं,

"कोण, युलिसेस? काय झालं रे? अन् तूं रडतो आहेस का?"

ऑगीच्या नजरेला नजर देऊन युलिसेसनं पाहिलं. परंतु त्याला कांहीं बोलतां येईना.

ऑगी म्हणाला, "तू भ्याला आहेस. भिऊं नकोस. अरे भ्यायसारखं काय आहे ? रडूं नकोस. रडूं नकोस !" परंतु तरी युलिसेसचं रडणं थांबेना. "अं हं, रडायचं नाहीं. गप्प." असं म्हणून ऑगी वाट पहात राहिला. रडणं बंद करण्याचा युलिसेसनं अगदीं जोराचा प्रयत्न केला. त्याचे हुंदके हलके हलके कमी झाले. दाबलेला खोकला मध्येंच यावा त्याप्रमाणें एखादा हुंदका येऊं लागला. ऑगी म्हणाला, "युलिसेस, चला आपण होमरकडे जाऊं."

तें नांव ऐकल्याबरोबर युलिसेस एकदम हंसला. एक हुंदका देत त्यानं विचारलं "होमर ?"

"अर्थात् होमर. चल जाऊं."

युलिसेसला वाटलं होमरकडे जाणं कसं शक्य आहे? त्याचा विश्वास बसेना. त्यानं विचारलं "होमरकडे जायचं ?"

ऑगी म्हणाला, "तर ! पलीकडच्याच कोंपऱ्यावर तार ऑफिस आहे !"

ते दोघे तार ऑफिसांत गेले तेव्हां होमर आपलं काम करीत एका टेबलाजवळ बसला होता. होमर दृष्टीस पडतांच युलिसेसचा चेहरा एकदम बदलला. त्याच्या मनांतलं भय पार नाहींसं झालं. त्याला वाटलं आपण घरीं आलों.

होमर आपल्या जागेवरून उठून जवळ आला व त्यानं युलिसेसला उचलून घेतलं. ऑगीकडे वळून त्यानं विचारलं, "हें काय रे ? या वेळेस इकडे कुणीकडे हा ?"

ऑगीनं सांगितलं, "मला वाटतं तो वाट चुकला. रडत होता."

"रडत होता ?" असं म्हणत होमरनं युलिसेसला हृदयाशीं घट्ट धरलं. त्याबरोबर यलिसेसला अनावर हुंदका आला. होमर म्हणाला, "उगी उगी. रडूं नकोस. तुला मी सायकलवरून घरीं घेऊन जातों हं. अगदीं रडूं नकोस."

स्पॅंग्लरसाहेब आपल्या जागेवरून या तिघां मुलांकडे बघत होता. ग्रॅागनहि आपलं काम सोडून पहात होता. मधूनच ते दोघे एकमेकांकडे बघत होते. होमरनं युलिसेसला पुन्हां खालीं ठेवलं. युलिसेस हलके हलके पावलं टाकीत ज्या टेबलावर तारा पडल्या होत्या त्याच्या जवळ गेला. तें पाहून होमरची

खात्री झाली, कीं आतां तो पुन्हां रडणार नाहीं. त्याला माहीत झालं होतं, कीं युलिसेस कशांत तरी रमला कीं मग तो मजेंत असतो. होमरनं ऑगीच्या गळ्यांत हात टाकून म्हटलं, "ऑगी तुझे फार आभार मानले पाहिजेत. युलिसेसला तूं भेटला नसतास तर काय भलतं झालं असतं कुणास ठाऊक!"

स्पँग्लरसाहेब आपल्या खुर्चीवरून उठून त्यांच्याजवळ आला व म्हणाला, "हं, कसं काय ऑगी? एक वर्तमानपत्र देणार का आम्हांला?"

"हो हो!" असं म्हणून खाकेंतल्या जुडग्यांतून एक अंक काढून त्याची घडी करण्याचा नेहमींचा विधी ऑगी करूं लागला. पण स्पँग्लरनं त्याला थांबवून वर्तमानपत्र हातीं घेतलं. उघडून जाड टाइपांतले मथळे वाचले, आणि मग त्यानं तो अंक केराच्या टोपलींत टाकून दिला. त्यानं विचारलं, "हं ऑगी, तुझं कसं काय चाललं आहे?"

ऑगी म्हणाला, "ठीक. आत्तापर्यंत पंचावन सेंट कमावले मी. पण केव्हांपासून विकतों आहे माहीत आहे? एक वाजल्यापासून. पंचाहत्तर सेंट झाले, कीं मग आम्हीं घरीं जाणार."

"होय? पण पंचाहत्तरच कां बुवा? आं?"

"कां असं कांहीं नाहीं. पंचाहत्तर आंकडा मनांत आला आणि तो मी ठरविला एवढंच. बाकी आतां इतक्या रात्रीं रस्त्यांत शुकशुकाट झाल्यावर मी कितीहि ओरडलों तरी माझे अंक कसे खपणार आहेत कुणास ठाऊक? एकच युक्ति आहे. सिनेमा सुटेपर्यंत घरीं न जातां थांबलों तर कदाचित् त्या गर्दींत मला अंक खपवितां येतील."

"ती गर्दी मरूं दे. तुझ्या खांकोटींतले सगळे अंक मला देऊन टाक, आणि अत्ताच्या आत्ता घरीं जा पाहूं, हे घे पैसे."

स्पँग्लरच्या त्या औदार्याचं ऑगीला अतिशय कौतुक वाटलं, परंतु आपण त्याचा फायदा घ्यावा असं त्याला वाटेना. त्याच्या मनांत आलं, एकेक अंक वेगवेगळ्या माणसाला खपविला, रस्त्याच्या कोंपऱ्यावर उभं राहून ओरडलं, आणि बातम्या वाचण्याची इच्छा लोकांच्या मनांत उत्पन्न केली तर त्यालाच प्रामाणिक धंदा म्हणतां येईल. असे एकदम अंक देऊन टाकण्यांत कांहीं पराक्रम

नाहीं. परंतु त्याच्या मनांत असंहि आलं कीं आपण दमलों आहोंत, आपल्याला फार भूक लागलेली आहे, अन् केव्हां एकदां घरीं जाऊं असं झालं आहे. तथापि त्याचं मन त्याला पुन्हां सांगूं लागलं, कीं अशा प्रकारें स्पँग्लरसारख्या सज्जन माणसाला सगळे अंक देऊन पैसे घेणं म्हणजे कांहीं प्रामाणिक सौदा नव्हे...

तो म्हणाला, "अं हं, तुमच्यापासून पैसे घ्यायचे नाहींत मला. हें कांहीं बरं नव्हे!"

स्पँग्लर म्हणाला, "बस्स कर रे! आण ते सगळे अंक इकडे, आणि घरीं जा."

ऑगीनं खांकोर्टीचे सगळे अंक त्याच्या हातीं दिले, परंतु पैसे घेतां घेतां तो म्हणाला, "या पैशांचा मोबदला म्हणून मला एखादे वेळेस कांहीं काम तरी सांगा."

"हो हो, सांगेन बरं." असं म्हणून स्पँग्लरनं अंकांचा गठ्ठा केराच्या टोपलींत फेकून दिला.

ऑगी घरीं जाण्यासाठीं निघाला तेव्हां होमर त्याला थांबवून म्हणाला, "ऑगी, थांब थांब. माझ्या सायकलवरून मी तुला घरीं पोंचवतों ना. एक तर तार पोंचवायसाठीं मला जायचं आहे. तुला आणि युलिसेसला दोघांनाहि मला नेतां येईल." स्पँग्लरसाहेबांकडे वळून त्यानं विचारलं, "चालेल ना? या दोघांना घेऊन जाऊं का मी?"

"हो हो, ज़ा कीं!" असं सांगून स्पँग्लर परत आपल्या घरीं जाऊन बसला, त्यानं आपल्या टेबलावरचं तें अंडं उचलून हातांत धरलं. तें शकुनाचं असल्याबद्दल–निदान तें जवळ असलं, कीं इडापीडा दूर राहते याबद्दल त्याची खात्री होती.

ऑगी होमरला म्हणाला, "तूं कशाला इतका त्रास घेतोस? दोघांना सायकलवर न्यायचं म्हणजे कांहीं साधी गोष्ट नाहीं. हां हां म्हणतां चालत जाईन मी घरीं."

होमर म्हणाला, "अरे चालत जाईन काय? जवळ जवळ तीन मैल लांब आहे तुझं घर. दोघांना सायकलवरून नेण्यांत येवढं अवघड तें

काय आहे ? तूं मधल्या दांड्यावर बैस, युलिसेसला हँडलवर बसवीन मी. हं चल चल."

मग ते तिघे तार ऑफिसांतून बाहेर पडले. होमरनं ऑगी व युलिसेस यांना व्यवस्थित बसविलं, आणि सायकल चालू केली. एक पाय दुखत असतांना येवढं ओझं घेऊन सायकल चालवितांना त्याला चांगलेच श्रम होऊं लागले. परंतु त्यला त्याचं कांहीं वाटलं नाहीं. थोड्याच वेळांत तो गांवांत दाखल झाला. आराच्या 'मंडई' जवळ ऑगीचं घर होतं तें प्रथम लागलं. तिथें ऑगी खालीं उतरला. आपल्या दुकानाच्या दारांत आरा उभा असलेला दिसला त्याला त्यानें विचारलं,

"आज कसा काय धंदा झाला ?"

"चांगला झाला. खुषींत आहे मी. थँक यू."

"माझ्याजवळ पंचाहत्तर सेंट आहेत. तुमच्या दुकानांतून खूप खूप जिनसा विकत घेणार आहे मी."

"होय का! छान. मग ये ना आंत."

ऑगीला घेऊन तो दुकानांत शिरूं लागला तेव्हां त्याच्या मुलाकडे त्याचं लक्ष गेलं. आभाळांत ढग जमलेले होते त्याकडे बोट दाखवून तो आपल्या लहान मुलाला म्हणाला, "जॉन, पाहिलंस काय. रात्र झाली. आतां निजायचं. रात्रभर निजायचं बरं का! आणखी उद्यां उजाडलं कीं पुन्हां उठायचं. मग दुसरा दिवस सुरूं!"

ते तिघे दुकानांत शिरले.

इतका वेळ होमर दुकानासमोरच उभा राहिला होता. दहा पांच घरं सोडून पलीकडे होमरची आई आपल्या घरांतल्या आंगणांत झाडाखालीं वाळत घातलेलीं चिरगुटं काढीत होती. घराच्या आंतल्या बाजूस बेस पियनो वाजवीत होती, अन् मेरी गात होती तें अस्पष्टपणें ऐकूं येत होतं. दूर अंतरावर आई दिसत होती तिच्याकडे सायकलच्या हँडलवर बसलेल्या युलिसेसनं सारखी नजर लावली होती. ऑगी आराच्या दुकानांत शिरल्यावर होमर सायकलवर पुन्हां चढला तेव्हां युलिसेस त्याच्याकडे पाहून म्हणाला,

" आई !"

होमर म्हणाला, " हो, आई ! ती बघ झाडाखालीं आहे. दिसली तुला ?"

घरापाशीं आल्यावर होमरनं युलिसेसला सायकलवरून उचलून खालीं ठेवलं. युलिसेस आपल्या आईकडे पाहूं लागला. त्याच्या चेहऱ्यावर आतां पूर्ण हास्य दिसूं लागलं. मेकॅनोसाहेबाची भीति त्याच्या मनांतून आतां पुरती गेली होती.

होमर म्हणाला, " आई, ही स्वारी चुकली होती बरं का. ऑगी त्याला भेटला म्हणून बरं झालं. त्यानं आणलं त्याला ऑफिसांत. मला अजून काम आहे. जायला हवं. परंतु बेस आणि मेरी आंत आहेत ना ? त्यांना भेटतों थोडासा."

तो वळाला पण गाणं ऐकत अलीकडच्याच दालनांत उभा राहिला. त्यांचं गाणं संपल्यावर तो पुढें झाला, व खोलींत पाय टाकतां टाकतां म्हणाला, " हलो !"

बेस आणि मेरी दोघानीं वळून पाहिलं. फार आनंदानं आणि फार घाईनं बोलल्याप्रमाणें मेरी म्हणाली, " हलो ! होमर ! आज मार्कसचं पत्र आलंय मला !"

"असं का ? काय बातमी ?"

" मजेंत आहे. त्यांना लौकरच आघाडीवर जावं लागणार आहे. कुठें तें माहीत नाहीं. कांहीं दिवस पत्र आलं नाहीं तर काळजी करूं नका असं त्यानं लिहिलं आहे."

बेस मध्येंच म्हणाली, " सगळ्यांना पत्रं धाडलीं आहेत त्यानं. आईला, मला, युलिसेसलासुद्धां."

" अरे वा !" असं उद्गारून होमर गप्प राहिला. तुलाहि त्याचं पत्र आलं आहे असं आपली बहीण सांगते का हें पहाण्यासाठीं त्यानं थोडा वेळ वाट पाहिली. परंतु ती सांगेना तेव्हां त्यानं अखेर हलकेच विचारलं, " मला नाहीं का आलं पत्र ?"

मेरी म्हणाली, "वा रे! तुला तर सगळ्यांत मोठं पत्र आलं आहे. मला वाटलं आम्हाला मार्कसूचीं पत्रं आलीं तेव्हां तुलाहि आलंच असणार हें तूं ओळखशील."

टेबलावर एक पत्र पडलं होतं तें उचलून बेसनं त्याच्या हातीं दिलं. तो किती वेळ तरी त्या पत्राकडे नुसता बघतच राहिला. त्याची बहीण म्हणाली, "हें रे काय? उघडून वाचीत कां नाहींस? आम्हाला वाचून दाखव कीं."

होमर म्हणाला, "नको. कारण आतां मी जायच्या घाईत आहे. मी तें बरोबर नेतों. ऑफिसांत वेळ मिळाला, कीं मी तें सवडीनं सावकाश वाचीन."

बेस म्हणाली, "ए होमर, आज आम्हीं नोकरीच्या शोधांत दिवसभर भटकलों अन् शेवटीं हात हलवीत घरीं आलों."

मेरी म्हणाली, "पण म्हणून आम्ही कांहीं कंटाळलों नाहीं बरं का! आम्हांला नोकरी देतां का म्हणून विचारीत भटकण्यांत कांहीं कमी गंमत नाहीं!"

होमर म्हणाला, "गंमत असो नसो, तुम्हांला नोकरी नाहीं हें बरं झालं. मी पैसे मिळवितों तेवढे पुरेत. आणखी मेरीच्या वडिलांना काय वाईट नोकरी आहे होय? तुम्हाला दोघींना कशाला ग हव्यात नोकऱ्या?"

बेस म्हणाली, "आम्हाला हव्यात! हव्यातच! आणखी आज ना उद्यां आम्हाला मिळतात कीं नाहीं बघ. आजच दोन ठिकाणीं आम्हांला सांगितलं आहे कीं फिरून एकदां चौकशी करा म्हणून. नाहीं का ग मेरी?"

तें ऐकून होमरला चांगलाच राग आला. तो म्हणाला, "बेस, मेरी, नोकरी करण्याची भाषा बंद करा पाहूं. सारीं कामं पार पाडायला आम्हीं पुरुष समर्थ आहोंत. तुम्हीं कशाला त्या भानगडींत पडायचं? घरीं रहावं अन् पुरुषांची काळजी घ्यावी तुम्ही. पियानो वाजवावा, गाणं म्हणावं, पुरुष घरीं परत आला कीं तुमच्याकडे पाहतांच त्याला विसावा वाटावा असं तुम्हीं आपलं

समर्थ्य खुलवावं–एवढीच तुमची जबाबदारी." तो क्षणभर थांबला व मग फक्त मेरीकडे पहात अगदीं मृदु आवाजांत म्हणाला, "मार्क्स् लौकरच घरीं परत येईल. तो आला कीं तुम्हीं दोघं आपला स्वतंत्र संसार मांडा, आणि आनंदानं रहा!" मग बेसकडे वळून त्यानं म्हटलं, "आणि बेस, लौकरच तुलासुद्धां तुझ्या मनाजोगा कुणी तरी तरुण पुरुष भेटेल, अन् त्याचा संसार तूं थाटशील. तुम्हां दोघींचीं खरीं कामं हीं आहेत, आणि विचार करायचा असला तर याचा करीत जा. महायुद्ध सुरूं आहे म्हणून प्रत्येकानें आपलं माथं भडकूं द्यावं असं कांहीं नाहीं. घरीं रहा, आईला मदत कर. अन् मेरी तूं आपल्या वडिलांना सांभाळ."

कर्त्या माणसाच्या ऐटीनं तो हुकूम सोडीत होता तें पाहून त्याच्या बहिणीला त्याचं फार कौतुक वाटलं. अशी जबाबदारी घेऊन बोलतांना ती त्याला आज प्रथमच पहात होती.

तिला व मेरीला उद्देशून होमर पुन्हां म्हणाला, "मी आतां जें सांगितलं तें विसरायचं नाहीं बरं का! हं! आतां एक गाणं म्हणा म्हणजे मी जातों."

बेसनं विचारलं, "कोणचं गाणं हवं तुला?"

"कोणचंहि."

बेस पियानो वाजवूं लागली, अन् मेरी गाणं म्हणूं लागली. होमर तें ऐकत दूर उभा राहिला, आणि गाणं संपेपर्यंत न थांबतां तो अगदीं हलक्या पावलांनीं बाहेर पडला.

अंगणांत युलिसेसची स्वारी कोंबड्यांच्या खुराड्याजवळ जाऊन तिथें त्याला एक अंडं दिसलं तें पहात उभी होती. होमर आईला म्हणाला, "आई, उद्यां आपण चर्चला जायचं बरं का. सगळ्यांनीं मिळून. मेरीला बरोबर घेऊन."

त्याची आई म्हणाली, "हे काय तुझं सांगणं? आपण दर रविवारीं जातोंच. आणि बहुतेक मेरीला घेऊनच जातों."

होमर आवेगानं म्हणाला, "तें खरं, पण उद्यां जायचंच, आणखी मेरीला बरोबर न्यायचीच. युलिसेस, हातांत काय आहे रे तुझ्या?"

"अंडं !" युलिसेसनं त्या एका शब्दाचा उच्चार असा कांहीं केला कीं जणूं अंडं नव्हे तर प्रत्यक्ष परमेश्वरच सांपडला होता !

होमर आपल्या सायकलवर चढला व वेगानं निघाला.

# २६

याच वेळीं एक पॅसेंजर गाडीं वेगानं धाड धाड करीत रात्रींच्या अंधारांतून आपला मार्ग काढीत होती. लष्करी शिपायांची गाडी होती ती. गणवेश चढविलेल्या, कवाईती करून करून लढाईसाठीं तयार झालेल्या पोरसवदा अमेरिकन तरूणांनीं गाडी खचून भरली होती. या गर्दीत मार्कस् होता व त्याचा स्नेही टोबे होता. हे सारे पोरसवदा तरूण आघाडीवर निघाले होते. परंतु त्यांची नजर, त्यांचा उत्साह, त्यांचं हसणं खेळणं पाहतांच खात्री वाटण्यासारखी होती, कीं तें केवळ एक सैन्य नव्हतं तर एक राष्ट्र होतं—बलवान आणि उदार असं राष्ट्र होतं. एका रांगेत उभं रहाण्याचं, वक्तशीरपणें सारे व्यवहार करण्याचं, आणि सबंध पलटणीच्या ज्या गरजा त्याच आपल्या गरजा व आपले हक्क असं समजण्याचं शिक्षण त्यांना सतत मिळालं असूनहि त्यांची अवस्था यंत्रासारखी झाली नव्हती. हीं सारीं अजूनहि माणसंच होतीं. त्यांच्यांत जिवंतपणा होता. हे हजारो पोरसवदा तरुण बडबडत होते, हंसत होते, गलगा करीत होते, परंतु तो करतांनाहि माणुसकीच्या प्रतिष्ठेचा त्यांना विसर पडला नव्हता. त्यांच्या मनांत खोल कुठें तरी कसलं तरी भय असल्यामुळेंच त्यांचा येवढा गलगा चाललेला होता; परंतु त्यांचीं अंतःकरणं वीर पुरुषांचीं होतीं. मनांत दडलेली भीति टाकून वेळ आली तर मृत्यूला कवटाळण्याला ज्या कारणांसाठीं ते सिद्ध झाले होते त्याबद्दल त्यांच्या मनांत भ्रम नव्हता अथवा भलत्याच

कल्पनाहि नव्हत्या. त्यांच्याकडे पाहतांच कुणाच्यहि लक्षांत येण्यासारखं होतं कीं हे सारे तरुण अमेरिकन होते, कुणी मोठ्या शहरांतले होते, कुणी गांवढ्यावरचे होते, कुणी श्रीमंत कुळांतले होते, कुणी गरीब कुटुंबांतले होते, कुणी मोठमोठ्या महत्त्वाकांक्षेची सुंदर स्वप्नं अर्धीच टाकून आलेले होते, कुणी आपल्या लहानशा सुखी जिवनाचा संथ प्रवाह सोडून आले होते! परंतु साऱ्यांच्या मनांत दृढ निश्चय होता, आणि साऱ्यांची तयारी निर्वाणीची होती! अशा तरुणांची गर्दी होती ती! या तरुणांना आघाडीवर पोंचविण्यासाठीं गाडी रात्रीं अंधारांतून वाट काढीत धाड धाड करीत चालली होती.

आजूबाजूस जिकडे तिकडे बडबड, हंशा, मूर्खांचीं बोलणीं, शाहण्यांचं संभाषण, असा एकच गोंधळ आणि कोलाहल माजला असतांना मार्क्स् व टोबे एकत्र बसून हलक्या आवाजांत बोलत होते.

टोबे म्हणाला, "हं, आपण अखेर निघालों म्हणायचे."

मार्क्स् म्हणाला, "होय, निघालों!"

"मार्क्स्, तुला सांगायला हवं असं नाहीं पण हें महायुद्ध सुरू झालं हें मी माझं भाग्य समजतों. कारण एरवी तुझी माझी कशाला गांठ पडली असती? आणि तुझ्या घरच्या मंडळींच्या हकिकती मला कोठून समजल्या असत्या?"

मार्क्स् गोंधळला, "थँकस्! पण तुझ्याबद्दलहि मला तसंच वाटतं," असं म्हणून तो क्षणभर गप्प राहिला. जें शब्दांनीं सांगतां येत नाहीं असं संकट माणसाच्या मानेवर लटकत असलं कीं त्याच्या मनांत वारंवार एक प्रश्न उभा रहात असतो. तोच प्रश्न त्यानं टोबेला एकदम विचारला. तो म्हणाला, "मी विचारतों त्याचं खरं उत्तर देशील कां? समज तूं ठार झालास तर तुला दुःख होईल कां?"

टोबेनं चटकन् उत्तर दिलं नाहीं. परंतु अखेर तो म्हणाला, "शौर्याचं सोंग करणं अन् बढाई मारणं कांहीं अवघड नाहीं. पण मी तुला खरं तें सांगतों, मी ठार झालों तर मला फार दुःख होईल. मरावसं मुळींच वाटत नाहीं मला. तुला?"

मार्क्स् म्हणाला, "मलाहि वाटत नाहीं. पण तुझं मन मला पहायचं होतं." थोडा वेळ गप्प राहून त्यानं पुन्हां विचारलं, "पण काय रे टोबे, आपण मरतां कामा नये असं तुला वाटतं म्हणजे काय? तुझ्या मनांत काय येतं? कोणत्या गोष्टींसाठीं सुखरूप परत यावंसं वाटतं तुला?"

"तें कांहीं सांगतां येत नाहीं!" त्याला खरोखरच सांगतां येण्यासारखं नव्हतं तें. "सुखरूप परत यावसं वाटतं येवढंच. तुला तुझी आई आहे, भाऊ आहे, बहीण आहे. मला कुणीच नाहीं. परन्तु जें कांहीं माझ्या वांटयाला येणार असेल त्यासाठीं सुखरुप परत आलं पाहिजे असं मला वाटतं. मेरीचं तुझ्यावर प्रेम आहे. ती तुझी वाट पहात असेल. अशा प्रकारें वाट पाहणारं माझं कुणींच माणूस नाहीं. परन्तु असं असूनहि जिवंत राहावं अन् परत यावं असं मलाहि वाटतं."

"बरोबर आहे."

कांहीं वेळ दोघेहि गप्प राहिले. मग मार्क्स्नं विचारलं, "तुला गाण्याची एवढी आवड कशी?"

"कशी कोण जाणे! मला गावसं फार वाटतं. येवढंच."

कांहीं वेळ आगगाडीच्या चाकांचा धाड् धाड् असा आवाज आणि आंतला गलबला ऐकत दोघेहि स्तब्ध राहिले. मग टोबेनं हळूंच विचारलं, "तुला परत यावंसं वाटतं तेव्हां काय वाटतं?"

मार्क्स् थोडा वेळ गप्प राहिला, व मग हलकेच म्हणूं लागला, "मला माझ्या वडिलांची आठवण होते. आई, बेस, होमर, युलिसेस यांची आठवण होतें. मेरीची आणि तिच्या बापाची आठवण होते. आमच्या घराभोंवतालच्या सगळ्या गोष्टींचीं चित्रें मला दिसूं लागतात. ती बखळ, ती दंगामस्ती करणारीं छोटीं पोरं, लहान मोठीं घरं, आमचं दुकान—सगळं दिसूं लागतं मला. लहानपणीं मी ज्या ठिकाणीं जाऊन आगगाडी पहात असे तें ठिकाण, माझी शाळा, चर्च, वाचनमंदिर, माझे मास्तर, माझे शाळासोबती या गोष्टींकडे मन ओढ घेतं. अन् वाटतं, हा माझा गांव, हें माझं घर! सुखरुप परत आलं पाहिजे मला..."

टोबे म्हणाला, " तूं कदाचित् मला वेडा म्हणशील. कदाचित् मला असं कां वाटावं हें तुला कळणार नाहीं ! पण माझ्या मनाची अशी भावना झाली आहे, कीं तुझा इथाका गांव तोच माझा गांव." थोडं थांबून तो पुढें म्हणाला, "यांतून दोघेहि वांचलों संवरलों तर तूं आपल्या बरोबर मला इथाकाला घेऊन जाशील ? ज्या ज्या ठिकाणीं तूं हिंडला सवरलास तिथें तिथें मला नेशील ? इथें मी अमुक केलं, तिथें अमुक केलं, या ठिकाणीं हें घडलं, त्या ठिकाणीं तें घडलं, असं सारं मला सांगशील ? "

मार्कस् म्हणाला, " अर्थात् तूं म्हटलं नसतंस तरी मी तसं करणार होतों. तुला मी आमच्या घरीं नेणार आहे अन् सगळ्यांची ओळख करून देणार आहे. आमचं आपलं गरीबाचं एक साधं कुटुंब आहे. आम्हीं श्रीमंत कधींच नव्हतों. माझे बाबा लौकिकार्थानं यशस्वी झाले नाहींत. सुखासमाधानानं रहातां यावं येवढाच पैसा त्यांनीं मिळविला. परंतु माझे बाबा म्हणजे एक थोर पुरुष होते ! "

" त्याचं नांव मथ्यू मकॉले ना ? "

" होय. मॅथ्यू मकॉले. द्राक्षांच्या मळ्यांत दारू गाळण्याच्या भट्टींत, अगर अशाच कुठल्यातरी ठिकाणीं कामं करण्यांत त्यांची हयात गेली. रस्त्यांत ते दिसले तर त्यांच्याकडे कुणाचंहि लक्ष जाण्यासारखं नव्हतं. चार चौघांसारखे होते तें. परंतु त्यांचं अंतःकरण फार थोर होतं. आपलं घर अन् आपलीं मुलं-माणसं त्यांना प्राणांहून प्रिय होतीं. माझ्या आईवर त्यांची विलक्षण भक्ति होती. हार्प हें वाद्य आतां फारसं कुणी वाजवीत नाहीं, परंतु माझ्या आईला त्याची हौस होती. हार्पला थोडी का किंमत पडते ? परंतु आमच्या बाबांनीं तें आई-साठीं आणलं. त्याच्या किंमतीचे पैसे ते पुढें पांच वर्षं भरीत होते. अगदीं उत्तमांतलं उत्तम हार्प होतं तें. आम्हां मुलांना वाटे सगळ्यांच्याच घरीं हार्प असतं. तसाच त्यांनीं बेससाठीं पियानो विकत आणला. लहानपणीं मला वाटे सगळ्यांचेच बाप असे असतात. ती माझी कल्पना किती चुकीची होती तें पुढें कळून आलं मला. मी मोठा होत गेलों आणि लोकांत मिसळलों तेव्हां मला दिसून आलं, कीं इतरांचे बाप आमच्या बाबांसारखे नाहींत. ते वाईट

आहेत असं नाहीं माझं म्हणणं; परंतु मला कांहीं ते थोर वाटले नाहींत. थोर असतीलही, परंतु त्यांची माझी फारशी ओळख नसल्यामुळें मला त्यांचा थोरपणा कळला नाहीं. माणसाचं अंतःकरण किती मोठं आहे तें अनुभवावाचून, दाट परिचयावाचून समजत नाहीं. जीं मनानं फार मोठीं आहेत परंतु ज्यांचा मोठेपणा कुणाला माहीत नाहीं अशी किती तरी माणसं असतील."

टोबे म्हणाला, "तुझे बाबा मला पाह्यला मिळाले असते तर किती बरं झालं असतं. माझा बाप कोण तेंच मला माहीत नाहीं. एका दृष्टीनं हें माझं भाग्यच म्हणायचं. कारण तुझ्या बाबांसारखाच माझाहि बाप थोर असला पाहिजे अशी मला कल्पना करतां येतें."

मार्क्स् चटकन् म्हणाला, "कल्पना काय म्हणून ? तुझा बाप खरो-खरींच कुणी मोठा असेलही !"

टोबे म्हणाला, "हं, असेलहि. होता असं समजूं या. हें बघ मार्कस, लहानपणीं किती दिवस तरी मुलांना आईबाप असतात याची मला कल्पनाच नव्हती. पण पुढें शाळेंत जाऊं लागलों आणि मुलांच्या तोंडून आई बाबा असे शब्द ऐकूं लागलों. प्रथम मला त्या शब्दाचा अर्थच कळेना." तो अगदीं चम-त्कारिक आवाजांत हंसला. "कारण माझी वेडी कल्पना अशी, कीं माझ्याप्र-माणेंच प्रत्येक मूल आपलं आपण, एकटंच या जगांत येत असतं. माझ्या या कल्पनेला धक्का बसला तेव्हां माझं मन अगदीं कडवटून गेलं. पूर्वी कधीं वाटला नव्हता असा भयंकर एकटेपणा मला वाटूं लागला, आणि तो वाढूं लागला. मला वाटतं मला गावंसं वाटूं लागलं तें त्यामुळेंच. गाण्याच्या नादांत एकटे-पणाचं भान राहत नाहीं." मग किंचित् शरमून भीत भीत त्यानं एकदम प्रश्न केला, "बेस कशी काय मुलगी आहे रे ?"

तें विचारतांना त्याच्या मनाचा लाजेनं जो गोंधळ उडाला तो मार्क्स्च्या लक्षांत आला व तो नाहींसा करण्यासाठीं तो म्हणाला, "अरे येवढं लाजायला काय झालं ? माझ्या बहिणीबद्दल तू विचारावंस हें मला आवडतं. तिची तुझी भेट व्हावी अशी माझी इच्छा आहे. तिला तू खात्रीनं आवडशील."

"मी ?"

"हो. मला तर वाटतं, तूं फारच आवडशील. तुला मी आमच्या घरीं नेणार आहे, अन् ठेवून घेणार आहे. तुम्हीं दोघं एकमेकांना आवडलात—बेस कांहीं आतां लहान नाहीं, तेव्हां—पण तें जाऊं दे. तिला तूं फार आवडशील येवढंच आतां सांगतों."

मार्क्स् थांबला. जी गोष्ट त्याच्या मनांत आली होती ती स्पष्ट बोलून कशी दाखवावी तें त्याला समजेना, परंतु त्याच्या मनांत आलं, बोलून दाखवण्याचा प्रयत्न तर करूं या. तसं करतांना गोंधळल्यासारखं होईल, पण होईना. जें मनांत आलं आहे तें मनांत ठेवण्यांत अर्थ नाहीं. बोलतां येईल तसं बोलून टाकावं हें उत्तम. म्हणून एखादी गोष्ट घाईनं सांगितल्याप्रमाणं तो म्हणाला, "तुला आवडली तर तिच्याशीं लग्न कर, आणि आमच्या इथाका गांवांतच रहा. आमचा इथाका गांव फार चांगला आहे. तुला आवडेल. तूं आणि बेस सुखानं नांदाल. हें बघ माझ्याजवळ तिचा फोटो आहे तो मी तुला देतों ठेवायसाठीं." त्यानं आपल्या खिशांतला एक लहानसा फोटो काढून त्याच्या हातीं दिला व म्हटलं, "माझ्या पाकिटांत मी मेरीचा फोटो ठेवला आहे तसा तूं आपल्या पाकिटांत हा ठेव."

टोबेनं मार्क्स्च्या बहिणीचा तो फोटो घेतला व किती वेळ तरी तो त्याकडे निरखून पहात राहिला. मार्क्स् टोबेकडे बघत राहिला. शेवटीं टोबे म्हणाला,

"बेस सुंदर आहे यांत शंकाच नाहीं. ज्या मुलीची कधीं प्रत्यक्ष गांठभेट झालेली नाहीं तिच्यावर प्रीति जडणं चमत्कारिकच म्हणावं लागेल, परन्तु बेसवर माझी आजच प्रीति बसलेली आहे खचित. मार्क्स्, तुला अगदीं मनांतलं सांगतों. आतांपर्यंत मला वाटे, बेसविषयीं याच्याजवळ कसं बोलावं? इतर माणसांना ज्या गोष्टी बोलण्याचा अगर करण्याचा हक्क आहे तो मला नाहीं असं मला नेहमी वाटत आलेलं आहे. कारण मी बोलून चालून एक पोरका अनाथ मुलगा. माझं नांव ठेवलं तेंसुद्धां आईबापांनीं नव्हे तर अनाथालयाच्या अधिकाऱ्यांनीं. माझी आई कोण माहीत नाहीं. बाप कोण माहीत नाहीं. त्यांची जात काय, धर्म काय व ते कोणत्या देशाचे तें माहीत नाहीं. कुणी

सांगतात मी स्पॅनिश आहे, कुणी सांगतात मी फ्रेंच आहे, तर कुणाच्या मतानं मी इटालियन आहे. वाटेल त्यानं माझा देश वाटेल तो ठरवावा!"

मार्क्स् एकदम म्हणाला, "तूं अमेरिकन आहेस. बस्स."

"हो, मलाही वाटतं मी अमेरिकन आहे. परंतु अमेरिकनच्या दहा तऱ्हा आहेत. यांतली माझी तऱ्हा कोणती?"

"तूं अमेरिकन आहेस, अन् तुझं नांव टोबे जॉर्ज आहे. यांत सगळं कांहीं आलं. समजलास? हं, बेसचा तो फोटो नीट ठेव तुझ्याजवळ. अन् आपलं काय ठरलं तें लक्षांत ठेव. ही लढाई संपली, कीं आपण दोघं मिळून इथाकाला जाणार आहोंत. लग्न करणार आहोंत. आपण आपापले संसार थाटूं. एकमेकांच्या घरीं जाऊं येऊं, संगीत ऐकूं, गाणीं म्हणूं आणि दिवस मोठ्या आनंदांत घालवूं."

टोबे म्हणाला, "थँक्स. तुझं हें बोलणं ऐकून मला फार फार आनंद झाला. आपण आघाडीवर निघालों आहोंत व तुझी माझी मैत्री जमलेली आहे म्हणून केवळ माझ्या मनाला बरं वाटावं यासाठीं नव्हे तर तूं हें सारं अगदीं मनापासून बोलतो आहेस याबद्दल माझी खात्री आहे. तुझा प्रत्येक शब्द मला खरा वाटतो. माझी एकच इच्छा कोणती असं कुणी मला विचारलं तर मी सांगेन, मार्क्स्‌बरोबर इथाकाला जायचं आहे मला." तो क्षणभर थांबला. त्याच्या मनांत झरकन् एक शंका येऊन गेली, कीं कांहीं वाईट साईट घडलं तर आपली ही इच्छा कुठून पुरी होणार? परंतु ती शंका दूर करून तो पुढें म्हणाला, "बेसला मी आवडलों नाहीं—तिचं दुसऱ्या कुणावर प्रेम बसलं—किंवा समजा, आपण जायच्या आंतच तिचं लग्न झालेलं असलं—तरी मी इथाका गांवांतच कायमचा राहणार. कां कोण जाणे, माझ्या मनाची आपली भावना झाली आहे, कीं इथाका हीच माझी जन्मभूमि. आजपर्यंत मला वाटे, मला जसे आईबाप नाहींत त्याचप्रमाणें माझं असं गांवहि कुठलं नाहीं. पण आतां वाटतं, इथाका हेंच माझं गांव! आणखी एक गोष्ट सांगूं? तुला ती वावगी वाटणार नाहीं ना? मला असंही वाटतं, कीं मकॉले कुटुंब हेंच माझं कुटुंब. कारण, मला जर कुणी विचारलं, कीं कशा प्रकारच्या कुटुंबांत जन्म

घ्यावा असं तुला वाटतं, तर मी म्हणेन मकॉले कुटुंबांत. ईश्वर करो आणि बेसला मी आवडो. तिचं दुसऱ्या कुणावर प्रेम बसूं नये. कारण ती मला फार आवडते हें माझं मला स्पष्ट दिसतं आहे." आतां तो आवाज अगदीं लहान करून बोलूं लागला. मात्र गाडींत जरी एकच कलकलाट चालू असला तरी मार्कुस्‌ला त्याचा प्रत्येक शब्द स्पष्ट ऐकूं येत होता. तो सांगत होता, "बेसला अजून माहीत नाहीं, परंतु ती माझी आहे. मला जिवंत रहायचं आहे तें कशासाठीं, तर इथाकाला जायसाठीं. बेसकडे जायसाठीं. इथाका हीच माझी जन्मभूमि. तिथलाच मी. मी तिथेंच राहणार आणि शक्य तर तिथेंच मरणार."

मार्कुस् म्हणाला, "आपण परत येऊं आणि एक दिवस आपण इथाकाला जाऊं, शंकाच नको. बेस आणि तूं, मेरी आणि मी, माझी आई, आमचा होमर अन् युलिसेस—सारी एकत्र राहूं. बघ तरी."

मग ते दोघे जिवाभावाचे स्नेही किती वेळ तरी अगदीं गप्प राहिले. भोंवतालचे शिपाई गडी त्यांना हांका मारून त्यांच्याशीं बोलूं लागेल, व थट्टा-मस्करी करूं लागले. उत्तान शृंगाराचीं गाणीं मोठमोठ्यांनीं म्हणण्यास त्यांनीं प्रारंभ केला. बाजारबसव्यांच्या प्रणयचेष्टांचीं, आणि त्यांच्या सोंगांढोंगांचीं वर्णनं त्या गाण्यांत होतीं. त्या गीतांचा हैदोस भोंवतीं चालू असतांना टोबेनं आगदीं साधेपणानं एकाएकीं मार्कुस्‌ला विचारलं,

"तूं प्रार्थना करतोस?"

मार्कुस्‌नं चटकन् उत्तर दिलं, "जरूर नेहमीं करतों."

"मी अनाथालयांत होतों ना? तिथें प्रार्थना सक्तीची होती. इच्छा असो नसो साऱ्यांनीं प्रार्थना केलीच पाहिजे असा तिथें नियम होता."

"असा नियम कांहीं अगदींच वाईट नाहीं. पण येवढं खरं, कीं प्रार्थनेचा जुलूम करण्यांत अर्थ नाहीं. सक्तीनं करावी लागणारी प्रार्थना ही मुळीं प्रार्थनाच नव्हे."

"बरोबर आहे. म्हणूनच मी अनाथालय सोडलं तेव्हांपासून प्रार्थनाहि सोडली. वयाच्या तेराव्या वर्षापासून मी कधीं प्रार्थना केलेली मला आठवत

नाहीं, पण आतां मात्र मी प्रार्थना करूं लागणार आहे. आतां या क्षणापासून ही बघ."

तो क्षणभर थांबला व प्रार्थना करूं लागला. त्यानं हात जोडले नाहींत, डोळे मिटले नाहींत, अगर मानहि झुकविली नाहीं परंतु तो प्रार्थना करीत होता यांत संशयच नव्हता. "माझं एकच मागणं आहे. मला इथकाला जातां यावं, घरीं जातां यावं. सगळ्याचं रक्षण करतां यावं. सगळ्यांच्या दुःखाचं निवारण माझ्या हातून व्हावं. ज्यांना आसरा नसेल, त्यांना आसरा देतां यावा. मला इथाकाला जाऊं दे." मध्येंच भोवतालीं चाललेल्या शृंगारिक गाण्याचे चरण तो गाऊं लागला. परंतु मग एकदम गाणं बंद करून जणूं आपल्या प्रार्थनेचं सूत्र पुन्हां चालवून तो मोठ्यांदा ओरडला "आमेन!"

मार्कुस् म्हणाला, "छान आहे तुझी प्रार्थला. ईश्वर तुझं मागणं ऐकेल."

आपल्या प्रार्थनेंत कांहीं गोष्टी मागायच्या राहिल्या असं टोबेच्या मनांत आलं. त्यानं पुन्हां प्रार्थना सुरू केली. "इथाका गांव सुखरूप असूं दे. मला त्या गांवाच्या रस्त्यारस्त्यांतून हिंडायला मिळूं दे. मकॉले कुटुंबातल्या साऱ्या माणसांवर तुझी कृपादृष्टि असूं दे. बेसवर माझं फार प्रेम आहे हें तिला कळूं दे. बेस, मार्कुस्, मेरी, होमर, युलिसेस, आई, या सर्वांवर तुझ्या कृपेचं छत्र असूं दे. तें घर, पलीकडची बखळीची जागा, हार्प, पियानो, गाणीं, सगळं जसंच्या तसं राहूं दे. मला आगगाडी पाहतां यावी म्हणून तिच्या रुळांचा रस्ताहि सुरक्षित राहूं दे. प्रभू, सगळ्या जगाचं रक्षण कर आणि मी त्या जगांत सुखरुप परत येईन असं कर. मला इथाकाला परत येऊं दे. येवढं एकच मागणं." इतकं म्हणून झाल्यावर तो पुन्हां ओरडला "आमेन!"

आतां गाडींतल्या शिपाईगड्यांनीं दुसरं एक गाणं सुरू केलं होतं. मानवी जीवित किती क्षणभंगुर आहे, आणि स्त्रीचं प्रेम किती चंचल आहे त्याचं वर्णन या गाण्यांत केलेलं होतं. त्यांतलं कठोर तत्त्वज्ञान मोठ्या मोलाचं आहे अशा भावनेनं त्याचा एकेक चरण आवडीनं घोकून घोकून ते म्हणत होते. टोबे आणि मार्कुस् या दोघांनींहि ते म्हणण्यास प्रारंभ केला. पण मध्येंच टोबेनं गाणं सोडून दिलं व मार्कुस्ला विचारलं,

" तूं कशी प्रार्थना करतोस ? देवाजवजळ काय मागणं मागतोस ?"

" मार्क्स् म्हणाला, " तूं जें मागतोस तेंच."

मग त्या दोघां मित्रांनीं भोंवतालीं चालू असलेलं गाणं म्हणण्यास प्रारंभ केला. तें गाणं संपल्यावर गाडींत एकदम शांतता झाली. या शांततेला कारण कांहींच घडलं नव्हतं. परंतु जो तो एकदम अगदीं स्तब्ध व गंभीर झाला खरा. शेवटीं ज्यो नांवाचा एक शिपाई आपल्या जागेवरून उठून मार्क्स् व टोबे यांच्याजवळ आला आणि म्हणाला,

" हें रे काय ? एकदम असं गप्प व्हायला काय झालं तुम्हांला ? टोबे, एक गाणं म्हण कीं, आणि मार्क्स्, बाजा वाजव ना."

मार्क्स्नं विचारलं, " कोणतं गाणं ऐकायची इच्छा आहे तुझी ?"

ज्यो म्हणाला, " तें नाहीं मला माहीत. इतका वेळ सारीं घाणेरडीं गाणीं म्हटलीं आम्ही. आतां आपण एखादं जुनं, एखादं चांगलं म्हणूं या. आपण लहानपणीं चर्चमध्यें जात असूं अन् तिथें गाणीं ऐकत असूं त्यांतलं एखादं गाणं म्हणायला काय हरकत आहे ?"

मार्क्स् म्हणाला, " काय हरकत आहे ? पण त्यांतलं कोणचं हवं आहे तुला ?"

ज्यो म्हणाला," हें पहा. तुम्हीं मला हंसाल. परंतु मी सांगतों. ' दयेच्या कुशींत ' हें गाणं ऐकावंसं फार वाटतं मला."

मार्क्स्नं टोबेला विचारलं, " या गीताचे चरण येतात तुला ?"

टोबे म्हणाला, " अरे येतात म्हणून काय विचारतोस ? सतत दहा वर्षं प्रत्येक रविवारीं हें म्हटलेलं आहे मी."

" मग ज्योसाठीं म्हणूं या आपण. आणि हें बघ ज्यो, तुला वाटलं तर तूं सुद्धां म्हण बरं का. तुला गातां येत नसलं तरी चालेल. आमच्या बरोबर म्हणूं लाग म्हणजे झालं."

ज्यो म्हणाला, " म्हणणार. अवश्य म्हणणार."

मार्क्स्नं आपल्या बाज्यावर त्या जुन्या गीताचे स्वर काढले, आणि मग टोबेनं चरण म्हणण्यास सुरवात केली.

ज्योचा आवाज कमावलेला नव्हता पण खणखणीत आणि गोड होता. तो टोबेबरोबर गीत म्हणूं लागला. गार्डीतले सारे शिपाई लक्ष देऊन ऐकूं लागले, आणि थोड्याच वेळांत जणूं दुरून ऐकून त्यांचं समाधान होईना. त्या गीताच्या शब्दांच्या शक्य तितक्या जवळ जावंस त्यांना वाटलं. म्हणून ते सारेजण मार्क्स्, टोबे, आणि ज्यो यांच्याभोवतीं गोळा झाले. ज्यो आणि टोबे गीताचं ध्रुपद म्हणत होते—

**" तुझ्या दयेच्या कुशींत माथा टेकुनि, प्रभु, राहूं ! "**

गार्डीतले सारेच शिपाईगडी उंच आवाजांत तो चरण म्हणूं लागले !

## २७

आजच्या दिवसाचा होमरला कधीं विसर पडण्यासारखा नव्हता. सकाळपासून किती तरी गोष्टी घडत गेल्या होत्या, आणि त्या लहानसहानच होत्या खऱ्या परंतु त्यांत केवढा मोठा अर्थ भरलेला होता तें त्याला समजत होतं. काल रात्रींचं तें दुःख आतां उरलेलं नव्हतं; उलट नंतरच्या विश्रांतिमुळें त्याच्या मनाला हुशारी आली होती, व तो ताजेपणा त्याला आज दिवसभर पुरला होता. यमदूत इथाकाकडे निघाला आहे व आपण त्याला परत घालवीत आहोंत असं स्वप्न काल रात्रीं त्याला पडलं होतं. परंतु आतां त्या स्वप्नाचा अनुभव प्रत्यक्षच आला होता. मार्क्स्चं पत्रच त्याला मिळालं होतं. तें त्याच्या खिशांत होतं. सवड झाल्याबरोबर तें तो वाचणार होता.

आपली कामगिरी आटपून तो परत आला व लंगडत ऑफिसांत शिरला. तो अगदीं थकून गेला होता. आणखीं कांहीं तारा येऊन पडल्या आहेत कीं

काय म्हणून त्यानं टेबलाकडे पाहिलं. टेबलावर एकहि तार नव्हती. म्हणजे त्याला आतां कुठें कामगिरीवर जावं लागणार नव्हतं. त्याला स्वस्थ बसतां येण्यासारखं होतं. त्यानं सुटकेचा निःश्वास टाकला. ग्रॅगनजवळ जाऊन तो म्हणाला,

"तुम्ही आम्ही पट्टी करून वाफोळे आणूं या काय ?"

म्हाताऱ्या ग्रॅगननं बरीच घेतलेली दिसत होती. तो म्हणाला, "मी पट्टी देईन. पण मला वाफोळे अगदीं नकोत. पण विचारलंस म्हणून थँक्स."

होमर म्हणाला, "तुम्हांला नको असले तर मलाहि नकोत. मला वाटलं तुम्हांला भूक लागली असेल. मला तरी भूक कोठें आहे ? सबंध दिवसांत मला क्षणभर देखील उसंत मिळाली नाहीं. परंतु मला भूक कशी ती अगदीं नाहीं. सारखं वणवण हिंडायला लागल्यावर वास्तविक भूक लागायला हवी, परंतु लागली नाहीं खरी."

ग्रॅगननं विचारलं, "तुझा पाय आतां कसा आहे ?"

"ठीक आहे. माझा पाय दुखत होता हें आतां माझ्या लक्षांत देखील नाहीं." मग त्या म्हाताऱ्या तारमास्तरकडे निरखून पहात त्यानं हलकेंच विचारलं, "ग्रॅगन, तुम्हीं फार प्यालां आहां काय ?"

त्यानं तो प्रश्न अगदीं कळकळीनं केला होता. ग्रॅगनला त्याचा राग आला नाहीं. तो म्हणाला, "हो, प्यालों आहे. प्यालों कीं मला पुष्कळ बरं वाटतं." त्यानं बाटली काढली, चांगला मोठा घोट घेतला, व नंतर होमरकडे टक लावून पहात तो म्हणाला, "दारू फार वाईट, तिला कधीं स्पर्श करूं नको असं मी तुला कधीं सांगणार नाहीं. माझ्यापासून धडा घे, दारुनं माझी काय अवस्था केली बघ असा उपदेश करणारे विद्वान तुला भेटतील. पण असला उपदेश म्हणजे निव्वळ मूर्खपणा आहे. मी तुला तसला कांहीं शहाणपणा शिकविणार नाहीं. तुला आतां पुष्कळ गोष्टी कळूं लागल्या आहेत. जगाची ओळख तुला पटूं लागलेली आहे. तेव्हां तुला एक गोष्ट सांगणार आहे मी. कोणत्याहि माणसाबद्दल मत बनवितांना नीट विचार करावा. एकाद्या माणसाचा एखादा दोष दिसल्यावर तो दोषच म्हटला पाहिजे असं ठरविण्याची घाई करूं नये. तूं

वयानं लहान आहेस, परंतु तुझ्या बुद्धीबद्दल मला आदर वाटतो. आणि म्हणून इतरांना जें सांगतांना मी कचरेन तें तुला सांगायला हरकत नाहीं असं मला वाटतं. कुणावरहि एकदम टीका करूं नये. अमुक मनुष्य असा वागतो ना, मग तो वाईट असलाच पाहिजे असा चटकन् सिद्धांत काढणं न्यायाचं नाहीं, मूर्खपणाचं आहे. उदाहरणार्थ, तुझ्याबद्दल मला किती थोडी माहिती आहे, तुझ्या आईबापांची मला माहिती नाहीं, तूं कोणत्या परिस्थितींत लहानाचा मोठा झालास तें मला ठाऊक नाहीं. तुझा जो कांहीं स्वभाव असेल तो तसा कशामुळें बनला त्याची मला कल्पना नाहीं. परंतु तूं चांगला आहेस येवढं मला माहीत आहे; आणि त्याचा मला आनंद होतो. माणसाचा अंतकाळ जवळ आला, कीं या जीविताबद्दल त्याला अधिकाधिक कृतज्ञता वाटूं लागते. त्याला समजूं लागतं कीं आपण या जगांतून उठून गेल्यावरहि हें जग चालूं राहणारच आहे, आणि यांत पुष्कळ चांगलीं माणसं असणार आहेत. मी शुद्धीवर असतों तर या गोष्टी तुला सांगाव्या असं वाटलं नसतं. प्यालों आहे म्हणूनच हें असं बोलतों आहे. लोकांना ज्याला दुराचार म्हणावंसं वाटतं तो करणाऱ्या माणसाबद्दल एकदम वाईट मत करून घेऊं नये असं मी कां म्हणतो तें तुला या एका गोष्टीवरूनच कळायला हरकत नाहीं. मी जें तुला सांगतों आहे, तें सांगणं माझं कर्तव्य आहे, आणि तें तुला केव्हां तरी कळूं लागलंच पाहिजे. तेव्हां मी प्यालों आहे आणि तुला ह्या गोष्टी सांगतों आहे हें बरोबर आहे. मी काय म्हणतों तें तुझ्या लक्षांत येतंय् ना ?"

होमर म्हणाला, "नीटसं येत नाहीं. पण तुम्ही बोला."

ग्रोगन म्हणाला, "मी जें सांगतो तें ऐकून तुझ्या मनाचा कदाचित् गोंधळ उडेल, आणि मला दारूची नशा चढलेली नसती तर मी तुला सांगतलंहि नसतं. माझं तुला असं सांगणं आहे, कीं ज्या प्रकाराचं आयुष्य तुझ्या वांट्याला ओललं आहे त्याबद्दल तूं कृतज्ञ ठेव. माणसाच्या अंगीं जे कांहीं बरेवाईट गुण असतील त्याबद्दल त्यानं कृतज्ञ असायला हवं. कारण त्या गुणांची मालकी त्याच्या एकट्याकडे नाहीं. त्यांत इतरांचा वाटा आहे. जें कर्तृत्व आपल्यांत आहे त्याचा संभाळ करणं, व सगळ्यांच्या हितासाठीं त्याचा उपयोग करणं

यांतच माणसाची खरी माणुसकी आहे. सुदैवानं तुझ्या अंगीं पुष्कळ गुण आहेत. याबद्दल तुला कृतज्ञता वाटली पाहिजे. तुझ्या गुणांची ओळख कुणालाहि पटेल आणि तूं सर्वांना हवासा वाटशील.

रोझा सॅन्डोव्हाल नांवाच्या बाईनं एकदम मिठी मारून "माझ्या बाळा, माझ्या लाडक्या !" असं म्हटलं होतं त्याची होमरला कां कुणास ठाऊक एकदम आठवण झाली.

ग्रॅगन पुढें बोलूं लागला, "तुला पहातांक्षणींच लोकांना वाटेल, हा निराळा आहे. हा कुणाला कधीं दुखवणार नाहीं, कुणाचा विश्वासघात करणार नाहीं; सगळ्या जगानं ज्या माणसाचा तिरस्कार केला त्याला देखील हा दूर ढकलणार नाहीं, जगाला एखाद्याची योग्यता कळली नाहीं तरी याला कळेल. असा तूं आहेस हें लक्षांत ठेव; आणि असा तूं आहेस याचा प्रत्यय तुला जेव्हां जेव्हां येईल तेव्हां गोंधळून जाऊं नकोस. वयानं अवघ्या चवदा वर्षांचा पण फार मोठा माणूस आहेस तूं. हें मोठेंपण तुझ्या अंगीं कसं आलं तें कुणालाच सांगतां येणार नाहीं. परंतु तें तुझ्या अंगीं आहे खरं, अन् तें तुला माहीत असायला हवं. त्याबद्दल सदा कृतज्ञ रहा, आणि तें कधीं सोडूं नकोस. लक्षांत आलं का तुझ्या ?"

होमर अगदीं गोंधळून गेला होता. मोठ्या प्रयत्नानं तो म्हणाला, "आलंसं वाटतं."

"शाबास. इथें तूं कामाला आलास तेव्हांपासून मी शुद्धीवर असलों अगर प्यालेलों असलों तरी तुझ्याकडे माझं लक्ष आहे, तुझी योग्यता मी ओळखलेली आहे. जगाच्या कोनाकोपऱ्यांतल्या गांवागांवांत मी हिंडलों आहे अन् काम केलं आहे. माझ्या तारुण्यांत देशोदेशींचीं शहरं पहावीं असा मला ध्यास होता, आणि तीं मीं पाहिलींहि. जिथें जिथें मी गेलों तिथें तिथें तूं भेटतोस कां अशा उत्कंठेनं माझी नजर शोध करीत असे. मला तूं पुष्कळ ठिकाणीं भेटला आहेस. कल्पना नव्हती अशा ठिकाणीं, आणि अगदीं साध्या सुध्या माणसांत तूं मला आढळला आहेस. येवढंच कीं त्या त्या स्थळीं आणि त्या त्या व्यक्तींत तूं फक्त अंशमात्र भेटलास आणखी माझ्या मनाचं पुरतं समाधान कधीं

झालं नव्हतं. परंतु माझ्या अखेरच्या दिवसांत, इथें या इथाका गांवांत तूं पूर्णत्वानं दृष्टीस पडलास. तुझा मोठेपणा मला पूर्णत्वानं पहायला मिळाला. माझं हें बोलणं तुझ्या ध्यानीं आलं असेल तर मला फार समाधान वाटेल..." बोलतां बोलतां तो एकदम थांबला व त्यानं विचारलं, "तुझ्या हातांत काय आहे तें ? पत्र दिसतं आहे. माझं बोलणं संपलं, वाच बेटा; तूं आपलं पत्र वाच."

"माझा थोरला भाऊ मार्कस् आहे ना, त्याच्याकडून आलेलं पत्र आहे हें. आतांपर्यंत मला वेळच मिळला नाहीं तें उघडून पहायला."

"मग आतां उघड, उघड आपल्या भावाचं पत्र, अन् वाच. मोठ्यांदा वाच."

"तुम्हाला ऐकायला आवडेल ?"

"होय. तुझी हरकत नसेल तर फार आवडेल?" असं म्हणून ग्रॉगननं बाटली तोंडाला लावली व पुन्हां एकदां भक्कम घोंट घेतला.

होमरनं पाकीट फोडलं, आंतला कागद काढला, आणि तो अगदीं सावकाश वाचूं लागला.

"प्रिय होमर,

अगदीं प्रथम तुला सांगायची गोष्ट ही कीं आपल्या घरांत माझं म्हणून जें जें काहीं आहे तें तें मी तुला दिलेलं आहे. तुला तें नकोसं झालं कीं युलिसेसला देऊन टाक. माझीं पुस्तकं, माझा फोनोग्राफ, माझी रेकॉर्डस, तुझ्या अंगाला येतील ते कपडे, सायकल, मायक्रोस्कोप, मासे धरण्याची काठी अन् जाळं, पिअेड्राला मी गेलो होतों तेथून आणलेले दगडांचे नमुने–घरांत माझ्या म्हणून जितक्या वस्तू आहेत तेवढ्या तूं घे. कारण आपल्या कुटुंबांतल्या कर्त्या माणसाची जागा आतां तूं घेतलेली आहेस. गतवर्षी एका कारखान्यांत काम करून जे पैसे मी मिळविले होते ते मी अर्थातच आईजवळ दिले आहेत. ते फार दिवस पुरतील असं नाहीं, आणि त्यामुळें कदाचित् थोड्या दिवसांत कुठें तरी काम करावं असा विचार आई आणि बेस करूं लागतील. तूं त्यांना तसं करूं देऊं नकोस असं मी तुला कसं सांगूं ? परंतु माझी खात्री आहे कीं तशी वेळ तूं येऊंच देणार नाहींस. कारण मी असतों तर ती येऊं दिली नसती. नोकरी

करूनहि शाळेंतला अभ्यास तुला चालू ठेवतां येईल कीं नाहीं कुणास ठाऊक. परंतु तूं कांहीं तरी मार्ग काढशील अशी मला आशा आहे. मला इथें लष्करांत जो पगार मिळतो त्यांतले अगदीं जरुरीपुरते पैसे ठेवून बाकीचे मी आईकडे धाडीत जाईन. परंतु तेवढ्यानं भागणार नाहीं. कुटुंबाला मदत करण्याची जोखीम तूं पतकरावीस अशी अपेक्षा करणं कांहींसं कठोरपणाचं आहे. कारण मला एकोणीसावं वर्ष लागलं तेव्हां मी ती जोखीम पतकरली. परंतु जें माझ्या हातून घडलं नाहीं तें तूं करशील असा मला विश्वास आहे.

"इकडे मला अर्थातच चुकल्या चुकल्यासारखं वाटतं, आणि तुझी फार आठवण येते. मी मजेंत आहे. युद्धावर माझा विश्वास नाहीं. लढाईवांचून गत्यंतर नसलं तरी ती एक अतिशय मूर्खपणाची गोष्ट आहे अशी माझी समजूत आहे. परंतु असें असूनहि माझ्या देशाची सेवा मी करीत आहे या गोष्टीचा मला अभिमान वाटतो. माझा देश म्हणजे काय असं मला जर कुणी विचारलं तर मी सांगेन, माझा इथाका गांव, माझं घर, आणि माझीं माणसं हाच माझा देश. जगांतल्या कोणत्याहि माणसाला माझा शत्रू समजायला मी तयार नाहीं. तो कोणत्याहि देशांतला असो, कोणत्याहि वर्णाचा असो, तो कितीहि चुकीच्या मार्गानें जात असो, त्याला मी माझा शत्रू मानणार नाहीं, मित्रच समजेन. कारण तोहि माझ्यासारखाच मनुष्य आहे. माझं वैर त्या व्यक्तीशीं असूं शकत नाहीं. त्यांच्यांतल्या दुष्ट प्रवृत्तीशीं आहे. ती प्रवृत्ति नष्ट करणं हें माझं कर्तव्य आहे, आणि ती प्रवृत्ति माझ्यांतच असेल तर आधीं तिचा नायनाट मला केला पाहिजे.

"मी कोणी धीरोदत्त वीर पुरुष आहे अशी माझी भावना नाहीं. असली भावना माझ्या स्वभावांतच नाहीं. मला कुणाचाच द्वेष वाटत नाहीं. देशभक्तीचं वारं माझ्या अंगांत संचरलं आहे असंहि मला वाटत नाहीं. मला येवढंच माहित आहे कीं माझा देश, त्यांतले लोक, [illegible]तलीं शहरं, माझं घर आणि माझं कुटुंब यांवर माझं फार प्रेम आहे. मी लष्करांत नसतों तर बरं झालं असतं असं मला वाटतं. हें युद्ध सुरू झालं नसतं तर मला आनंद झाला असता, परंतु ज्या अर्थी युद्ध चालू आहे अन् मी सैन्यांत दाखल झालों आहे

त्या अर्थी उत्तमांतला उत्तम लष्करी शिपाई होण्याची माझी इच्छा आहे. पुढें काय घडणार आहे याची मला कल्पना नाहीं. परंतु जें कांहीं घडणार असेल त्यासाठीं माझी तयारी आहे. तुझ्याशीं मी प्रतारणा कशाला करूं ? खरं तें सांगतों, कीं मला भयंकर भीति वाटते. मात्र मृत्यू समोर येऊन उभा राहिला कीं माझं कर्तव्य मी उत्तम प्रकारें—अपेक्षेबाहेर उत्तम प्रकारें—करून दाखवीन. इतकंच कीं तें करतांना माझ्या स्वतःच्या सदसद्विवेकबुद्धीचीच आज्ञा मी पाळीन. आपल्या इथाका गांवासारख्याच इतर हजारों गांवांतून आलेले तरुण माझ्याबरोबर आहेत. कदाचित् मी ठार मारला जाईन. कोणताहि आडपडदा न ठेवतां तुला सांगतों कीं मरणाची कल्पना मला अगदीं सहन होत नाहीं. इतर कोणतीहि नाहीं पण एकच अगदीं तीव्र इच्छा मला आहे कीं इथाकाला परत यावं आणि तुम्हां सर्वांच्या सहवासांत दीर्घकाल रहावं. मेरीसाठीं मला घरीं परत यायचं आहे, मला संसार करावयाचा आहे, मला मुलंबाळं व्हावीं अशी माझी फार इच्छा आहे. आघाडीवर जाण्यासाठीं आम्ही लवकरच कूच करणार आहोंत. कुठें जावं लागणार आहे त्याची आम्हांला कल्पना नाहीं. परंतु लवकरच आमची रवानगी होईल. तेव्हां कांहीं काळ तरी हें माझं अखेरचं पत्र तुला समजावं लागेल. हें अगदीं अखेरचं ठरणार नाहीं अशी मला आशा आहे. पण समज तसं झालं तरी धीर सोडूं नकोस, आणि सर्वांना धीर दे. मी कायमचा गेलों, नाहींसा झालों असं मानूं नकोस. इतरांना मानूं देऊं नकोस. मला इथें एक नवा मित्र मिळाला आहे. तो अनाथालयांत वाढलेला एक पोरका मुलगा आहे. इथें आमच्या पलटणींत शेकडों लोक असून याच्याशींच माझी मैत्री व्हावी हा एक चमत्कारिक योगायोगच म्हणायला पाहिजे. त्याचं नांव टोबे जॉर्ज असं आहे. आपल्या इथाका गांवाबद्दल व आपल्या कुटुंबाबद्दल मी त्याला पुष्कळ सांगितलं आहे. मी त्याला माझ्याब[illegible] घरीं आणणार आहे. हें पत्र वाचल्यावर तूं स्वतःला दुःखी होऊं देऊं नकोस. मकॉले कुटुंबांतून एक माणूस युद्धावर जायला हवाच होता.. ती पाळी माझ्यावर आली याबद्दल मला आनंद होतो. कारण ती तुझ्यावर आली असती तर ती भलतीच गोष्ट झाली असती.

" प्रत्यक्ष बोलतांना जें सांगणं अवघड वाटलं असतं तें लिहिणं मला शक्य आहे. आम्हां भावंडांत सगळ्यांत उत्तम मुलगा तूं आहेस. असाच उत्तम तूं नेहमीं राहिलं पाहिजेस. कितीहि अडचणी आल्या तरी आज तूं चवदा वर्षांचा आहेस. लवकरच तूं वीस वर्षांचा होशील. मग तुला तिसावं वर्ष लागेल, मग चाळिसावं मग पन्नासावं मग साठावं. मी कुठेंहि असलों तरी माझं लक्ष तुझ्याकडे असेल. ज्यासाठीं शिर हातावर घेऊन आम्हीं लढत आहोंत त्याचं प्रतीक तूं आहेस. होय तूं आहेस. माझा भाऊ ! या गोष्टी प्रत्यक्ष संभाषणांत मला सांगतां आल्या असत्या काय ? तूं एकदम माझ्यावर उसळला असतास, अन् म्हणाला असतास काय गाढव आहेस. परंतु मी जें आतां सांगितलं त्यांपैकीं प्रत्येक शब्द खरा आहे. आतां मी तुझं नांव लिहिणार आहे. तुला आठवण रहावी म्हणून. होमर मकॉले. तूं होमर मकॉले आहेस हें नेहमीं ध्यानांत ठेव. तुझी फार आठवण होते मला. तुला पुन्हां डोळे भरून पाहायला मला केव्हां मिळणार आहे कुणास ठाऊक. परंतु जेव्हां पाहीन अन् जेव्हां तुझी माझी भेट होईल तेव्हां तूं माझ्याशीं मस्ती करावीस, मला खालीं पाडावंस, आणि आई, बेस, युलिसेस अन् मेरीसुद्धां सगळ्यांनीं तें पहावं अशी माझी इच्छा आहे. तूं भेटशील तेव्हां मला विलक्षण आनंद होईल. ईश्वर तुझं रक्षण करो. येतों आतां. "

तुझा भाऊ

**मार्कस**

पत्र वाचतां वाचतां होमर खालीं बसला होता. तो अगदीं सावकाश वाचीत होता. त्याला वरचेवर हुंदके येत होते, आणि रडं आवरावं लागत होतं. पत्र वाचून झालं तेव्हां तो उठला. त्याचे हात कांपत होते. खालचा ओठ त्यानं दांताखालीं दाबून धरला होता. त्यानं समोर ग्रॅागनकडे पाहिलं तों पत्र ऐकून त्याची देखील तशीच अवस्था झाली होती. होमर स्वतःशीं पुटपुटल्याप्रमाणें म्हणाला,

" या निरर्थक गाढवपणाच्या युद्धांत माझ्या भावाचं जर कांहीं वाईट झालं तर—तर मी साऱ्या जगावर थूः करून थुंकेन. जगाचा कायमचा वीट

येईल मला, द्वेष वाटेल. माझा सगळा चांगुलपणा नाहींसा होईल. आणि आजपर्यंत जगांत झाला नाहीं असा वाईट दुष्ट मनुष्य होईन मी... ”

तो एकदम थांबला. त्याचे डोळे आसवांनीं भरून आले. कपाटाकडे जाऊन त्यानं आपला गणवेष टाकला; आणि तिथें ठेवलेले आपले कपडे काढले. ते कसेबसे अंगावर चढवून त्यानं बाहेर धूम ठोकली.

म्हातारा ग्रॅागन किती वेळ तरी जागच्या जागीं स्तब्ध बसून राहिला. अखेर भानावर येऊन त्यानं अंग झटकलं आणि बाटलींतली उरलेली दारू खलास केली. तो उठला अन् त्यानं आजूबाजूस पाहिलं. जिकडे तिकडे विलक्षण स्तब्धता होती!

# २८

मानवी आयुष्यांत एकामागून एक घडणाऱ्या गोष्टींची लहानशी सांखळी पाहिली, कीं वाटतं, छे: याला कांहीं अर्थ नाहीं. परंतु दिवसामागून दिवस जातात, महिने संपतात, वर्षं होतात, आणि मग मात्र छोट्या मोठ्या गोष्टींचा मिळून एक कांहीं तरी सुसंबद्ध आकार आहे असं नीट पहाणाऱ्याच्या लक्षांत येतं. दुष्टपणाची रेषा पुसली जाते अन् तिच्या जागीं औदार्याची रेषा दिसूं लागते. जिथं पाशवी अत्याचार आढळला त्याच्याच जोडीला हृदयाची सुकुमारता स्पष्ट दिसावयास लागते. पापकृत्याचा काळा रंग ज्या ठिकाणीं कांहीं वेळ दिसला त्याच ठिकाणीं सत्कृत्याचा पिवळा धमक रंग नजरेस येतो. आ[illegible] असंहि वाटतं, कीं त्या काळ्या रंगाच्या पार्श्वभूमीवर तो उलट अधिकच [illegible] दिसत आहे...

इथाका गांव अन् त्या गांवांतले लोक यांच्या जीविताचा पटहि असाच हलके हलके स्पष्ट होत होता. अनेक सुरांचं मिळून जीवनसंगीत आकार घेत होतं.

प्रॉगनपुढच्या तारायंत्राचं कडकट्ट कडकट्ट चालूं होतं. जगाच्या काना-कोंपऱ्यांतून बरेवाईट संदेश येत होते व प्रॉगन ते टाईप करीत होता. "मी घरीं यायला निघत आहे," "वाढदिवसानिमित्त अभिष्टचिंतन," "युद्धखात्याला कळविण्यास अत्यंत खेद होतो कीं–," "सदर्न पॅसिफिकच्या डेपोमध्यें भेट," "हें चुंबन घे तुला," "मी खुशाल आहे," "परमेश्वर तुझं रक्षण करो" असे संदेश येत होते व होमर ते पोंचवीत होता.

मकॉले कुटुंबाच्या घरांत हार्पच्या तारा छेडल्या जात होत्या. गाण्याचा आल्हाद घेतला जात होता. लष्करी शिपाई जमिनीवरून, पाण्यांतून, व विमानांतून नव्या नव्या ठिकाणीं चाल करीत होते. दिवस उगवत होते. रात्री सरत होत्या. नवे अनुभव, नवे प्रश्न, नवीं संकटं या सर्वांना त्या शिपायांना तोंड द्यावं लागत होतं. कुणाच्या लक्षांत येत नव्हतं परंतु प्रत्येक व्यक्तीचा चेहरा हलके हलके बदलत होता. मार्कस्, टोबे, होमर, स्पँग्लर, प्रॉगन, ब्याना, युलिसेस, त्याची आई, बेस, मेरी, ऑगी, लायनेल, अशा विविध व्यक्तींच्या जीवितांचा मिळून बनणारा पट आकार घेत होता.

मालगाडी जात होती. निग्रो कठड्याला रेलून गाणं गात होता. ससा आपल्या बिळांतून बाहेर पहात होता. हेंडर्सनच्या बागेंतल्या अलुबुखाराच्या झाडाच्या फळांना सोनेरी लाल रंग चढत होता, व तशाच लाल रंगाच्या पुट-कुळ्या ज्यांच्या तोंडावर आहेत अशीं खोडकर पोरं तीं चोरण्यासाठीं छुपे हल्ले करीत होतीं. खुराड्यांतून मोठी कोंबडी बाहेर पडली कीं तिच्यामागून पिलांचा थवाचा थवा चिंव चिंव करीत धांवत होता, आणि हें सारं युलिसेसची स्वारी पहात होती. होमरचा पाय केव्हांच बरा झाला होता. ईस्टरच्या सणांतला रविवार आला. त्यानंतर आठ दिवसांनीं दुसरा रविवार आला. आणि मग असेच किती तरी रविवार आले आणि गेले.

आज रविवारच होता. चर्चमध्यें मकॉले कुटुंबांतली सर्व मंडळी जमली होती, त्यांच्यांतच मेरी बसली होती. छोटा युलिसेसहि आपल्या जागीं बसला होता. ईश्वराची करणी म्हणा वाटलं तर, पण योगायोग असा, कीं त्याच्याचपुढें बसलेल्या माणसाच्या डोक्याला टक्कल पडलेलं होतं. युलिसेसला वाटत होतं,

त्या माणसाचं तें तुळतुळीत डोकं म्हणजे ज्याकडे तासन्‌तास पहात रहावं अशी अगदीं अभ्यास करण्यासारखी वस्तु आहे. तिचा नुसता आकारच पाहिला तरी किती मोहक होता. जसं कांहीं एक मोठ्या आकाराचं अंडंच. त्या तकतकीत डोक्यावर एके जागीं अवघे पांच सहा केस सोबतीवांचून राहिल्यासारखे उगवले होते, अन् आपण पांच सहाच आहोंत याबद्दल विषादाऐवजीं जणूं त्यांना अभिमानच वाटत होता. पृथ्वीच्या मध्यभागच्या रेषेप्रमाणें त्या तुळतुळीत डोक्याच्या मधोमध जी एक लहान वळकटी होती तिच्या योगानें प्रमाणबद्धतेचं भलतंच सौंदर्य निर्माण झालं होतं. छे छे, इतक्या विलक्षण सुंदर आकृतीचं डोकं युलिसेसच्या दृष्टीस कधीं देखील पडलं नव्हतं !

धर्मगुरु आपल्या उच्च स्थानावर बायबलमधले भाग वाचून दाखवीत होता. सर्व श्रोते भक्तियुक्त अंतःकरणानं पवित्र वचनांचं श्रवण करीत होते. पण युलिसेस त्या माणसाच्या टकलाकडे सारखी टक लावून बघण्यांत गुंतला होता. त्याचं तें निरीक्षण चालू असतांना मध्येंच एक माशी त्यावर येऊन बसली. व तें नुसतं आलंकृतच करून ती थांबली नाहीं तर त्या केशरहित मस्तकाचा पृष्ठभाग ती एखाद्या संशोधकाप्रमाणें तपासून पाहूं लागली. टकलाकडे पहातां पहातां युलिसेसला थोडी डुलकी येऊं लागली होती ती माशी दृष्टीस पडतांच उडाली. त्यानं तिच्या हालचालींकडे क्षणभर पाहिलं व तिला पकडण्यासाठीं त्यानं हळूच हात पुढें केला. त्याच्या आईनं तो वेळींच हलकेच पकडला व धरून ठेवला. परंतु हात गुंतला म्हणून टकलाकडे पहात राहणं अशक्य थोडंच होतं ? युलिसेस पहात राहिला. त्याच्या मनांत कोणताच विचार नव्हता. परंतु त्याचे डोळे उघडे असतांनाच त्याला स्वप्नं पडूं लागलीं. त्याला वाटलं कीं आपल्यासमोर आहे तें टक्कल पडलेलं डोकं नसून एक वाळवंट आहे. मधोमधची ती वळकटी नसून एक ओढा आहे, ते पांच सहा केस म्हणजे नारळाच्या झाडाचं [illegible] अगदीं छोटं बन आहे. आणि ती माशी म्हणजे एक सिंह आहे ! त्याला वाटलं आपण अगदीं उत्तमांतले उत्तम कपडे घातले असून ओढ्याच्या कांठावर आपण उभे आहोंत, आणि पलीकडच्या कांठावर ते सिंह महाराज उभे आहेत, आपण त्याकडे बघत आहोंत, व

सिंहाची स्वारी हलके हलके अगदीं आपल्या समोर येऊन ठाकली असून त्यानं नजर आपल्यावर रोखली आहे...

पवित्र शास्त्राचं वाचन चालूंच होतं...

आतां दूर अंतरावर एक अरब दिसूं लागला. त्यानं लांबच लांब झगा घातला होता, व तो वाळूंत खुशाल झोंप घेत पडला होता. त्याच्या शेजारीं पाण्याची सुरई होती, आणि जवळच एक मॅंडोलिन किंवा तसलंच कसलं तरी वाद्य पडलं होतं. युलिसेस पहात राहिला. तो सिंह हलके हलके त्या अरबाच्या डोक्याजवळ गेला, खालीं वाकला अन् वास घेऊं लागला. मात्र अरबाला खाऊन टाकण्याचा त्याचा विचार दिसेना. निजलेल्या अरबाच्या चेहऱ्याइतकीच त्या सिंहाची मुद्राहि शांत आणि निरुपद्रवी दिसत होती...

पवित्र शास्त्राचं वाचन संपलं. ऑर्गनमधून खूपच जोराचे स्वर निघाले. वाद्य मेळाच्या साथीनं सारे श्रोतृगण 'रॉक ऑफ एजेस' हें गीत गाऊं लागले...

त्याच वेळीं युलिसेसच्या डोळ्यांत पुढील वाळवंटाचा देखावा नाहींसा होऊन त्या ठिकाणीं त्याला समुद्र दिसूं लागला. त्या अथांग पाण्याच्या मधोमध खडकाचा एक सुळका होता त्याला युलिसेसनं धरलं होतं. त्यानं आपलं डोकं आणि हात पाण्याच्या पृष्ठभागावर कसेबसे सावरून धरले होते. या संकटांतून स्वतःचा बचाव कसा करावा म्हणून युलिसेसनं इकडे तिकडे पाहिलं, परंतु जिकडे पहावं तिकडे पाणीच पाणी होतं. परंतु असं झालं तरी युलिसेसनं धीर सोडला नाहीं, अगर आपण कसे तरी सुखरूप पार पडूं याबद्दलचा विश्वास डळमळूं दिला नाहीं. तो खडकाला बिलगून राहिला. अखेर दूर अंतरावर एक भला दांडगा मनुष्य दिसूं लागला. तो सरळ पाण्यावरून चालत चालत जवळ आला, त्यानं युलिसेसला उचलून घेतलं. पण युलिसेस पुन्हां खालीं पडला व पाण्यावर हात पाय मा[illegible]गला. तेवढ्यांत एखादा पाण्यांतला मासा काढून घ्यावा त्याप्रमाणें त्या दांडग्या माणसानं युलिसेसला उचलून घेतलं, पायांवर उभं केलं, आणि त्याला हाताशीं धरून तो पाण्यावरून झपाझप चालूं लागला. दूर एका पांढऱ्या शुभ्र नगरीचे उंच उंच कळस दिसूं

लागले. त्या शहराच्या भोंवतीं हिरव्यागार राई आणि बागा दिसत होत्या. त्या दांडग्या माणसाचा हात धरून युलिसेस त्या नगरीकडे जाऊं लागला....

गीत संपलं. आणि कुणी तरी आपल्याला हालवीत आहे हें पाहून युलिसेसनं एकदम दचकून डोळे उघडले. त्यानं पाहिलं तो त्याचा दोस्त लायनेल धर्मार्थ पैसे जमविण्याची प्लेट पुढें करून उभा होता. युलिसेसनं खिशांत हात घालून आईनं आधीं देऊन ठेवलेलं नाणं काढलं आणि त्या प्लेटमध्यें टाकलं.

एखादी अतिशय गंभीर व गूढ गोष्ट विचारायची असल्याप्रमाणें चेहरा करून लायनेलनं विचारलं, " युलिसेस, तूं आत्मशुद्धि केली आहेस का ?"

" औं ?"

" हें वाच " असं म्हणून लायनेलनं एक धार्मिक चोपडं त्याच्या हातांत दिलं.

त्या चोपड्यावर मोठमोठ्या ठळक ठशांत लिहिलं होतं, " तुम्हीं आत्मशुद्धि केली आहे काय ? केली नसेल तर अजून वेळ गेली नाहीं." युलिसेसनं त्या चोपड्याकडे पुष्कळ वेळ पाहिलं पण काय उपयोग ? त्याला कांहीं त्यावरचा तो मजकूर वाचतां येत नव्हता !

तेवढ्यांत लायनेल पलीकडच्या रांगेंत गेला होता. व एका म्हाताऱ्याला विचारीत होता, " आत्मशुद्धि केली आहे काय ? "

त्या माणसानं अगदीं रागीट नजरेनं लायनेलकडं पाहिलं व त्रासिकपणानं म्हटलं, " जा जा. चालता हो."

लायनेल दूर झाला. परंतु संकटाला न जुमानतां सत्कृत्य करणाऱ्या धर्मवीराच्या आवेशानं त्यानं चोपड्याची एक प्रत त्या माणसाच्या हातांत जातां जातां खुपसलीच. त्या माणसानं चिडून लायनेलच्या अंगावर तें चोपडं उगारलं. लायनेल भिऊन [illegible], परंतु त्याला वाटलं आपण एक मोठं शूर कृत्य केलं.

त्या माणसाच्या बायकोनं त्याला हळूच विचारलं, " काय, आहे काय ? "

तो म्हातारा मनुष्य म्हणाला, "तो पोरटा मला विचारतो आत्म-शुद्धि केली का म्हणून ! आणखी हें चोपडं माझ्या हातांत देऊन आंत पळाला बघ !"

आपल्या नवऱ्याचा हात थोपटीत ती म्हणाली, "बरं जाऊं दे. चीन-मध्यें तीस वर्षं तुम्ही मिशनऱ्याचं काम केलं हें त्या बिचाऱ्याला काय माहीत ?"

ऑर्गनमधून गंभीर स्वर निघत होते. धर्मार्थ पैसे गोळा करण्याचा विधि चालला होता. लायनेल, ऑगी, शँग आणि इथाका गांवांतलीं आणखी किती तरी पोरं एकेक प्लेट हातांत धरून उभीं होतीं. अखेर ऑर्गन वाजायचा बंद झाला त्याबरोबर अगदीं गुपचुप आणि गंभीर चेहरा करून पावलं टाकीत तीं सगळीं पोरं व्यासपीठाकडे गेलीं, तिथल्या टेबलावर त्यांनीं आपल्या हातां-तील प्लेटा एकावर एक अशा रचून ठेवल्या, आणि मग तीं सारींजणं घरीं जावयास निघालेल्या आपापल्या आईबापांकडे गेलीं.

## २९

चर्चमधून परत आल्यावर ऑगीनं खाना उरकला आणि पुढच्या अंगणांत जाऊन मनाशीं बरेच दिवस योजिलेल्या एका महत्वाच्या कामाला प्रारंभ केला. त्याच्या [illegible]ांत एक जुनं टेनिसचं जाळं आलं होतं, आणि या जाळ्याची कांहींतरी उपयुक्त गोष्ट तयार करतां येईल अशी त्याची खात्री होती. त्या जाळ्याची दुरुस्ती करण्यांत तो दंग झाला. [illegible]क्यांत इनॉक नांवाचा एक मुलगा धांवत धांवत एकदम आला, झटकन् [illegible] आणि घाईघाईनं ऑगी-कडे पाहूं लागला. ज्याचं साल निघालं आहे असा एक जुना 'बेस बॉल' चा चेंडू त्याच्या एकट्याच्या मालकीचा होता म्हणजे काय लहान सहान गोष्ट होती? तो चेंडू ताडदिशीं पुनः पुन्हां जमिनीवर आपटायचा अन् उडाला कीं झेलायचा

असा चाळा तो मोठ्या ऐटीनं करीत होता. इनॉक म्हणजे इथाका गांवाच्या बाबा लोकांतली एक बडी असामी होती. कशासाठीं तरी त्याची सदा घाई अन् धांदल उडालेली असे, त्याच्या बरोबरीनं धांवण्यांत कोणी टिकण्यासारखं नसे, आणि बोलतांना तो एवढ्या मोठ्यांदा बोले कीं जणूं तो ओरडतच आहे.

त्यानं खणखणून विचारलं, " ए ऑगी काय करतो आहेस ? "

ऑगी म्हणाला, " जाळं. "

" काय पकडणार आहेस ? मासे ? "

" छे छे ! शिकार. "

ऑगीशीं बोलण्याचा इनॉकला केव्हांच कंटाळा आला होता. तो म्हणाला, " ते राहूं दे, चल, आपण बेसबॉल खेळूं. नाहीं तर पाण्याच्या मोठ्या टाकीकडे जाऊन तिच्यावर चढूं. "

" अं हं. हें जाळं तयार केलं पाहिजे बाबा. "

" पण तें कशासाठीं तयार करतो आहेस ? "

" शिकार पकडायची आहे. "

" अरे पण इथें पकडण्यासारखी शिकार आहे तरी काय ? चलरे, चल. वाटलं तर नदीवर जाऊन डुंबूं या. "

" अं हं. या जाळ्यांत शिकार पकडतों कीं नाहीं बघ. "

" हंः ! त्या फाटक्या टेनिसच्या जाळ्यांत माशी तरी सांपडेल काय रे ? चल, आपण खेळूं. नाहीं तर थिएटराकडे जाऊन दडपून आंत शिरूं. टारझानचा सिनेमा आला आहे. "

ऑगी आपल्याच नादांत होता. तो म्हणाला,

" जाळं कसं काय झालं आहे हें पहायसाठीं आधीं एक कुत्रं पकडणार आहें मी. आणि तें जर क[illegible]र्ता आलं तर मग बातच सोड. "

" खुळाच आहेस. त्या जुन्या जाळ्यांत कांहीं सांपडणार होय ? त्यापेक्षां माझं ऐक. आपण तुरुंगाकडे जाऊं या, अन् तिथल्या कैद्यांशीं बातचीत करूं या. "

ऑगी म्हणाला, " नाहीं रे बाबा, हें जाळं तयार केलंच पाहिजे मला. आणि आज जर का माझा प्रयोग साधला तर मग उद्यां–देखते रहो बच्चंमजी !"

इनॉक म्हणाला, " बच्चंमजी काय बच्चंमजी. इथें शिकार तरी आहे काय पकडायला ? एखादी गाय, दोन कुतरडीं, दहा पांच ससे, आणि कोंबडीचीं पिलं यावांचून इथें आहे तरी काय, माती ? कसली शिकार करणार तूं ?"

ऑगीची श्रद्धा अढळ होती. तो म्हणाला, "या जाळ्यांत अस्वल पकडतों कीं नाहीं बघ."

" अस्वल ? झालं ! अरे तुझ्या जाळ्यांत खेळांतलं अस्वल सुद्धां सांपडायचं नाहीं. उगीच कां मूर्खासारखा वेळ घालवितो आहेस ? चल, आपण चिनी लोकांच्या वस्तींत जाऊं आणि त्यांच्या गल्लींतून जरा भटकूं."

ऑगीनं हातांतलं काम थांबविलं आणि वर पाहून विचारलं, " कां ? चिनी लोकांच्या वस्तींत एकटं जायला भिते आहे वाटतं भागुबाई ?"

इनॉक एकदम म्हणाला, "अरे हट् ! मी भितों होय ? कशालासुद्धां डरणारा गडी नाहीं हा, चिनी लोक काय करतात मला ? अन् समजा ते माझ्यावर चालून आले तरी मी त्यांच्या हातीं सांपडणार थोडाच ? असा सूंबाल्या करीन कीं त्यांनीं पहातच रहावं. मी भलता पळणारा आहे. मला कुणी पकडूं शकणार नाहीं."

" सिंहसुद्धां ?"

" हो हो, सिंहसुद्धां ! अस्वल, वाघ, चिनी लोक–कुणाची माझ्याजवळ यायची काय बिशाद आहे ! साऱ्यांना हां हां म्हणतां मागं टाकीन मी !"

ऑगी म्हणाला, " म्हणजे सिंह एखादे वेळेस सांपडेल पण तूं सांपडणार नाहींस म्हणायचा ?"

" छट् ! मला जगांत कुणी पकडणं शक्य नाहीं. वाटलं तर चल आपण मैदानावर जाऊं. तुझी माझी शर्यत होते कां ? शंभर यार्ड आधीं पुढें जाऊं देतों तुला हवं असल्यास ?"

" म्हणजे तुझ्या बापालासुद्धां तूं ऐकणार नाहींस म्हणायचा ?"

" नाहींच मुळीं ! अरे बाप झाला म्हणून काय झालं ? दमून पडेल धुळींत झालं ! "

तितक्यांत लायनेलची स्वारी या ठिकाणीं आली व विचारूं लागली, "ऑगी, हें काय करतो आहेस रे ? "

ऑगी वर न पहातां म्हणाला, " जाळं करतों आहे. अस्वल पकडणार आहे मी. "

इनॉक लायनेलला म्हणाला, " तूं काय ऐकतोस त्याचं ? माशी सांपडूं दे म्हणजे मिळविली. ए लायनेल, आपण बखळींत जाऊं आणि झेलाझेली खेळूं. हं, येतोस ? "

लायनेलनं आश्चार्यानं विचारलं, " मी ? "

" हो हो, तूं ! चल, तूं माझ्याकडे चेंडू फेंक. वाटेल तितक्यां जोरानं. तुझ्याकडे मात्र मी सावकाश फेंकीन. चल. चल रे. अर्धा दिवस गेलासुद्धां. "

लायनेल म्हणाला, " बरं चल. पण माझ्याकडे तूं चेंडू अगदीं सावकाश फेंकायचं ठरलं आहे हं. झेलण्यांत मी पटाईत नाहीं. माझं हुकतं, अन् मग चेंडू लागतो मला. एकदां माझ्या डोळ्यांवर लागला होता, अन् दोनदां नाकावर बसला होता. "

" अगदीं सावकाश फेंकतो रे. भिऊं नकोस. चल चल. "

इनॉक लायनेलला घेऊन बखळीकडे गेल्यावर ऑगीनं आपला उद्योग पुन्हां सुरूं केला, ठिकठिकाणीं टाके घालून दुरुस्ती केली, व लवकरच एक छानपैकीं चौकोनी जाळं तयार झालं. त्यानं तें ओढून ताणून पाहिलं, व जमिनींत रोंवलेल्या एका मेखेला त्याच्या बाजूची दोन टोंकं बांधलीं. तेवढ्यांत शॅग त्याच्याजवळ आला व विचारूं लागला, " हें काय केलं आहेस रे ? "

ऑगी म्हणाला, " जाळं. शिकार धरायसाठीं. कसं काय जमलं आहे तें पहाणार आहे मी. मला [illegible] करतोस ? "

"हो हो, पण कसं [illegible]णार आहेस रे ? "

ऑगी म्हणाला, " त्यांत काय मोठं ? इथं आराच्या मंडईच्या भिंतीआड मी जाळ्याचं हें टोंक धरून लपून उभा राहतों. तो बघ तिकडे बखळींत

इनॉक खेळतो आहे त्याला तूं हांक मार. तो इकडे पळत येईल, अन् तो इथें येऊन पोहोंचला कीं मी त्याला जाळ्यांत धरीन. इनॉकला पकडणं सिंहाला पकडण्यापेक्षां अवघड आहे. तेव्हां तो जर सांपडला तर मग काय वाटेल तें सांपडेल. लक्षांत आलं ना काय करायचं तें ? हं. हुश्शार ! आतां मी लपतों हं. रेडी. तूं हांक मार इनॉकला. म्हणावं कांहीं विचारायचं आहे."

"अच्छा." असं म्हणून शॅगनं कांहीं वेळ बखळींत खेळणाऱ्या इनॉककडे पाहिलं, आणि मग जोरानं हांका मारल्या, "इनॉक, ए इनॉक !"

खेळतां खेळतां तोंड वळवून इनॉकनं तिकडून ओरडून विचारलं, "काय रे शॅग ?"

"इकडे ये इकडे ये. धांव. एक गंमत विचारायची आहे तुला."

"कोणती गंमत ? विचार कीं."

"इकडे ये, म्हणजे विचारीन. धांव धांव लवकर."

"अच्छाऽऽ !" अशी आरोळी ठोकून इनॉक धांवूं लागला. लायनेलहि त्याच्या मागोमाग निघाला. परंतु आपणहि धूम ठोकावी कीं नुसतं धांवावं याबद्दल त्याच्या मनाचा निश्चय होईना.

इकडे ऑगीनं कुजबुजून शॅगला सांगितलं, "हें ठीक झालं. आतां तूं इकडे येऊन लप. जाळ्याचं एक टोंक मी धरतों, दुसरं तूं धर. हं, अस्सं. इनॉक धांवत येऊन कोपऱ्यापाशीं वळला, कीं आपण जाळ्यासकट त्याच्यावर झडप घालायची. समजलं ना ?"

इनॉक धांवता धांवतां ओरडून म्हणत होता, "शॅग, आलों रे ! आतां आपण पोहायला जायचं बरं काय ! अर्धा दिवस गेला बेट्यांनो. उगीच इथं माशा मारीत रखडायचं म्हणजे काय रे ! आलों बघ !"

आराच्या दुकानापाशीं त्यानं वळण घेतलं त्याबरोबर ऑगी अन् शॅग दोघांनीं झडप घेऊन त्याच्याभोंवतीं जाळं टा[illegible] वाघ सिंह काय धडपड करील अशी इनॉकनं मस्ती केली. आणि त्या दोघां शिकाऱ्यांनींहि आपलं सारं बळ एकवटून त्याला धरून ठेवण्याची शर्थ केली. परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. जाळं तटातट तुटलं आणि इनॉक ऐटींत उभा राहिला.

आपला केस देखील वांकडा झाला नाहीं आणि ऑगीची जिरली याचा आनंद त्याच्या तोंडावर दिसत होता. परंतु जें झालं त्याचं आपल्या दृष्टीनं कांहींच महत्व नव्हतं असं दाखवून त्यानं फक्त हातांतला चेंडू ताडदिशीं आपटून झेलला व म्हटलं,

" ए ऑगी, आपण जाऊं या आतां. तुझ्या त्या जाळ्यांत किडा मुंगी देखील सांपडायची नाहीं. चला रे सगळे ! थांबतां काय ?"

ऑगीनं जाळं गुंडाळून अंगणांत फेंकून दिलं व म्हटलं, " चला आपण सगळे तुरुंगाकडे जाऊं या आणि कैद्यांची मजा बघूं या."

ऑगी, इनॉक, शॅग आणि त्यांच्यापासून जरा अंतरावर चालणारा लायनेल अशा चौघांचं तें टोळकं मग तुरुंगाकडे निघालं. लवकरच इनॉक इतरांच्या पुष्कळच पुढें गेला आणि मागं मान वळवून ओरडूं लागला, ' जलदी चला रे. पाऊल उचला जरा. इतकं सावकाश काय बुवा चालतां." तितक्यांत एका झाडावर त्याला एक पक्षी दिसला, त्याच्याकडे त्यानं हातांतला चेंडू भिरकावला. परंतु त्याचा नेम लागला नाहीं.

## ३०

याच वेळीं गांवाबाहेरच्या रस्त्यावरून एक मोटर निघाली होती. तिचा टप खालीं केला होता. आंत स्पॅंग्लर व डयाना बसलीं होतीं. सहज गंमतीनं निघालीं होतीं तीं दोघं.

एका द्राक्षाच्या मळ्या[illegible] कडेला उगवलेल्या झाडांच्या रांगेकडे बोट दाखवून स्पॅंग्लर ड्यानाला म्हणत होता, " हीं झाडं कशाचीं माहीत आहेत ना ? अंजिराचीं ! मळ्यांत मस्कती द्राक्षांची लागवड केलेली आहे. तीं ऑलिव्हचीं झाडं बरं का. आणखी तें बघ, तें डाळिंबाचं झाड आहे." गाडी

पुढें पुढें चालली होती. स्पॅंग्लर मोठ्या उत्साहानं सांगत होता, "या बागेंतलीं द्राक्षं मस्कती नाहींत, मलागा जातीचीं आहेत. तीं पीचची झाडं. हीं अलूबुखारची. खरोखर या दरींतल्या शोभेसारखी शोभा साऱ्या जगांत कुठें नसेल. तें त्या तिथें दिसतं ना, तें वॉलनटचं झाड. आणखी तिकडे तें झाड आहे तें क्वचित् पहायला मिळतं. पर्सिमॉनचं झाड आहे तें. जें जें म्हणून सुंदर आहे तें या दरींत उगवतं."

ज्याना म्हणाली, "ओ, डार्लिंग ! तुम्हाला झाडाचं फार वेड आहे. आहे ना ?"

"मला सगळ्या गोष्टींचच वेड आहे." असा उद्गार काढून स्पॅंग्लर लगेच म्हणाला, "आतां मला विचारशील तुझं वेड आहे का. पण विचारूं नकोस. कारण तें आहे. माझं तुझ्यावर प्रेम आहे. साऱ्या जगावर आहे. जगांतल्या प्रत्येक वस्तूवर आहे." त्यानं आपला आवाज उंच केला व जवळ जवळ ओरडून कुठल्या तरी पुस्तकांतला उतारा पाठ म्हणून दाखविल्याप्रमाणें म्हटलं, "आणि स्फटिकासारखी स्वच्छ अशी जीवनसरिता माझ्या दृष्टीस पडली. तिच्या दोन्हीं बाजूंस वृक्ष होते. त्यांना बारा जातींचीं फळं आलीं होतीं. आणि मानवांच्या अंतःकरणांची व्यथा बरी करण्याचा गुण ज्यांत आहे अशीं पानं त्या वृक्षांच्या फांद्या फांद्यांवर दिसत होतीं..."

स्पॅंग्लर एकदम थांबला व त्यानं ज्यानाच्या डोळ्याच्या कोपऱ्याचा मुका घेतला.

ती म्हणाली, "ओ, डार्लिंग ! फार सुखांत आहांत तुम्ही ?"

स्पॅंग्लर घाई घाईनं म्हणाला, "आहे आहे. सुखाच्या पाठीमागें फारसा धांवत नाहीं मी. परंतु मला जर कुणी विचारलं सुख म्हणजे काय ? तर मी म्हणेन आत्ता जें कांहीं मिळत आहे तसलंच कांहीं तरी तें असलं पाहिजे......ओहो, तें बघ. आणखी ऑलिव्हचीं झाडं दिसत आहेत." त्यांनं आपला हात तिच्याभोंवती टाकला व म्हटलं, "मुलगा मुलगी कांहीं कां होईना, परंतु आपल्याला आतां लवकर मूल पाहिजे असं मला झालं आहे ठाऊक आहे ना तुला. बाकी मला हौस अशी आहे कीं एक छोटी

मुलगी असावी. अगदीं तुझ्यासारखीं दिसणारी. इकडे तिकडे बागडणारी. बोलली कीं वाटावं तूंच बोलत आहेस. पूर्वी मला वाटत असे कीं तुला कांहीं एक अक्कल नाहीं. परंतु जिला मूल होतं त्या स्त्रीला मूर्ख कसं म्हणायचं ? आणि तुला तर होणार."

डयाना म्हणाली, "होऊं दे. केव्हां एकदां माझं लाडकं पहायला मिळेल असं झालं आहे मला. मी भितें म्हणतां काय ? नाहीं मुळींच नाहीं. अगदीं नाहीं."

नदीकांठच्या रस्त्यानं जातां जातां मोटर एका मोकळ्या मैदानापाशीं आली. वनभोजनासाठीं लोक या ठिकाणीं नेहमीं येत. आजहि पांच ठिकाणीं पांच मोठमोठाले घोळके जमलेले दिसत होते. इटालियन, ग्रीक, सर्ब्ज, आर्मेनियन, अमेरिकन, अशा लोकांचे समुदाय होते ते. त्यांचं नृत्यगायन चाललेलं होतं. प्रत्येक घोळक्याची तऱ्हा वेगळी होती. एकेका घोळक्यापुढें गाडी थांबवून स्पॅंगलर गाणं ऐकत होता, नाच पहात होता आणि डयानाला सांगत होता, "हे ग्रीक लोक. यांच्या गाण्यावरनं मी ओळखतों. एका ग्रीक कुटुंबाशीं पूर्वी एकदां माझी ओळख होती. ती मुलगी कशी नाचते आहे बघ. त्या जुन्या देशांतल्या नृत्याची ही तऱ्हा...ही पार्टी आर्मेनियन लोकांची आहे. खूप भटजी अन् खूप पोरं ही यांचीं निशाणी. परमेश्वरावर श्रद्धा ठेवावी आणि खूपच खूप मुलं होऊं द्यावीं एवढ्या दोनच गोष्टी या लोकांना समजतात. तो म्हातारा नाचतो आहे पाहिलस का ? अन् यांचं गाणं ऐक...ते पलिकडे लोक आहेत ना ? ते क्रोट आणि सर्ब्ज आणखी इतरहि असतील. पण सारे सारखेच."

त्यानं हाताच्या विळख्यानं ड्यानाला जवळ ओढल्यासारखं केलं अन् म्हटलं, "आपल्याला होणारी मुलगी या सर्वांसारखी असावी अशी माझी इच्छा आहे. ग्रीक, आर्मेनियन, इटालियन, पोलीश, रशन, फ्रेंच सगळ्या लोकांतले थोडे थोडे गुण तिच्या ठिकाणीं असावेत..."

गाडी अखेर अगदीं कडेच्या थव्याजवळ आली. हा थवा सगळ्यांत प्रेक्षणीय होता. निदान दंग्याच्या बाबतींत त्यांची सर्वांत वर कडी होती.

त्यांच्या गाण्याची लय कमालीची द्रुत होती. स्वर जणूं कांहीं एकमेकांशीं झटापट करीत होते, त्यांची नुसती घाई उडाली होती. नृत्यहि त्याच थाटाचं होतं. त्यांकडे पहातांच स्पॅंग्लर उद्गारला,

" हे अमेरिकन बघ! पण अमेरिकन याचा अर्थ काय? ज्याच्यांत ग्रीक आहेत, रशन आहेत, जर्मन, इटालियन, फ्रेंच, इंग्लिश, आयरिश, स्कॉच, सारे लोक आहेत! अमेरिकन! ऐक, ऐक त्यांचं गाणं."

तीं दोघं कांहीं वेळ पहात व ऐकत राहिलीं अन् नंतर मोटार पुढें चालूं झाली.

# ३१

सॅन फ्रॅन्सिस्कोहून तिसऱ्या प्रहरीं येणारी पॅसेंजर गाडी इथाकाच्या स्टेशनांत येऊन थांबली. नऊ उतारु खालीं उतरले त्यांत तीन लष्करी शिपाई होते. या तिघांपैकीं जो डाव्या पायानं थोडासा लंगडत होता तो एकटाच हलके हलके चालूं लागला, व स्टेशनाच्या बाहेर पडला. दुसरे दोघे होते ते मिळून निघाले.

त्यांपैकीं एकजण दुसऱ्याला म्हणाला, "पाहिलंस भाई. हें इथाका गांव. हें आपलं घर."

दुसरा म्हणाला, " वा वा! मला पाहून ठेवूं दे माझ्या गांवाकडे." हर्षातिशयानं त्यानं भुंग्याच्या आवाजाप्रमाणें गुंमतीदार आवाज काढला, व म्हटलं " माझा गांव! माझं घर! भाई, या वेळीं तुला काय वाटतं कोण जाणे. परंतु मला काय करावंसं वाटतं तें बघ." त्यानं चटकन् गुडघे टेकले आणि रस्त्याचं चुंबन घेतलं. तें एकदांच घेऊन तो थांबला नाहीं, तर "आणखी एक!

आणखी एक !" असं म्हणत त्यानं अक्षरशः आपल्या जन्मभूमीचीं पुनःपुन्हां चुंबनं घेतलीं.

त्याचा दोस्त म्हणाला, "हं हेन्री, पुरे पुरे. ऊठ. लोक पहाताहेत बघ. त्यांना वाटेल कीं लष्करांत गेलेलीं माणसं वेडीबेडीं होतात कीं काय ? त्यांची तशी समजूत व्हावी अशी इच्छा आहे का तुझी ?"

"छे छे, तशी नाहीं. परंतु मला राहवतच नाहीं. माझा गांव !" त्यानं अखेरचं चुंबन घेतलं, व मग मात्र उठून आपल्या दोस्ताचा हात पकडून म्हटलं, "डॅनी, चल जाऊं या."

डॅनी म्हणाला, "तुला पाहतांच तुझीं माणसं चकित होतील का रे ? मला पाहिल्याबरोबर माझीं माणसं काय करतात बघ तरी. मला वाटतं त्यांना वेडच लागेल."

बोलतां बोलतां ते आराची मंडई ज्या रस्त्यांत होती तिथें येऊन पोंचले. मग दोघांनींहि धूम ठोकली, आणि एकमेकाला लागून असलेल्या दोन घरांत आगाशींत ते जाऊन उभे राहिले. दोन्ही घरांचीं दारं एकाच वेळीं उघडलीं गेलीं, आणि आंतून आलेल्या आयांनीं त्या दोन तरुणांना एकदम आलिंगन दिलं. मग घरांतून पुरुष, मुलगे, आणि मुली यांची झुंबड आली, आणि आलिंगनांची एकच घाई उडाली. ती चालू असतांना हेन्रीचा बाप आलफ राईफ याच्या लक्षांत आलं कीं एक मोठी चूक झाली आहे, आणि तो ओरडूं लागला,

"अरे घोटाळा झाला आहे. घोटाळा झाला आहे. हा आमचा हेन्री नव्हे. शेजारचा डॅनी आहे. हा मिसेस बूथचा मुलगा. आमचा हेन्री तो पहा तिकडे मिसेस बूथचीं चुंबनं घेत आहे. अग ए, सोड सोड, आपला हेन्री नव्हे तो. डॅनी आहे डॅनी. नीट बघ."

हेन्रीची आई उद्‌गारली, "अरे तूं डॅनी होय ? आम्हाला वाटलं आमचा हेन्रीच !" आणि ती मोठमोठ्यानं हंसूं लागली.

डॅनी हंसत म्हणाला, "तरी कांहीं बिघडलं नाहीं हो ! आतां मी जातों आमच्या आईकडे. तुम्हीहि चला कीं आमच्या घरीं ?"

शेजारच्या घरांपुढें हेन्री मिसेस बूथला म्हणाला, " डॅनीची आई, मी डॅनी नाहीं, हेन्री आहे. मजाच झाली म्हणायची. पण कांहीं हरकत नाहीं. तो पहा तुमचा डॅनी माझ्या आईचे मुके घेतो आहे. मी आतां जातों तिकडे. तुम्हीहि चला कीं ! "

दोन्ही घरांच्या पुढें सुंदर हिरवळीनं आच्छादिलेलीं छोटीं छोटीं आंगणं होतीं. त्या अंगणांत दोन्ही घरांतल्या मंडळींची धांवपळ सुरू झाली. ज्यांनीं त्यांनीं आपापले मुलगे ओळखले आणि चुंबनालिंगनविधीची एकच धांदल उडून राहिली. एकीकडे ती पहातां पहातां हेन्रीचा म्हतारा बाप आल्फ अजूनहि ओरडत राहिला,

" काय घोटाळा पहा ! अरे आपापली घरं देखील विसरलीं हीं पोरं. अग ए, आतां तरी आपल्या हेन्रीला नीट पाहिलंस का ? हेन्री, अरे खुशाल डॅनीच्या आईकडे जाऊन तिच्या गळ्यांत पडलास ? छ छे, काय घोटाळा पहा. बाकी कांहीं बिघडलं नाहीं म्हणा ! "

# ३२

होमर, बेस, युलिसेस संध्याकाळीं सहल करायला म्हणून निघाले होते. त्यांच्याबरोबर मेरी देखील होती. वाटेंत त्यांना सिनेमाचं थिएटर लागलं, व त्याच्या पुढच्या गर्दीत लायनेल उभा असलेला त्यांना दिसला. होमर थांबला व त्यानं विचारलं, " कोण लायनेल ? सिनेमाला जाणार आहेस होय रे ? "

लायनेल म्हणाला, " आपल्याजवळ पैसे नाहींत बाबा. "

" मग इथें बारींत कशाला उभा राहिला आहेस ? "

" मी, ऑगी, शॅग, इनॉक सारे मिळून कैद्यांची गंमत पहायला आलों होतों. पण मग मध्येंच त्यांनीं मला घालवून दिलं. म्हणाले, बास बास लायनेल ! कुठें जावं तें मला समजेना ! इथें ही गर्दी दिसली तेव्हां म्हटलं आपणहि रहावं उभं. "

" किती वेळ राहिला आहेस असा उभा ? "

" एक घंटा झाला असेल. "

होमरनं खिशांतून पैसे काढून त्यांच्या पुढें करीत म्हटलें, " मग तुला पहायचा आहे का सिनेमा ? "

" कुणास ठाऊक ? मला कुठें जायचं कळेना म्हणून राहिलों उभा. सिनेमा पहायची मला नाहीं आवड. "

" मग आमच्या घरीं चल तर. आम्हीं सहज फिरायला निघालों आहोंत. जरा वेळ रस्त्यांतली गंमत पाहून घरीं जाणार आम्ही. चल, आमच्या-बरोबर चल " असं म्हणून बारीसाठीं लावलेला दोर होमरनं उचलून उंच केला.

दोराच्या खालून बाहेर निसटत लायनेल म्हणाला, " थँक्स. उभं राहून राहून थकून गेलों होतों मीं.

मग त्याला बरोबर घेऊन ती सारा मंडळी पुढें चालूं लागली. चालतां चालतां मध्येच एके ठिकाणीं होमरचा हात ओढून युलिसेस एकदम थांबला. आणि रस्त्यावर कांहींतरी पडलेलं होतं तें दाखवूं लागला. ती एक आणेली होती. तिच्यावरची लिंकनची मुद्रा स्वच्छ दिसत होती.

होमर म्हणाला, " अरे आणेली ! युलिसेस उचल उचल. हा मोठा शकून आहे. ती घाल खिशांत आणि नेहमीं ठेव बरं कां.

युलिसेसनं ती आणेली उचलली आणि ' बघितलंत माझं नशीब ' अशा अर्थानं हास्य करीत सगळ्यांकडे ऐटीनं पाहिलं.

वाटेंत त्यांना तारऑफिस लागलं. तेव्हां होमर थांबला, व त्या इमारती-कडे पहात म्हणाला.

" हें आमचं ऑफिस. इथें मीं काम करूं लागलों त्या गोष्टीला आतां जवळ जवळ सहा महिने झाले. हे सहा महिने म्हणजे वर्षानुवर्षांसारखें वाटलें मला. "

त्यानं ऑफिसमध्यें बोलावून पाहिलं व म्हटलं, " तो पहा ग्रॉगन. आज-सुद्धां तो ऑफिसमध्यें काम करीत असेल अशी कल्पनासुद्धां नव्हती मला. तुम्हीं सगळीजणं इथें थांबा हं. एका मिनिटांत आलोंच मी. "

तो घाईनें आंत शिरला. तारायंत्र कडकट्ट कडकट्ट करीत होतं. परन्तु संदेश उतरून घेण्याऐवजीं ग्रॉगन हातावर डोकं धरून पडला होता. त्याच्या-जवळ जाऊन होमर ओरडला " ग्रॉगन ग्रॉगन ! " परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं.

होमर झटकन् धांवत बाहेर आला व बेसला म्हणाला, " ग्रॉगन कांहीं शुद्धीवर नाहीं. त्याची काळजी घेतली पाहिजे मला. तुम्हीं सगळीजणं घरीं जा. मी जरा वेळानं येईन. तुम्हीं जाल ना संभाळून ? "

बेस म्हणाली " हो जाऊं ! "

ग्रॉगन म्हणजे कोण त्याची लायनेलला कल्पना नव्हती, पण तरी त्यानं विचारलं, " होमर, काय झालं रे त्याला ? "

होमरनं बेसला पुन्हां सांगितलं, " मला परत धांवलं पाहिजे ऑफिसांत. तुम्हीं जाल ना ? हं, जा जा. " नंतर तो लायनेलला म्हणाला, " लायनेल कांहीं झालं नाहीं रे. त्याचं आतां वय झालं आहे येवढंच. "

मग तो धांवत परत ऑफिसात आला आणि त्यानं ग्रॉगनला जोरानं हालवून पाहिलं. त्यानं पाणी घेतलं आणि म्हाताऱ्याच्या डोक्यावर मारलं. ग्रॉगननं डोळे उघडले तेव्हां तो म्हणाला, " मी आहे मी. होमर. तुम्हीं आज कामावर याल याची मला कल्पना नव्हती. असती तर मी आधींच आलों असतों. रविवारीं तुम्हीं कामावर येणार असलां म्हणजे मी कधीं चुकतों का ? मी आपला सहज या रस्त्यानं जात होतों, आतां मी कॉफी घेऊन येतों हं. "

म्हाताऱ्या तारमास्तरनं मान हालविली, मग त्यानं तारायंत्रांशीं कडकट्ट केलं आणि तारेचा एक कोरा फॉर्म टाइपरायटरवर घालून संदेश उतरून घेण्यास प्रारंभ केला.

होमर कॉर्बेटच्या हॉटेलांत धांवत गेला आणि म्हणाला, " कॉफी द्या. "

दुकानावरचा नोकर म्हणाला, " ताजी कॉफी तयार होते आहे. दोन मिनिटं थांब. "

" तयार नाहीं का मुळींच ? "

" नाहीं रे. आत्तांच सरली. पण आत्तां ताजी तयार होईल बघ. "

" म्हणजे पंचाईत झाली म्हणायची. मी ऑफिसांत जातों आणखी परत येतों बरं का. तंवर कॉफी तयार होऊं दे. "

होमर परत आला तेव्हां ग्रॅागन संदेश उतरून घेत नव्हता. त्याला गद्-गदा हालवून होमर म्हणाला, " ग्रॅागन ग्रॅागन ! तार येते आहे ती उतरून घ्या ना ? तिकडे कॉफी तयार होत आहे. मी धांवत जाऊन आणतोंच. पण ती तार येते आहे ती उतरून घ्या. "

होमर बाहेर धांवला.

म्हातारा ग्रॅागन टाईपरायटरमधल्या कागदावर जो मजकूर त्यानं उत-रून घेतला होता त्याकडे बघत राहिला.

मिसेस केट मकॉले

२२२६ सॅन्टा क्लॅरा ॲव्हेन्यू.

इथाका, कॅलिफोर्निया

युद्धखात्यास तुम्हाला कळविण्यास

अत्यंत दु:ख होत आहे, कीं तुमचा

मुलगा मार्कस...

ग्रॅागननं खुर्चीवरून उठण्याचा प्रयत्न केला. परंतु त्याच्या छातींत एक-दम कळ आली. त्यानं छातीपाशीं आपलीं बोटं आवळून धरलीं. दुसऱ्याच क्षणीं तो कोलमडून पडला. त्याचं मस्तक टाईप रायटरवर टेकलं गेलं.

हातांत कॉफीचा कप घेऊन होमर परत ऑफिसांत आला. ग्रॅागनजवळ जाऊन त्यानं कॉफी टेबलावर ठेवली. तारायंत्राचं कडकट्ट आतां थांबलं होतं. ऑफिसांत सारं अगदीं स्तब्ध झालं होतं.

होमर ओरडून म्हणाला, " ग्रॅागन, ग्रॅागन ! असं काय करतां ? " त्यानं ग्रॅागनला उचलल्यासारखं केलं व त्याचा चेहरा वळविला. तें करतांना टाईप-

रायटरमध्यें जो अपुरा संदेश पडला होता त्याकडे त्याची नजर गेली. त्यानं तो वाचला नाहीं, आणि तरी तो त्याच्या ध्यानांत आला. त्याचं मन म्हणूं लागलं, छे छे, हें खोटं आहे. मात्र त्याच्या शरीरांतलं सारं बळ एकदम नाहींसं झालं. हातांत सांवरून धरलेल्या ग्रॅागनची त्याला आठवण झाली. तो म्हणाला, "ग्रॅागन !"

तितक्यांत रविवारीं पाळी करणारा फेलिक्स नांवाचा तारेचा शिपाई ऑफिसांत आला. त्यानं विचारलं, "काय रे होमर, काय आहे ? म्हाताऱ्याला काय झालं ?"

"मेलाय्." येवढाच उद्गार होमरच्या तोंडून बाहेर पडला.

"तुला वेड लागलं काय ?"

"वेड नाहीं लागलं. तो मेला आहे." उसळून बोलल्याप्रमाणें होमर म्हणाला.

फेलिक्स म्हणाला, "थांब, मी स्पॅंग्लरला बोलावतों." त्यानं टेलिफोनवर एक नंबर घेतला, थोडा वेळ वाट पाहिली, व नंतर टेलिफोन बंद करीत तो म्हणाला, "स्पॅंग्लर घरीं नाहीं. आतां कसं करायचं रे ?"

होमरनं कांहीं एक उत्तर दिलं नाहीं. टाईपरायटरमधल्या त्या कागदाकडे तो एखाद्या वेड्यासारखा पहात राहिला. फेलिक्स त्याच्याजवळ आला व त्यानं अर्धवट टाईप केलेली व टाईपरायटरवर राहिलेली तार वाचून पाहिली. त्यानं होमरला म्हटलं,

"अरे, तार पुरती आलेलीच नाहीं. तुझा भाऊ कदाचित् नुसता जखमीच झालेला असेल..."

होमरनं एकदां ग्रॅागनकडे पाहिलं आणि म्हटलं, "अं हं. यानं ती सबंध तार ऐकलेली आहे. टाईप केली नाहीं, पण ऐकली आहे."

फेलिक्स म्हणाला, "ऐकलं असेल किंवा नसेलहि...स्पॅंग्लरना पुन्हां फोन करून पाहूं का ? कदाचित् ते आतां असतील घरीं."

होमर कांहींच बोलला नाहीं. त्यानं फक्त एकदां चहूंबाजूला पाहिलं. तो अगदीं संतापानं आणि जोरानं थुंकला. मग तो बसला आणि नजर सरळ

खिळून धरल्याप्रमाणें बघत राहिला. त्याच्या डोळ्यांत आंसवाचं टिपुसदेखील नव्हतं.

बाहेर मोटारीचं हॉर्न वाजलं. फेलिक्स धांवत बाहेर गेला आणि पहातो तों मोटारींत स्पॅंग्लरसाहेब बसला होता. तो घाईघाईनं म्हणाला,

" बरं झालं आलांत. मी सारखा तुमच्या घरीं फोन करतों आहे. आंत ऑफिसांत कांहीं तरी भलताच प्रकार झाला आहे. ग्रॅागन बेशुद्ध पडला आहे. होमर म्हणतो तो मेला आहे."

गाडींत ड्याना बसलेली होती. तिला स्पॅंग्लर म्हणाला, " तूं घरीं जा. मी नंतर येईन. परंतु जेवणासाठीं माझी वाट पाहूं नकोस. वाटलं तर तूं आईकडे जा आणि तिकडेच नीज."

तो खालीं उतरला व त्यानं तिचं चुंबन घेतलं. ती म्हणाली, "ऑल राईट, डार्लिंग."

स्पॅंग्लर ऑफिसांत धांवत गेला. त्यानं प्रथम ग्रॅागनकडे पाहिलं, नंतर होमरकडे पाहिलं. मग तो फेलिक्सला म्हणाला, " डॉक्टर नेल्सनला फोन कर पाहूं. नंबर ११३३. त्यांना म्हणावं ताबडतोब इकडे या."

त्यानं ग्रॅागनला खुर्चीतून उचलून ऑफिसला लागून असलेल्या खोलींत नेलं आणि तिथल्या कोचावर ठेवलं. तो परत आला व होमरकडे पाहून म्हणाला, " तूं उगाच दुःख करूं नकोस, ग्रॅागन फार थकलेलाच होता. त्याची इच्छा होती त्या प्रकारचं मरण त्याला आलं. तेव्हां आपण दुःख करीत बसण्यांत अर्थ नाहीं."

तारायंत्राचा कडकट्ट कडकट्ट आवाज झाला म्हणून स्पॅंग्लर त्या टेबलापाशीं गेला. तो ग्रॅागनच्या खुर्चीत बसला तेव्हां अपुरी टाईप केलेली ती तार त्याच्या दृष्टीस पडली. तिच्याकडे त्यानं खूप वेळ पाहिलं, आणि मग त्यानं होमरकडे पाहिलं. जिकडून ती तार आली होती तें स्टेशन त्यानं घेतलं, व त्या तारेंतला उरलेला मजकूर विचारला. तिकडून सबंध संदेश पुन्हां आला. स्पॅंग्लरनं इकडून सांगितलं, कीं कांहीं वेळ तारा धाडूं नका.

मग तो उठून आपल्या खुर्चीकडे गेला आणि कशाकडेच नव्हे अशा प्रकारें वेड्यासारखा बघत खुर्चीवर बसून राहिला. त्याच्या हाताला टेबलावर ठेवलेलं तें शकुनाचं अंडं लागलं. आपण काय करतों त्याकडे लक्ष न देतां स्पँग्लर तें अंडं उचलून टेबलावर आपटूं लागला. त्याची कवची फुटली ती त्यानं काढून टाकली आणि आंतून बैदा बाहेर पडला तो एखाद्या खुळ्यासारखा खाऊन टाकला. कवचीच्या चुऱ्याकडे त्यानं पाहिलं तें अशा रीतीनं कीं जणूं तो चुरा तिथें त्या टेबलावर कसा आला तें त्याचं त्यालाच समजेना. त्यानं तो झटकन् केराच्या टोपलींत फेंकून दिला.

तो फिलिक्सला म्हणाला, " हॅरी बर्क तारमास्तर माहीत आहे ना तुला? त्याला बोलाव. म्हणावं असशील तसा ये. आणि डॉक्टर आले, कीं त्यांना म्हणावं नीट काळजी घ्या. मी थोड्याच वेळांत परत येऊन त्यांना काय तें सांगेनच. परंतु तंवर संभाळ म्हणावं. "

तेवढ्यांत होमर आपल्या जागेवरून उठला होता. तो टाईप रायटरजवळ गेला व त्यांतले कागद त्यानं बाहेर काढले. त्या अपुऱ्या तारेची कार्बन कॉपी त्यानं तारेच्या हुकाला अडकवली, अस्सल प्रतीची घडी केली, पाकिटांत घातली आणि तें पाकिट त्यानं आपल्या कोटाच्या खिशांत घातलं.

स्पँग्लर त्याच्याजवळ आला, व त्याच्या गळ्याभोंवतीं हात टाकून म्हणाला, " होमर, चल, आपण थोडे बाहेर जाऊं. "

ते दोघे मिळून बाहेर पडले. पांच पंचवीस पावलं जाईपर्यंत दोघांच्याहि तोंडून शब्द बाहेर पडला नाहीं. शेवटीं होमर म्हणाला, " अशावेळीं मनुष्यानं कसं वागायचं ? " अगदीं हलक्या आवाजांत आणि शांतपणें तो बोलत होता. " संताप येतो, परंतु कुणावर रागवायचं-कुणाचा द्वेष करायचा-हें कळत नाहीं. जें झालं त्याला जबाबदार कोण याचा मी विचार करतों आहे, परंतु कोण तें कळत नाहीं. जें घडलं तें कुणामुळें तें समजत नाहीं. मतिच चालेनाशी होते. आणि वाटतं आतां मी करूं तरी काय ? सांगू तरी काय ? प्रेम कुणावर करूं ? आणि जिवंत तरी कसा राहूं ? "

त्या दोघांच्या समोरून ऑगी वगैरे मुलांचं टोळकं येत होतं त्या सर्वांनीं होमरला ' गुड इव्हिनिंग ' केलं, होमरनंहि प्रत्येकाचं नांव घेऊन उलट ' गुड इव्हिनिंग ' केलं. आतां सूर्य जवळ जवळ क्षितिजाखालीं गेला होता. आभाळ तांबडं झालं होतं. गांवावर अंधार पसरत होता.

होमर पुढें बोलूं लागला, " द्वेष कुणाचा करावा तेंच कळत नाहीं मला. त्या दिवशीं मी शर्यतींत पळत असतांना बायफील्डनं मला आडवून पाडलं. परंतु मला त्याच्याबद्दल सुद्धां द्वेष वाटत नाहीं. माझ्या मनांत येतं, त्याचा स्वभावच तसा आहे त्याला काय करायचं. परंतु जगांत वाईट गोष्टी कां घडतात तें कळत नाहीं. त्या कोण घडवितं तें समजत नाहीं. मनाचा सारा घोंटाळा होतो. वाटतं बाकीचं सारं जाऊं दे, परंतु माझ्या भावाचं काय ? तो गेला म्हणजे कुठें गेला ? असा कां गेला ? या प्रश्नाचं उत्तर मला पाहिजे. अशी अवस्था् पूर्वी कधीं माझ्या अनुभवाला आली नव्हती. माझे बाबा वारले, पण त्यांची गोष्ट वेगळी होती, त्यांच्या वांट्याला पुष्कळ आयुष्य आलं होतं, त्यांना मुलं बाळं झालीं होतीं. त्यांनीं संसार केला होता. त्यांच्या मृत्यूचं आम्हांला दुःख झालं, परंतु संताप वाटला नाहीं. आतां मला संताप वाटतो आहे. आणि संतापायचं कुणावर तें मात्र कळत नाहीं, आपला शत्रू कोण ? तुम्ही तरी मला सांगा. "

स्पँग्लर कांहीं वेळ स्तब्ध राहिला. मग तो म्हणाला, " मला एवढं माहीत आहे, कीं अमुक एक माणूस किंवा अमुक लोक आपले शत्रू नाहींत त्यांना शत्रू म्हणायचं म्हणजे मीच माझा शत्रू असं म्हणण्यासारखं आहे. जगांतले लोक भिन्न भिन्न नसून त्या सर्वांची मिळून एकच व्यक्ति बनलेली आहे. तेव्हां कुणाचाहि द्वेष करणं म्हणजे आपण आपलाच द्वेष करण्यासारखं आहे. असा द्वेष ज्याला करायचा असेल त्याचा एकच मार्ग उरतो, तो हा कीं त्यानं आपलं शरीर टाकून जावं, लोकांतून उठून जावं, हें जग सोडावं. या जगांतून जाण्याची तुझ्या भावाची इच्छा नव्हती. त्याला रहायचं होतं. अर्थात् तो राहिलच. "

होमर म्हणाला, " ते कसं ? तो राहील कसा ? "

" तें मला सांगतां येत नाहीं. परंतु तो राहील अशी श्रद्धा ठेवावी असं मला वाटतं. तो राहील याचा अर्थ तुझ्या रूपानं राहील, तुझा छोटा भाऊ युलिसेस याच्या अथवा तुम्ही सारींजणं मार्कस्‌वर जें प्रेम करतां त्या प्रेमाच्या रूपानं राहिल असं समज. "

" नाहीं नाहीं! अशा समजुतीनं माझं समाधान होणार नाहीं. मला माझा भाऊ माझ्या डोळ्यांनीं पहायचा आहे. तो चालतांना बोलतांना दिसला पाहिजे. त्याच्याशीं मला बोलतां आलं पाहिजे. त्याचा आवाज, त्याचं गोड हंसणं मला ऐकतां आलं पाहिजे. पूर्वी मी करीत असे तशी त्याच्याशीं मला दंगा मस्ती करतां आली पाहिजे. परंतु असा तो मला कुठें भेटेल? मी दाही दिशांना माझ्या नजरेनं त्याला शोधतों, पण मला तो कुठंच दिसत नाहीं. भोंवतालच्या साऱ्या वस्तू, आणि सारीं माणसं मला एकदम निराळीं दिसूं लागलीं आहेत. मला आतां कांहींच सुंदर वाटत नाहीं. सौंदर्याचा अंशच सग-ळ्यांतून निघून गेल्यासारखं मला वाटतं. या इथाका गांवांतली कोणतीच गोष्ट मला पूर्वीसारखी दिसत नाहीं. कारण माझा भाऊ मार्कस् आतां कशाकडेच पहाणार नाहीं! "

ते आतां जुन्या तुरुंगावरून चालले होते. पलीकडे खेळांचं मैदान होतं. स्पँग्लर म्हणाला,

" केवळ तुझं सांत्वन करावं म्हणून मी बोलतों आहे असं तूं समजूं नकोस. कारण सांत्वन करणं अशक्य आहे हें मला माहीत आहे. परंतु जें माणूस चांगलं असतं तें कधीं मरत नाहीं हें लक्षांत ठेव. तुझा मार्कस् तुझ्या दृष्टीस पुष्कळदां पडेल. तुला तो रस्त्यांत भेटेल, घरांत, बाजारांत, द्राक्षांच्या मळ्यांत, नदी-किनारीं, अनेक ठिकाणीं भेटेल. किंबहुना ज्या ज्या वस्तूंनीं हें जग शोभिवंत केलेलं आहे त्या त्या वस्तूंत मार्कस् आहे असं तुला कळून येईल. जीवनाचं स्फुरण जिथें जिथें चाललेलं तुला दिसेल तिथें तिथें मार्कस आहे असं तुला वाटेल. जें माणूस चांगलं असतं त्याचं शरीर तेवढं मृत्यु नेऊं शकतो. त्याच्या जीव-नांतला चांगला अंश नष्ट होत नाहीं. तो सतत मागं रहातो. प्रेम अमर आहे

आणि प्रेमामुळेंच सर्व गोष्टी अमर होतात. द्वेष मात्र क्षणाक्षणाला मरत असतो...होमर. आपण मैदानावर येऊन पोहोचलों. आपण खेळूं या काय थोडे ?"

होमर म्हणाला, "हं, खेळूं या."

# ३३

हेन्री व डॅनी यांच्या बरोबर पॅसेंजर गाडींतून उतरलेला व थोडासा लंगडत चालणारा तो तिसरा सैनिक स्टेशनांतून बाहेर पडला व आजुबाजूच्या प्रत्येक गोष्टीकडे सावकाश पहात, व स्वतःशींच मोठमोठ्यांदा पुटपुटत रस्त्यानं हिंडूं लागला. चालतां चालतां तो म्हणत होता,

"हा इथाका गांव ! ही वखार ! हें सॅन्टो फे ! सर्व गोष्टींवर पसरलेलं हें इथाका गांवचं आभाळ ! तें पहा सिनेमाचं थिएटर, अन् त्यापुढें रांगेंत उभे राहिलेले इथाकाचे अवर्णनीय लोक ! हें वाचन मंदिर. तें चर्च. तें तिकडे हायस्कूल अन् खेळाचं मैदान. तो सॅन्टा क्लॅरा रस्ता, ती आराची मंडई, अन् तिथं दिसतं आहे तेंच तें घर ! माझं घर !"

त्या घराकडे टक लावून पहात तो सैनिक खूप वेळ उभा राहिला. तो स्वतःशींच म्हणाला, "आई आणि बेस, होमर अन् युलिसेस शेजारची मेरी अन् तिचे वडील !" तो थांबला अन यानंतर त्यानं जो उद्गार काढला तो त्याच्या तोंडातून शब्दरूपानं बाहेर पडला नाहीं, तर त्याच्या शरीराच्या रक्ताचा एकेक थेंब तो उद्गार काढीत होता. "इथाका ! इथाका !" तो सैनिक पुढें चालत राहिला. जें जें दिसेल तें अमुक म्हणून तो स्वतःला सांगत होता. तो म्हणाला, "हा तुरुंग, खिडक्यांत बसलेले हे कैदी. तें मैदान. दोन माणसं खेळतांना दिसताहेत."

तो मैदानाजवळ जाऊन तिथल्या कुंपणाला टेकून उभा राहिला.

त्याला पाहताच स्पॅंग्लरबरोबर खेळत असलेल्या होमरनं दचकून त्याच्याकडे पाहिलं. आतां अंधार पडूं लागला होता. पण तरी त्या सैनिकाकडे पाहतांच होमरला वाटलं तो आपल्या ओळखीचा असावा. तो खेळ सोडून त्या सैनिकाजवळ गेला आणि त्याच्याकडे निरखून पाहूं लागला. मग तो हलकेच म्हणाला,

"मी असं पाहतों याबद्दल माफ करा, पण मला वाटलं तुम्ही माझ्या ओळखीचे आहांत. माफ करा हं !"

तो सैनिक म्हणाला, "छे छे, माफ काय करायचं !"

"तुम्ही येतां का आमच्या खेळांत. अंधेर वाढूं लागलाय पण—या कीं !"

"नको. थँक्स ! तुमचं चालू दे. मी नुसतं पहातों."

"तुम्हांला मी पूर्वी कधीं पाहिलं असेल असं वाटत नाहीं. इथाका गांवांतच तुमचं घर का ?"

सैनिक म्हणाला, "होय, इथेच माझं घर. मी परत आलों आहे. राहायला."

"म्हणजे तुम्हाला लढाईवर परत जावं लागणार नाहीं ?"

"अं हं. त्यांनीं मला घरीं येऊं दिलं आहे. कायमचं. सुमारे चार घटकांपूर्वी मी गाडींतून उतरलों. तेव्हांपासून गांवांतल्या सगळ्या गोष्टी पुन्हां एकदां बघत मी रस्त्यांरस्त्यांतून फिरत आहे"

होमरनं विचारलं, "पण मग तुम्ही आतां घरीं कां जात नाहीं ? आपल्या घरच्या माणसांना आपण आल्याचं लौकर कळावं असं नाहीं तुम्हांला वाटत ?"

"वाटतं तर. मी घरीं जाणार आहे. पण हलके हलके जाईन. आधीं मला सगळं शक्य तितकं पाहून घ्यायचं आहे. किती पाहिलं तरी पुरेसंच होत नाहीं. मी इथाका गांवांत आलों हें खरंच वाटत नाहीं. आणखी हिंडेन थोडा असाच, आणि मग मी घरीं जाईन." असं म्हणून तो सैनिक दूर झाला, आणि लंगडत सावकाश पावलं टाकीत निघून गेला.

होमर आश्चर्यचकित होऊन त्याच्याकडे बघत राहिला. मग स्पँग्लरकडे वळून तो म्हणाला, "हें काय आहे समजत नाहीं. परंतु हा सैनिक माझ्या फार दिवसांचा ओळखीचा आहे असं मला वाटतं. आतां खेळणं पुरं करूं या." क्षणभर थांबून आणि मग कांहीं तरी आठवल्यासारखं करून तो म्हणाला, "पण आतां पुढें काय? मी काय करूं? घरीं जाऊन काय सांगू? सारीजणं माझी वाट पहात असतील खास. मी जेवायला येतों असं सांगितलं आहे. मी घरीं कसा जाऊं? त्यांच्या नजरेला नजर कशी देऊं? त्यांना काय सांगू? माझं तोंड पाहिल्याबरोबर त्यांना सारं कळेल. त्यांना सांगण्याची माझी इच्छा नाहीं, परंतु त्यांना कळणारच."

स्पँग्लरनं त्याच्या गळ्यांत हात टाकला व म्हटलं, "इतक्यांत घरीं जाऊं नकोस. थांब. आपण इथें बसूं. थोडा वेळ जाऊं दे."

ते दोघे एका बाकावर बसले. एकमेकांशीं न बोलतां. अगदीं स्वस्थ कांहीं वेळानं होमर म्हणाला, "मी इथें कशासाठीं थांबलों आहे?"

स्पँग्लर म्हणाला, "मार्कसच्या जीवनाचा जो भाग कालवश झाला तो तुझ्यांतूनहि नष्ट व्हावा यासाठीं तूं थांबला आहेस. तो भाग केवळ शरीरमय आहे. तो अनित्य आहे. त्याला जरामरण आहे. त्याच्या अनित्यपणाचाच तूं शोक करीत बसला आहेस. पण थोडा थांब. इतर सर्व गोष्टींप्रमाणें या तुझ्या शोकाला देखील अंत आहे. हा शोक नष्ट झाला म्हणजे तुझं अंतःकरण अधिक शुद्ध आणि अधिक हलकं झालेलं असेल. शोकाची ऊर्मि नाहीशी व्हायला थोडा अवधि लागेल, आयुष्यांत निरनिराळ्या निमित्तांनीं ती पुनः पुन्हां उसळून वर येईल, परंतु जेव्हां जेव्हां ती ओसरेल तेव्हां तुझं अंतःकरण अधिकच शुद्ध झालेलं असेल, आणि मानवी आयुष्यांत जें परमतत्व आहे त्याच्या अधिक जवळ तूं पोंचलेला असशील. पण ही सहजा सहजीं होणारी गोष्ट नाहीं. तिला वेळ लागणारच. म्हणून म्हणतों थोडा थांब. मृत्यूनं निर्माण केलेला कडवटपणा तुझ्या अतःकरणांतून निघून जाऊं दे, आणि मग तूं घरीं जा. थांब. तुझं अंतःकरण शांत होईपर्यंत मी तुझ्याजवळ बसणार आहे."

होमर म्हणाला, "बरं."

आणि मग तार ऑफिसचा मॅनेजर आणि तारेचा शिपाई अशी ती दोन माणसं बाकावर एकमेकांना बिलगून किती वेळ तरी बसून राहिली.

मकॉले कुटुंबाच्या घरांत संगीत चालू होतं. हार्पच्या तारा छेडल्या जात होत्या मनुष्यमात्राच्या अंतःकरणांतलं दुःख नाहींसं करण्यासाठीं जणूं त्या तारांचा झंकार चालला होता. जिच्या हातीं तें तंतुवाद्य होतं त्या स्त्रीच्या मुद्रेवर धैर्याचा आणि प्रेमाचा प्रकाश दिसत होता. जी तरुण मुलगी पियानो वाजवीत होती तिचं अंतःकरण मुग्धतेनं अन् आवेशानं भरलेलं होतं; आणि जी गात होती तिची वृत्ति मृदु आणि मधुर होती. छोटा युलिसेस ऐकत होता. जीवनाच्या स्वारस्याबद्दल श्रद्धा असल्यामुळें त्याचे डोळे चमकत होते, आणि त्यानं संगीताकडे कान दिला होता तो अशा अविर्भावानं कीं जणूं तो एकटाच नव्हे तर सबंध जीव सृष्टि त्याच्या रूपानं तें संगीत ऐकत होती. जें गांव जन्मांत पाहिलं नव्हतं अशा गांवीं आलेला, ज्या घरांत पूर्वी कधीं प्रवेश केला नव्हता अशा घरीं येऊन पोंचलेला, आणि जीं माणसं पूर्वी पाहिली नव्हतीं अशा माणसांना भेटायला आलेला, किंचित् लंगडणारा तो सैनिक दारापुढच्या आगाशीखालीं पायरीवर बसला होता. तो सैनिक म्हणजे एक विवक्षित व्यक्ति नव्हती, घरीं परतलेल्या माणसाचं तें एक प्रतीक होतं. इथाका हीच त्याची जन्म-भूमि होती. हें घर त्याचं घर होतं. आंतली माणसं त्याचीं माणसं होती......

संगीत चालू असतां युलिसेस मध्येंच एकदम उठून दाराकडे गेला आणि बोट दाखवूं लागला. तो काय दाखवतो आहे तें पहाण्यासाठीं बेस त्याच्याकडे गेली. ती वळून आपल्या आईला म्हणाली.

" आई कुणीतरी बाहेरच्या पायरीवर बसलं आहे. "

तिची आई म्हणाली, " बाहेर जा, आणि त्याला म्हणावं आंत ये. तो कोणीही असूं दे. तुला भिण्याचं कारण नाहीं. "

बेस बाहेर जाऊन त्या सैनिकाला म्हणाली, " आंत या ना. आमच्या आईनं तुम्हांला बोलावलं आहे. "

त्या सैनिकानं मान वळविली आणि नजर वर करून त्या तरुण मुलीकडे पाहिलं. अगदीं शांत आवाजांत तो हलकेच म्हणाला, 'बेस, इथें ये अन् माझ्याजवळ बैस. माझं अंतःकरण शांत होऊन नीट उभं रहाण्याची शक्ति मला वाटेपर्यंत माझ्याजवळ बसून रहा. आतां माझे पाय थरथर कापताहेत आणि मी उभा राहिलों तर खचित पडेन. बेस, माझ्याजवळ बैस."

ती तरुण मुलगी त्या तरुणाजवळ बसली. तिनं हलकेच विचारलं, "माझं नांव तुला कसं माहीत ? तूं कोण आहेस ?"

तो म्हणाला, "मी कोण आहे तें मला माहीत नाहीं. पण तूं कोण आहेस तें मला ठाऊक आहे. तुझी आई, तुझे भाऊ, यांना मी ओळखतों. बेस, माझ्या मनाची तळमळ शांत होईपर्यंत माझ्या अगदीं जवळ बसून रहा."

"माझा थोरला भाऊ मार्कस् तुला माहींत आहे ?"

"होय. त्यानंच मला माणसांत आणलं. त्याच्यामुळेंच मला जन्मभूमि मिळाली, घर मिळालं, माणसं मिळालीं. तो मला माहीत आहे म्हणुन काय विचारतेस ? तो माझा देखील भाऊ आहे."

"मार्कस् कुठें आहे ? तुझ्याबरोबर तो कां नाहीं आला घरीं ?

"बेस, मार्कस्नं तुला ही आंगठी धाडली आहे." असं म्हणून मार्कस्नं त्याच्यावळ दिलेली आंगठी त्यानं तिच्या हातीं दिली.

बेस कांहीं वेळ एक शब्दसुद्धां बोलली नाहीं. मग तिनं विचारलं, "मार्कस् गेला काय ?"

तिच्या आवाजांत प्रक्षोभ नव्हता, उलट अगदीं शांतपणें व हलकेंच तिनं तो प्रश्न विचारला होता.

तो सैनिक म्हणाला, " नाहीं, मार्कस् गेला नाहीं. बेस माझ्यावर विश्वास ठेव.' त्यानं तिच्या ओठांचं चुंबन घेतलं.

तितक्यांत होमर रस्त्यांनं येतांना बेसला दिसला. ती त्याच्याकडे धांवली व म्हणाली, " होमर, मार्कस्कडून कुणी तरी आलं आहे. मार्कस्चा मित्र आहे तो. पायरीवर बसला आहे." ती वळली, आणि धांवली ती सरळ घरांतच.

होमर दाराशीं आला आणि टोबे जॉर्जकडे पहात उभा राहिला. शेवटीं तो म्हणाला, " टोबे ना ? तुला मघाशीं प्रथम पाहिलं तेव्हांच वाटलं मला." तो क्षणभर थांबला आणि मग म्हणाला, " संध्याकाळीं तार आली. माझ्या खिशांत आहे. आतां काय करायचं ? "

टोबे म्हणाला, " ती फाडून टाक, फेंकून दे. तिच्यांत लिहिलं आहे तें खरं नाहीं. फाडून फेंकून दे तो. "

होमरनं खिशांतून तार काढली व झटकन् फाडली, मात्र त्या तारेचे तुकडे त्यानं फेंकून दिले नाहींत. कायमची आठवण म्हणून त्यानं ते खिशांत ठेवले.

टोबे म्हणाला, " जरा माझा हात धरून मला उठव. आपण दोघं मिळून घरांत जाऊं. " होमरनं वांकून त्याला हात दिला. त्याच्या हातांचा आधार घेऊन टोबे हलके हलके उभा राहिला. एक अनाथ पोरका जीव अखेर आपल्या घरीं आला होता, आणि तो आतां आपल्या आईला, भावा-बहिणींना भेटणार होता.

आवाज उंच करून होमरनं साऱ्यांना हांका मारल्या व म्हटलं, " आई ! बेस ! मेरी ! संगीत चालूं दे. सैनिक घरीं परत आला आहे ! त्याचं स्वागत करा ! "

शांत संगीत सुरू झालं.

सैनिक म्हणाला, " इथेंच कांहीं वेळ उभं राहून हें संगीत ऐकूं दे मला. "

होमर आणि टोबे दोघेहि संगीताचे स्वर ऐकत उभे राहिले. सैनिकाच्या मुद्रेवर किंचित दुःखाची मृदु छटा होती, परंतु तो हंसत होता. ज्या सुखाचं स्वरूप त्याला नीटसं कळत नव्हतं अशा सुखानं होमरचं अंतःकरण हलकं झालं होतं. तोहि हंसत होता.

आतां मेरी गाऊं लागली. युलिसेस हलकेच बाहेर आला व त्यानं सैनि-काचा हात धरला. गाणं संपलं तेव्हां युलिसेसची आई, मेरी, बेस, सगळ्या

जणी दारांत आल्या. युलिसेसच्या आईनं पाहिलं तों तिच्या उरलेल्या दोन मुलांच्या मधोमध मार्कसचा मित्र, तो सैनिक, उभा होता. तिच्या सारं लक्षांत आलं. त्या सैनिकाकडे पाहून तिनं हास्य केलं. आतां तोच तिचा मुलगा होता. स्वत: मार्कस घरीं परत आला असतां तर त्याच्याकडे पाहून ती जशी हंसली असती तशीच ती हंसली. तो सैनिक आणि त्याचे दोघे धाकटे भाऊ, तिघे मिळून पुढें झाले. प्रेमानं आणि प्रकाशानं भरलेल्या घरांत ते आतां प्रवेश करणार होते.

# प्रो. फडके यांचें इतर वाङ्मय

## लघुकथा

१ प्रो. फडके यांच्या गोष्टी भाग १ ला
२ ,, ,, ,, ,, ,, २ रा
३ लोला आणि इतर गोष्टी
४ नमुनेदार गोष्टी
५ उल्हास कथा
६ वत्सला व इतर गोष्टी
७ चंद्रा व इतर गोष्टी
८ लाडकी लक्ष्मी व इतर गोष्टी
९ माझा देश व इतर गोष्टी

## नाटकें

१ युगांतर
२ संजीवन
३ तोतया नाटककार
४ जडावाची देवी ( २ री आ. )
५ आगलावी
६ क्षमेसाठीं अपराध
७ काळे-गोरे

## प्रबंध

१ मानसोपचार ( २ री आ. )
२ मानसोन्नति
३ सुखाचे संसार
४ संततिनियमन
५ आजचे तरुण स्त्री-पुरुष व त्यांजपुढील प्रश्न ( ३ री आ. )
६ प्रतिभासाधन ( ३ री आ.)
७ वाङ्मयविहार ( २ री आ.)
८ अधुनिक गीता ( २ री आ.)
९ मानसमंदिर
१० साहित्य व संसार ( २ री आ. )
११ आकाशवाणी ( ३ री आ.)
१२ वेचलेले मोती
१३ टाकांचे घाव
१४ टाकांच्या फेकी
१५ माझ्या साहित्यसेवेंतील स्मृति भाग १ ला (२ री आ.)
१६ शेलापागोटें

## ललितनिबंध

१ गुजगोष्टी ( ३ री आ. )
२ नव्या गुजगोष्टी ( २ री आ. )
३ धूम्रवलयें ( ३ री आ.)
४ अबोलींच्या गोष्टी

## चरित्रें

१ दादाभाई नौरोजी ( ३ री आ. )
२ टेरेन्स मॅक्स्विनी
३ डी व्हॅलेरा
४ तीन थोर देशभक्त

## व्याख्यानें

१ गाजलेली भाषणें
२ मित्रहो !

## इंग्रजी

1 Sex Problem in India (2nd Edition)
2 Psychology
3 Elements of Ethics
4 Manual of Lfgic (3rd Edition)
5 Birth Control
6 History of Philosophy

पुणे, सोलापूर, कोल्हापूर, सांगली इत्यादि
प्रमुख शहरीं गाजलेलें व नामांकित
दिग्दर्शक, नट, संगीतज्ञ व
साहित्यिक यांनीं प्रशंसिलेलें—

**ना. सी. फडके** एम्. ए. यांचें

नवें, हास्यरसप्रधान, स्वतंत्र,
सामाजिक नाटक

# का
# ळे
# गो
# रे

नटनटींच्या सुंदर फोटोंसह
लवकरच प्रसिद्ध होईल.

# प्रो. फडके यांच्या कादंबऱ्या

| | |
|---|---|
| अल्ला हो अकबर | ( २ री आवृत्ति ) |
| कुलाब्याची दांडी | ( २ री ,, ) |
| जादुगार | ( ४ थी ,, ) |
| दौलत | ( ४ थी ,, ) |
| अटकेपार | ( २ री ,, ) |
| निरंजन | |
| कलंकशोभा | ( २ री ,, ) |
| आशा | ( ३ री ,, ) |
| उद्धार | ( ३ री ,, ) |
| काश्मिरी गुलाब | |
| प्रवासी | ( ३ री ,, ) |
| समरभूमि | ( २ री ,, ) |
| उन्माद | ( २ री ,, ) |
| गुप्त प्रायश्चित्त | ( २ री ,, ) |
| इंद्रधनुष्य | ( २ री ,, ) |
| प्रतिज्ञा | ( २ री ,, ) |
| वादळ | ( ३ री , ) |
| शाकुंतल | ( सरकार जमा ) |
| अखेरचं बंड | ( २ री आवृत्ति ) |
| बस नंबर बारा | ( २ री ,, ) |
| जीवन संगीत | ( २ री ,, ) |
| माझा धर्म | |